


# स्थानिक राज्यव्यवस्था.

हें पुस्तक

चामर्सकृत लोकल गवर्मेंट या नांवाच्या इंग्रजी

ग्रंथावरून,

काशिनाथ त्रिंबक तेलंग, एम. ए.,

एल. एल. बी., सी. आय. ई.,

मुंबई कायदे कौन्सलाचे सभासद,

एल्फिन्स्टन कालेजांतील माजी दक्षिणा फेलो.

यांनीं

मराठींत तयार केलें.

तें

" सुबोधप्रकाश " छापखान्यांत छापिलें.

सन १८८९

किंमत १ रुपया.



# उपोद्घात.

आपले प्रख्यात व लोकप्रिय व्हैसरॉय लॉर्ड रिपन साहेब यांच्या कारकीर्दीस स्थानिक स्वराज्याबद्दल जे हिंदुस्थान सरकारचे ठराव प्रसिद्ध झाले, त्या ठरावांवरून या इलाख्यांतच काय तर सगळ्या हिंदुस्थान देशांत त्या विषयासंबंधी बरीच चर्चा व वाटाघाट सुरू झाली. आणि आपल्या कायदे कौन्सलांत ज्या वेळीं स्थानिक स्वराज्यसंबंधीं कायद्यांचे मसुदे तयार होऊन त्यांविषयीं विचार व वाद चालत होता, त्या वेळीं पुष्कळ लोकांचें त्यां कायद्यांकडे लक्ष्य बरेंच लागलें होतें, व त्यांतील कलमांवर बऱ्याच समंजस व विचारपूर्वक रीतीनें तयार केलेल्या टीका वर्त्तमानपत्रांतून छापल्या जात होत्या व सामान्य जनसंवादांत देखील होत होत्या. शिवाय पुण्याच्या सार्वजनिक सभेनें तर जिल्ह्यांतून स्थानिक स्वराज्य व्यवस्थेविषयीं माहिती देण्याकरितां, व तत्संबंधानें सरकारचे उद्देश व प्रजेची जबाबदारी यांबद्दला लोकांस समजूत देण्याकरितां, कांहीं गृहस्थांची नेमणूक करून त्यांच्यकडून निरनिराळ्या ठिकाणीं व्याख्यानें देवविण्याचा क्रम चालू केला होता, आणि त्या गृहस्थांनीं आपली कामगिरी बऱ्याच रीतीनें बजाविली असें समजतें. या सर्व कारणांनीं चहूंकडे स्थानिक स्वराज्याविषयीं चर्चा होऊन, पुढें कारभार स्थानिक अधिकाऱ्यांच्या हातीं येणार असें जेव्हां ठरलें, तेंव्हां ह्मणजे सन १८८४ सालाच्या सुरुवातीस, माझ्या मनांत असा विचार आला, कीं इंग्लंड देशांत स्थानिक स्वराज्याची स्थिति कशी काय आहे, व तेथें व्यवस्था कोणत्या रीतीनें चालत असते, या मुद्यांविषयीं इंग्रजी भाषा न शिकलेल्या लोकांना अशा प्रसंगीं कांहीं माहिती उपलभ्य झाल्यास अल्पस्वल्प तरी उपयोग होण्याचा संभव आहे. आणि तशी माहिती मिळण्याचें एक सुलभ साधन त्या वेळेसच माझ्या पाहण्यांत आले; ह्मणजे हल्लीं इंग्लंड देशांत "इंग्लिश सिटिझन सीरीझ" या नांवाची एक ग्रंथ मालिका प्रसिद्ध होत आहे, त्या मालिके मध्यें इंग्लंड देशांतील स्थानिक राज्य व्यवस्थेवरील ग्रंथ मला पाहाण्यास मिळाला. त्या ग्रंथाचें भाषांतर केलें असतां आपला हेतु सिद्धीस जाईल असें मला वाटलें, ह्मणून त्या ग्रंथाचे प्रकाश-

क प्रसिद्ध माक्मिलन आणि मंडळी यांची भाषांतर करण्याबद्दल परवानगी मिळवून भाषांतर करण्याचें काम सुरू केलें.

प्रथमारंभीं माझा इरादा असा होता कीं, इंग्रजी कारकीर्दीच्या पूर्वीं स्थानिक राज्यव्यवस्थेची स्थिति आपल्या देशांत कशी होती तिचें थोडेसें वर्णन या पुस्तकांत द्यावें. ती स्थिति मनन करण्यालायक आहे यांत कांहीं संदेह नाहीं, कारण परदेशस्थ इतिहासकारांनीं देखील तिच्या उपयुक्ततेबद्दल व तिच्या पासून झालेल्या आपल्या भरतखंडांतील राष्ट्रांच्या हिताबद्दल फारच चांगले अभिप्राय प्रकट केले आहेत. पण हा इतका महत्वाचा विषय असतांही, मला तो या ग्रंथांतून वगळणें भाग पडलें याबद्दल मी फार दिलगीर आहें. तें भाग पडण्याचें कारण हेंच कीं हल्लींचें भाषांतर व त्या वरील टीपा इतकें तयार करण्यास जो काळ लागला तोच माझ्या मुळच्या अजमासापलिकडे फार झाला. आणि आपल्या प्राचीन स्थितीबद्दलची माहिती तर मिळण्यास कठीण असून, अनेक ठिकाणांहून गोळा करावी लागणार. अशा विचारामुळें मुळचा बेत रहित करणें जरूर पडलें. आणि या ग्रंथांत, केवळ आपल्या नवीन आक्टांअन्वयें झालेल्या व्यवस्थेचें आणि इंग्रजी व्यवस्थेचें साम्य कितपत आहे व त्यांमध्यें भेद कितपत आहे, हें साधारण रीतीनें दर्शविण्यापुरत्या मात्र टीपा या ग्रंथाच्या शेवटीं जोडल्या आहेत.

आतां हा ग्रंथ मनोरंजक होणार नाहीं हें मी जाणून आहें. मुळचा इंग्रजी ग्रंथ देखील मनोरंजक नाहीं असें त्या ग्रंथाचा कर्ता स्वतः कबूल करितो. आणि त्या ग्रंथाचें भाषांतर त्याही पेक्षां कमी मनोरंजक असलेंच पाहिजे हें स्पष्ट आहे. सर्वथा अपरिचित गोष्टी, आणि अपरिचित शब्द, यांचा भरणा अशा पुस्तकांत फारच असतो. आणि तो कमी करण्याला उपाय मुळींच नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. एक योजना मात्र येथें केली आहे, ती ही कीं या पुस्तकाच्या अखेरीस त्या अपरिचित शब्दांचा कोश घातला आहे. तेणेंकरून त्या शब्दांचा अर्थ कळण्यास कांहीं मदत होईल. आणि त्यापासून दुसरा एक विशेष फायदा असा आहे कीं, येथें जे नवीन शब्द योजिले आहेत ते त्या त्या अर्थीं



प्रयोग करण्यास योग्य आहेत असें विद्वज्जनांचें मत असल्यास तें कायम करण्याला, किंवा त्यापेक्षां विशेष योग्य शब्द कोणी सुचविल्यास ते कायम करण्याला, सर्व शब्द एकीकडे गोळा केल्यामुळें, आणि तेणेंकरून त्या सर्वांकडे वाचकांचें लक्ष्य विशेषेंकरून लागल्यामुळें, अधिक सोईवार पडेल.

वर सांगितल्याप्रमाणें जरी हा निबंध बहुतकरून चित्तवेधक होणार नाहीं हें खरें आहे, तथापि महाराष्ट्र देशामध्यें ज्या गृहस्थांवर स्थानिक कारभार चालविण्याचा बोजा पडणार किंवा हल्लींच पडला आहे, त्यांपैकीं कांहीं जणांनीं तरी हा ग्रंथ वाचण्याचे श्रम पत्करावे अशी माझी इच्छा आहे. तो वाचल्यापासून इंग्लंड देशांतील स्थानिक राज्यव्यवस्थेबद्दल त्यांना जें ज्ञान प्राप्त होईल त्या पासून त्यांना आपापलीं स्थानिक कामगिरी बजाविण्यास पुष्कळ उपयोग झाल्यावांचून राहणार नाहीं. त्यांना त्या वाचनापासून असें कळून येईल कीं, इंग्लंड देशांतील व्यवस्था योग्य रीतीनें कायम केलेली नाहीं, तिच्यामध्यें अधिकारविभाग, हद्दी, हिशेबठिशेब यांबद्दल असावा तसा नियम नाहीं, किंबहुना बाह्यस्वरूपीं ती व्यवस्थाच नव्हे तर सर्व घोंटाळा आहे असें ह्मटलें तरी चालण्यासारिखें आहे. पण असें असतांही तेथील लोकांच्या चित्तांत सार्वजनिक कार्यांबद्दलची कळकळ नेहेमीं जागृत आहे; स्थानिक कामांसंबंधी आपापली कामगिरी बजाविण्यांत ते फार दक्ष आहेत; आणि केवळ आपलें पोट भरलें ह्मणजे बस आहे तितक्यांतच आपल्या जीवनाचें सार्थक झालें, असें मानणारे तेथील लोक नाहींत; यामुळें स्थानिक व्यवस्था सामान्यतः बरी चालली आहे, आणि उत्तरोत्तर तिच्यामध्यें सुधारणा होतच आहेत. हल्लींच इंग्लंड देशांत पार्लमेंट सभेचे सभासद नेमण्याच्या प्रसंगीं जी अवघ्या राष्ट्रांत चळवळ होत असते ती सुरू झाली आहे. या प्रसंगीं राष्ट्रासंबंधी मोठमोठे विषय कोणकोणते आहेत, त्यांच्या विषयीं पार्लमेंट सभेनें काय काय केलें पाहिजे, यांबद्दल इंग्लंड देशांतील सर्व थोरथोर मुत्सद्दी लोकांचीं भाषणें होत आहेत, पत्रें छापिलीं जात आहेत, आणि इतर प्रकार तेथील नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें चालू झाले आहेत. त्यांमध्यें स्थानिक राज्य व्यवस्थेंत सुधारणा झाली पाहिजे असें इंग्लं-

ड देशाचे माजी मुख्य प्रधान ग्लाडस्टन साहेब यांनीं प्रसिद्ध केलेल्या पत्रकांत प्रतिपादन केलें आहे. येथें एक गोष्ट ओघास आली ह्मणून सांगितल्याविना राहवत नाहीं ती ही कीं या प्रसंगीं आपल्या लोकांनीं-ही आपल्या या भरतखंडाच्या स्थितीबद्दल, हक्कांबद्दल व मागण्यांबद्दल इंग्रजलोकांस माहिती मिळावी व त्यांच्या मनांत आपल्या लोकांविषयीं ममता व कळकळ उत्पन्न करावी या हेतूनें खटपट चालविली आहे. या खटपटींत बंगाल्यांतील दोन प्रसिद्ध सभा, ब्रिटिश इंडियन आणि इंडियन असोसिएशन, मद्रासेंतील महाजन सभा, आपल्या इलाख्यांतलि पुण्याची सार्वजनिक सभा, सिंधसभा, सुरतप्रजाहितवर्धिनी सभा, व मुंबई शहरांतलि प्रेसिडेन्सी असोसिएशन, या सर्व कांहीं अंशीं तरी जुटीनें वागत आहेत हीं एक मोठी आनंदाची गोष्ट समजली पाहिजे. अशा प्रकारचा संप याच काय तर सर्व सार्वजनिक कृत्यांत, आणि इलाख्या इलाख्यांतच काय तर सर्व शहरा शहरांत, गांवांगांवांत, व मनुष्यामनुष्यांत देखील जेव्हां होईल, तेव्हांच देशाची राजकीय स्थिति ठीक होईल.

असो. प्रकृत विषयाकडे पुनः वळूं या. इंग्लंड देशांतील स्थितीशीं आपली स्थिति ताडून पाहिली ह्मणजे असें दिसून येतें कीं, बाह्यस्वरूपाची टापटीप आपल्याकडे जास्त आहे, पण जी खरी चित्तवृत्ति व आंतरभावना हें काम सुयंत्र चालण्यास आवश्यक आहे, ती आपल्या कडे फार कमी आहे. ही उणीव काढून टाकण्यास आपण प्रयत्न केला पाहिजे. आतां हें ह्मणजे फार दुर्घट कृत्य आहे असें नाहीं. स्थानिक व्यवस्था युरोपखंडांत प्रचारांत आली त्या पूर्वीं आपल्यादेशांत मोठ्या समृद्ध दशेस येऊन पोंहोंचली होती, हें या ग्रंथात व इतर पुष्कळ ठिकाणीं परदेशस्थ लोकानीं देखील कबूल केलें आहे. तेव्हां स्थानिकव्यवस्थेचा पाठ आतां आपल्याला नवीन शिकावयाचा आहे असें नाहीं. पूर्वीं आपण शिकून कांहीं कारणांमुळें विसरून गेलों, तो केवळ पुनः उपस्थित करणें आहे. ह्मणून या कामांत उत्साहभंग होण्याला कांहीं कारण नाहीं. हें खरें आहे कीं, आपल्या पूर्वीच्या व्यवस्थेंत, स्थानिक अधिकार बहुधा वंशपरंपरेनें चालत असत, आणि इंग्लंड देशांत तसा प्रकार नाहीं. पण या व इतर मुद्यांच्या संबंधानें आपली व्यवस्था बरी कीं इंग्लंडांतील व्यवस्था बरी याविषयीं आतांच

विचार करीत बसण्याची जरूर नाहीं. जी ठीक दिसेल ती स्वीकारितां येईल. परंतु मुख्य मुद्दा हा आहे कीं, स्थानिक कारभार पहाण्याची कामगिरी आपल्याकडे आहे अशी समजूत मागें या देशाच्या रयतेमध्यें कोणत्या तरी रूपानें होती, आणि तीच आतां पुनः प्रसृत झाली पाहिजे. कांहीं होईना आपला आणि त्या कारभाराचा कांहीं संबंध नाहीं, असा समज निर्मूलन करून टाकिला पाहिजे. आणि एकदा इतकी स्थिति झाली, ह्मणजे मग पुढलि अधिकारव्यवस्था कोणत्या रीतीची असावी या गोष्टींचा निकाल करितां येईल. यासंबंधानें एक मुद्दा मात्र ध्यानांत ठेविला पाहिजे. या ग्रंथाच्या अखेरीस ज्या टीपा जोडल्या आहेत त्यांतील एका टीपेंत असें सांगितलें आहे कीं, साधून घेतलेल्या स्वार्थास अपकार सहसा करूं नये, हें एक राजनीतीचें मूलतत्व आहे. तेव्हां त्या मूलतत्वाच्या अनुरोधानें विचार करितां असें दिसून येतें कीं, जेथें जेथें प्राचीनकाळचे गांवचे अधिकार अद्यापि कायम राहिलें आहेत, तेथें तेथें त्यांत जरूर असेल तितकीच सुधारणा करून ते अधिकार ज्यांचे त्यांच्याकडेच राहावे हें इष्ट आहे. आणि या पासून जसें व्यक्तीचें हित आहे तसें देशाचेंही कल्याणच आहे. यावरून गांव संबंधाचे अधिकार केवळ वंशपरंपरेनें चालणारे असूं नयेत असा गर्भितार्थ निघतो, आणि मला हाच सिद्धांत मान्य आहे. केवळ मानमरातबाच्या संबंधानें अधिकार वंशपरंपरेनें चालावे असें जरी कबूल केलें, तथापि जेथें सार्वजनिक कार्य बजाविणें आहे तेथें तें कार्य बजाविण्यास लायक मनुष्याची योजना व्हावी हेंच योग्य, आणि एका मनुष्याची तेथें एकदा योजना झाली ह्मणून त्याच्या पुत्रपौत्रादिकांची तेथें निरंतरची योजना व्हावी असा नियम घालून दिल्यापासून सर्वोपरी नुकसानच आहे. बाप कामांत प्रवीण असला ह्मणून मुलगा प्रवीण असतो असा नेम मुळींच नाहीं हें अनुभवांती सर्वांस कळून येतें. तेव्हां बापाच्या हुद्यावर मुलग्याची नेमणूक करावी असा नेम करणें हें उचित्त नव्हे. आतां बापाच्या हाताखालीं काम केल्यामुळें अथवा अन्य रीतीनें मुलग्याला माहिती मिळत असते हें खरें आहे. पण तशी माहिती असल्यास तिच्यामुळें त्याला हुद्दा मिळावा हें रास्त आहे, केवळ तो आपल्या बापाचा मुलगा आहे इतक्यावरूनच मिळूं नये.

या संबंधानें येथें जास्त लिहिण्याची जरूर नाही. ह्मणून दुसरा एक अशाच प्रकारचा मुद्दा आहे त्याकडे आतां लक्ष्य पोंहोंचविलें पाहिजे. स्थानिक कारभाराशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं ही गैरसमजूत जशी नष्ट झाली पाहिजे, त्याच प्रमाणें स्थानिक कारभार आपल्याकडून नीट रीतीनें चालणें अशक्य आहे, हाही समज निघून गेला पाहिजे. ज्यावेळेस पूर्वीं सांगितल्याप्रमाणें या इलाख्यांत स्थानिक राज्यव्यवस्थेविषयीं वाटाघाट चालली, होती त्यावेळेस नाशिक मुक्कामीं या संबंधी माझें एक दोन गृहस्थांकडे भाषण झालें, त्यांत त्यांनीं असें बोलून दाखविलें कीं, आपल्या लोकांच्या अंगीं हा कारभार चालविण्याचें सामर्थ्य नाहीं. हें मला अगदीं कबूल नाहीं. मीं इतकें मान्य करितों कीं, तो कारभार चालविण्याच्या कामांत आपल्याला फार अडचणी येतील, अनेक प्रसंगीं अव्यवस्था होईल, व इतर प्रकारचीं संकटें आपल्याला भोगावीं लागतील; पण हें जरी मान्य केलें, तथापि अशा अडचणीचा, अव्यवस्थेचा, व संकटांचा, क्रम फार वेळपर्यंत चालणार नाहीं अशी मी उमेद बाळगितों. शिवाजी, अकबर आणि पेशवे यांच्या पराक्रमांची व कर्तबगारीची आठवण आमच्या लोकांमध्यें अजून बऱ्याच अंशीं जागृत आहे. अजून ही जीं एतद्देशीय संस्थानें कायम राहिलीं आहेत, त्यांत हिंदु, मुसलमान, व पार्शी अधिकाऱ्यांच्या हातीं अधिकार असून बंदोबस्त बऱ्याच रीतीनें चालत आहे अशीं अनेक उदाहरणें आपण पहातों. मुंबईसारिख्या ठिकाणीं स्थानिक कारभार स्थानिक अंमलदारच चालवितात, आणि त्यांत हुजुराकडील नियमन फार थोडें असतांही काम उत्तम रीतीनें होत आहे असें आपले प्रतिस्पर्धी देखील कबूल करीत आहेत. तेव्हां अशा स्थितींत या गोष्टीबद्दल निराशेला मुळींच आधार नाहीं हें उघड आहे. जरी कदाचित् आमच्या सर्व देशभर प्रजा आपला स्थानिक कारभार आपण चालविण्यास आज तयार नसली, तथापि पुष्कळ ठिकाणीं जुन्या संस्कारामुळें व आलिकडील शिक्षणादिकांमुळें तो कारभार चालविण्यास लायक अशी मंडळी बरीच असली पाहिजे. त्या मंडळीच्या सहवासानें इतर लोकांना देखील आपल्या देशजननीची सेवा करण्याच्या कामांत थोडा

बहुत उत्साह उत्पन्न व्हावा, हें निदान संभवनीय तरी खाचित आहे, आणि तसा उत्साह हल्लीं उत्पन्न झाला आहे, व पुढेंही उत्पन्न होऊन प्रसृत होत जाईल असा मला पूर्ण भरंवसा आहे. इतकें मात्र झालें पाहिजे कीं, सार्वजनिक काम ज्यांच्या हातीं पडेल, व सार्वजनिक काम करणें हा एक आपला धर्म आहे असें ज्यांना वाटत असेल, त्यांनीं सर्व ठिकाणीं यथाशक्ति, यथामति, आपले विचार आपल्या बंधुजनांस समजाविण्याची सवड साधेल ती घेऊन, त्यांनां आपल्या बरोबरीनें पुढें पाऊल टाकण्यास मदत केली पाहिजे.

या दोन मुद्यांच्या संबंधानें आणखी एक विचार निघतो तो हा. स्थानिक कारभार आपला आपण चालवूं लागल्यापासून फायदा काय असें कांहीं लोक विचारतात. मलाच एका मित्रानें एकदा बोलून दाखविलें कीं, तुह्मीं स्थानिकस्वराज्य स्थानिकस्वराज्य ह्मणून इतकें बोलत आहां, पण यांत हांशील काय आहे? फक्त आपल्या कचरपट्टीची व्यवस्था आपल्या हातीं येणार याखेरीज यांत सार काय? हा सवाल स्वाभाविक आहे, आणि त्याला उत्तर देणें आवश्यक आहे. तें उत्तर दोन प्रकारें देतां येईल. एका प्रकाराचें दिग्दर्शन पुढें पृष्ट ९ येथें केलें आहे. या क्षुल्लक दिसणाऱ्या कार्यांत आपल्याला सार्वजनिक कृत्यें बजाविण्याबद्दलची संवई झाली, ह्मणजे विशेष महत्वाच्या सार्वजनिक कार्यांबद्दल आणि सर्व देशहिताच्या साधनांबद्दल जी आवश्यक भावना आहे, ती उत्पन्न होईल. केवळ आपलपोटेपणाची स्थिति जाऊन परार्थघटना हें एक आपलें कर्तव्य आहे असा समज चहूंकडे पसरून, गरीब लोकांचें श्रीमंतांकडून, अशिक्षित लोकांचें सुशिक्षित लोकांकडून, व निराश्रित लोकांचे सामर्थ्यवान् लोकांकडून, कल्याण होण्याचा क्रम जारीनें चालेल. असें झालें तर देशाचें मोठें कल्याण होईल यांत [illegible] संदेह नाहीं. वरील सवालास दुसरें उत्तर असें आहे कीं, या क्षु[illegible] कामांत आपली प्रवीणता सिद्ध झाली, ह्मणजे याहून विशे[illegible] मांत आपल्या लोकांची योजना व्हावी, जास्त हुद्दे, व[illegible] लोकांस मिळावे, असें आपल्याला सरकाराकडे मागणें[illegible] आणखी ही एक याच पक्षाची गोष्ट ध्यानांत [illegible]

स्थानिक स्वराज्याबद्दल जे कायदे झाले आहेत त्यांत केवळ कचरपट्टीबद्दलचीच सत्ता स्थानिक अधिकाऱ्यांस दिली आहे असें नाहीं. तर रस्ते सडका व इतर गमनागमनाचीं साधनें, याबद्दल ही त्यांना सत्ता दिली आहे. आणि या सर्व गोष्टींपेक्षां विशेष महत्वाची गोष्ट मी ही समजतों कीं, सरकार हल्लीं जे कर एकत्र करीत आहे, त्या पैकीं कांहीं अंश स्थानिक अधिकाऱ्यांच्या हातीं लोक शिक्षणाच्या कामाकडे लावण्याकारितां येणार आहे. हें काम तर निखालस क्षुल्लक नाहीं. या पुढें जें कांहीं आपल्या देशाचे हिताहित होणार, तें शिक्षणावर पुष्कळ अंशीं अवलंबून आहे. तर आपल्या देशाच्या हिताहिताचें हें मोठें साधन आपल्या हातीं येत असतां, स्थानिक स्वराज्य ह्मणजे केवळ कचरपट्टीची व्यवस्था असें ह्मणणें रास्त नाहीं. शिवाय या ग्रंथांत आणखी कोणकोणतीं कार्यें स्थानिक कार्यें या सदरा खालीं इंग्लंड देशांत मोडतात तें कळेल. त्यांपैकीं जीं आपल्या स्थितीप्रमाणें येथें ही स्थानिक अधिकाऱ्यांकडे असावीं असें आपल्यास वाटेल तीं सरकाराकडे मागितल्यास सरकार सहसा ना ह्मणणार नाहीं. तेव्हां स्थानिक कारभारांत बऱ्याच सार्वजनिक कार्यांचा समावेश काळें करून तरी निदान होण्याचा संभव आहे हें उघड आहे.

माझ्या मतें हे वर दाखविलेले सर्व फायदे मोठेच आहेत, असें ह्मणणें उचित आहे. पण हे सर्व कस्पटाच्या योग्यतेचे आहेत असें जरी क्षणभर कबूल केलें, तरी एक हा विचार केला पाहिजे, कीं या स्थानिक स्वराज्याच्या योगानें कांहीं मनुष्यांना आपल्या बंधूंचें, अल्पस्वल्प कां होईना, पण कांहीं तरी कार्य करण्याची सवड सांपडते, हाही मोठाच फायदा आहे. स्वार्थ दवडून पराहित साधण्यास प्रयत्न करणें हें सत्पुरुषाचें लक्षण ह्मणून सांगितलें आहे. अशा सत्पुरुषाची योग्यता त[illegible] देशबांधवांमध्यें प्रसृत होवो. मग तिच्या प्रसारापासून पुढें [illegible]त न झालें, तथापि तो प्रसार हेंच एक मोठें हित झालें असें [illegible] कांहीं प्रत्यवाय नाहीं. "यावज्जीवं सुखं जीवेदृणं कृ-[illegible]नीच मताचा परित्याग करून "परोपकाराय सतां वि-[illegible]याच्या अनुरोधानें वर्तन करण्यास एक सवड स्था-[illegible]रनें पुष्कळांस प्राप्त होते. ती सवड साधून, सा-

क्षात् आपापल्या गांवाचें किंवा जिल्ह्याचें, आणि परंपरया सर्व देशाचें कल्याण करण्यास आपण सर्वांनीं झटलें पाहिजे. तशा रीतीनें झटण्यास जर या इंग्रजी स्थानिक राज्याच्या स्थिति रीतीच्या वर्णनानें निदान कांहींकांस उत्साह व उत्तेजन येईल, तर माझ्या श्रमाचें साफल्य झालें असें मानण्यास कांहीं चिंता नाहीं.

आतां शेवटीं एक कर्तव्य राहिलें आहे तें करून ही प्रस्तावना आटपतों. पहिल्यानें यासंबंधी माझ्यावर मोठें उपकार इंग्लंड देशांतील ग्रंथ प्रकाशकांमध्यें श्रेष्ट वर्गांतले जे प्रसिद्ध माक्मिलनसाहेब व त्यांचे भागीदार यांचे आहेत. त्यांनीं चामर्स साहेबांच्या ग्रंथांचें भाषांतर करण्यास, पैशाबद्दल वगैरे कांहीं अटी न सांगतां, परवानगी मला दिली यांबद्दल त्यांचे आभार मी मानावे हें रास्तच आहे. ती परवानगी आपले माजी चीफ जस्टिस साहेब सर मैकेल वेस्ट्रॉप यांच्या सहाय्यावांचून मला मिळालीच नसती ह्मणून त्यांचेही मजवर उपकार मोठे झाले आहेत यांत संशय नाहीं. या शिवाय माझ्या अनेक मित्रांनीं या कामांत बरीच मदत केली आहे. त्यांपैकीं रा० रा० नारायण विष्णु बापट, रा० रा० विष्णु कृष्ण भाटवडेकर, रा० रा० काशिनाथ त्रिंबक खरे, व रा० रा० विनायक कोंडदेव ओक, यांच्याकडून विशेष मदत मिळाली सबब त्यांचीं नांवें येथें प्रसिद्धपणें दाखल करून त्यांचे आभार मानतों.

---






# ग्रंथकर्त्याची प्रस्तावना.

इंग्लंड देशाची हुजुराकडील राज्यव्यवस्था ही पुष्कळ दिवसांपासून प्रचारांत असलेल्या परंतु लिहून ठेवलेले नाहींत अशा रीतरिवाजांप्रमाणेंच बहुतेक चालत आहे. पण स्थानिक राज्यव्यवस्थेचा प्रकार कांहीं तसा नाहीं. त्याचे लहानसान गोष्टीविषयींचे देखील बहुतकरून सर्व नियम स्टाटुट अथवा लेखी कायद्यांत दाखल झालेले आहेत. स्थानिक कारभाराच्या संबंधाचे साधरणतः चहूंकडे अमलांत असणारे असे कायदे अथवा कायद्यांचे भाग ६९० आहेत. या खेरिज स्थलविशेषीं अथवा प्रसंगविशेषीं लागू असे हजारों कायदे आहेत, त्यांचा अंमल कांहीं शहरांतच अथवा कांहीं पारिशांतच चालू असतो. आणि याप्रकारच्या कायद्यांची संख्या दर वर्षास ६० अशा मानानें वाढत चालली आहे. आमच्या स्थानिक कायद्यांची सुरुवात सन १२७९ सालीं जो अपमृत्युप्रेक्षकांबद्दल कायदा करण्यांत आला, त्या पासून झाली. आणि हल्लीं शेवटला कायदा ह्मटला ह्मणजे सन १८८२ सालीं झालेला तुटक पारिशांचा कायदा हा होय. या दोन वर्षांच्या दरम्यान बाकीचे सर्व कायदे अत्यंत अव्यवस्थित रीतीनें पसरलेले आहेत. त्या सर्वांचा तपास करणें ह्मणजे कांहीं मनास रंजन होईल अशा प्रकारचें काम नव्हें. यास्तव या पुस्तकांत माझा हेतु ह्मणून इतकाच आहे कीं, वर दर्शविलेल्या प्रकारच्या अव्यवस्थेमध्यें समजण्यास सुलभ पडेल अशा रीतीनें, व होईल तितकें करून यथार्थ अशा रीतीनें, स्थानिक राज्यसंबंधी खरी स्थिति वाचकांस सादर करावी. यांत मोठी अडचण येते ती ही कीं, जो जो साधारण नियम ह्मणून काढावा त्याला त्याला स्थलविशेषीं हजारों अपवाद दिसून येतात. आतां अशा अपवादांचें व ठिकाठिकाणीं चालू असलेल्या लहानसान नियमांचें जर वर्णन करीत बसलों, तर वाचकांस घोटाळ्यांत पडल्या सारखें होणार, आणि वर्णनाचा अंत कधीं ही येणार नाहीं. ह्मणून साधारणतः पुष्कळ ठिकाणीं अ-

मलांत असलेल्या नियमांचाच फक्त येथें उल्लेख केला आहे. उदाहरणार्थ, म्युनिसिपालिट्यांतील व्यवस्थेचें वर्णन करतांना केंब्रिज अथवा सिंक्पोर्ट येथें चालू असणारे विशेष प्रकार दर्शविले नाहींत. तसेंच लिवर्पूल व मांचेस्टर यांबद्दल जी विशेष कायद्यांची मालिकाच लागून गेली आहे, तिचे विषयीं ही कांहीं लिहिलें नाहीं. तेव्हां वाचकांस एक वेळां ही सर्वसाधारण सूचना येथें करून ठेवितों कीं, या पुस्तकांत जेथें जेथें साधारणपणें लिहिलेली एखादी गोष्ट आढळेल, तेथें तेथें स्थल विशेषीं अथवा प्रसंगविशेषीं अंमलांत असणाऱ्या कायद्यांपासून किंवा सर्वत्र अंमलांत असणाऱ्या कायद्यांत जे अपवाद आहेत त्यांपासून बाध येत नसल्यास मात्र ती गोष्ट खरी आहे असें समजावें.

---

# स्थानिक राज्यव्यवस्था.

## भाग पहिला.

इंग्लंड देशांत स्थानिक राज्यव्यवस्थेकारितां काय काय तजविजी केल्या आहेत, आणि स्थानिक अंमलदारांच्या हातांत कोणकोणत्या कामांचा बंदोबस्त ठेविला आहे, या विषयीं खुलासा करणें हाच या पुस्तकाचा उद्देश होय. आतां इंग्लंड देशांतील कोणत्याही प्रकरणाचा इतिहास मूळपासून कळल्याविना त्याविषयीं बरोबर समजूत व्हावयाची नाहीं. शिवाय आमच्या स्थानिक कारभाराकरितां उपस्थित झालेल्या ज्या व्यवस्था आहेत, त्या सर्व आपोआप व बेताबातावांचून अशा रीतीनें उत्पन्न झाल्या आहेत. यास्तव जीं निरनिराळीं स्थानिक प्रकरणें मिळून आमची स्थानिक राज्यव्यवस्था बनून राहिली आहे, त्यांच्याविषयीं थोडीशी ऐतिहासिक माहिती त्या त्या प्रकरणाच्या वर्णनांत दिली आहे.

स्थानिकराज्यव्यवस्था या शब्दांत स्थानिक जें पद आहे, तें हुजुरांकडील राज्यव्यवस्थेपासून ही व्यवस्था भिन्न, असें दर्शविण्यास घातलें आहे. ज्या कामाचा साक्षात् संबंध केवळ स्थानविशेषांशीं असून सर्व राष्ट्राशीं नसतो, त्या कामाचा बंदोबस्त स्थानिक व्यवस्थेंत होत असतो. इंग्लंड देशांतील प्रजेचे राष्ट्रीय धर्म ह्मटले ह्मणजे त्यांचे दोन वर्ग करितां येतात. एक सर्व राष्ट्र संबंधीं धर्म, आणि दुसरा शेजारी पाजारी यांचे संबंधीं धर्म. आणि हे जे शेजारी पाजारी यांच्या सबंधाचे धर्म आहेत, त्यांत काय तो स्थानिक राज्याचा अंमल चालतो. त्या धर्मांतही दोन वर्ग आहेत; ह्मणजे एक विधिरूपी आणि एक प्रतिषेधरूपी. विधिरूपी धर्म ह्मणजे जे दीन व अनाथ असतील त्यांस मदत करावी, व त्यांच्या चरितार्थाची तजवीज करावी हे होत. दीन लोकांसंबंधी कायदा, दीन लोकांच्या मुलांस शिक्षण देण्याकरितां केलेली तजवीज, उन्मत्ताश्रम, हिस्पितळें आणि दुखणाईत माणसांकरितां केलेल्या दुसऱ्या व्यवस्था, हीं सर्व या वर्गांत येतात. प्रतिषेधरूपी धर्म ह्मटले ह्मणजे कोणीही परोपद्रव करूं नये, असा जो इंग्रजी का-

यद्याचा नियम आहे, त्यांतच त्यांचा समावेश होतो. स्थानिक राज्याकडून होणारीं कामें ह्मटलीं ह्मणजे अमुक एक नियमित हद्दींत स्वच्छ पाण्याचा पुरवठा करणें; अन्नाच्या पदार्थांत वाईट द्रव्याची मिसळ न करूं देणें; हवा दूषित न होऊं देणें; रस्त्यांतून दिवे बत्तीची तजवीज करणें; आणि रहदारींचे मार्ग साधारण रीतीनें सुरक्षित आणि व्यवहाराला पुरतील असे राखणें; हीं होत. स्वच्छ हवा, शुद्ध अन्न, आणि चांगलें पाणी, यांशिवाय सार्वजनिक आरोग्य मुळींच राहावयाचें नाहीं. आणि हीं किती आवश्यक आहेत या बद्दलची माहिती हल्लीं बरीच पसरत चालली आहे, ही एक आनंदाची गोष्ट समजली पाहिजे.

याप्रमाणें स्थानिकस्वराज्याच्या कर्तव्याबद्दल साधारण ठोकळ मानानें सिद्धांत करण्यास कांहीं अडचण पडत नाहीं, आणि ह्या सिद्धांतांविषयीं वादाला फारशी जागाही नाहीं. परंतु प्रसंगविशेषीं हे साधारण सर्वमान्य सिद्धांत अंमलांत आणण्याचा वेळ आला ह्मणजे अडचणी उपस्थित होत असतात. उदाहरणार्थ, मागें तुरुंगांची व्यवस्था स्थानिक अंमलदारांच्या हातीं होती. जिल्ह्यांतले तुरुंग जस्टिस नांवाचे जे अंमलदार आहेत त्यांचे हाताखालीं होते' आणि शहरांतले तुरुंग म्युनिसिपल कमिट्यांच्या देखरेखी खालीं असत. परंतु १८७७ सालीं एक कायदा ठरविला; त्या अन्वयें आतां सर्व तुरुंगांचा बंदोबस्त स्थानिक अंमलदारांच्या हातांतून निघाला, व तो हुजुराकडून ह्मणजे होम सेक्रेटरी नामक राष्ट्रीय प्रधानाच्या हातून व्हावा असें ठरलें. जेव्हां ह्या कायद्याविषयीं वाटाघाट चालली होती, तेव्हां त्या कायद्याला प्रतिकूल जी मंडळी असे, त्यांचें ह्मणणें असें होतें कीं, तुरुंग दीनाश्रम व उन्मत्ताश्रम यांच्या व्यवस्थेंत कांहीं अंतर नाहीं. आणि ज्यापेक्षां दीनाश्रम व उन्मत्ताश्रम, हीं स्थानिक अंमलदारांच्याच स्वाधीन करून ठेविलीं आहेत, आणि ज्यापेक्षां असें करणें योग्य ही आहे, त्यापेक्षां तुरुंग देखील त्याचप्रमाणें ठेवावे हा वाद फार दिवस व फार मर्मभेदक अशा रीतीनें चालला होता. तथापि या अधिकाराच्या वर्गावर्गीकरण्यांतलें जें मूल बीज, तें सर्वत्र ग्राह्यच आहे, कारण फौजदारी गुन्ह्यासंबंधी न्यायव्यवस्था, अवघ्या देशांत होईल तितकें करून एक सारख्या रीतीनें व्हावी, ही फारच आवश्यक गोष्ट आहे. आतां तुरुंग हे फौजदारी गुन्ह्यासंबंधीं न्यायकरण्यांत

एक मोठें साधन आहे, हें स्पष्टच आहे. आणि जर त्यांचा बंदोबस्त परस्पर निरपेक्ष अशा स्थानिक अंमलदारांच्या हातीं असला तर कैदेची सजा सर्वत्र जशी सारख्याच रीतीनें बजाविली जावी, तशी जाणार नाहीं हेंही उघड आहे.

असो. याप्रमाणें स्थानिक राज्याचीं कर्त्तव्यें काय याचें साधारणत: निरूपण झालें. आतां त्याचें स्वरूप काय तें पाहूं गेलें तर इतकें स्पष्ट आहे कीं, राष्ट्रीय व्यवस्था कशीही असली तरी कांहीं कामें स्थानिक व्यवस्थापकांच्याच हातून झालीं पाहिजेत, मग तीं हुजुराकडून नेमलेल्या अंमलदारांच्या व कारभाऱ्यांच्या हातून होवोत, अथवा त्या त्या स्थानांतल्या राहणाऱ्या प्रजेच्या हातून होवोत. यांपैकीं इंग्लंड देशांत दुसरी तऱ्हाच मुख्यत्वेंकरून प्रचारांत आहे; ह्मणजे हीं कामें त्या त्या स्थानांतल्या रहिवाशांकडून किंवा त्यांच्या प्रतिनिधींकडून होत असतात. या देशांत स्थानिकस्वराज्य सार्वत्रिक आहे. राजनीतिविषयक ग्रंथकर्ते राजकारणदृष्ट्या या स्थितीची मातबरी मोठी समजतात. त्यांच्या मतें स्थानिकस्वराज्याची व्यवस्था जारीनें चालू असणें हा राष्ट्रीय स्वातंत्र्याचा मूलस्तंभच होय. सर आर्स्किन मे ह्मणतात कीं "सर्व जगांतल्या राष्ट्रांमध्यें व्यवस्थितराज्यरीति अशी एक इंग्लंड देशांत काय ती चिरकाल राहिलेली आहे. आणि इंग्लंड देशांतली स्वतंत्रता जी आहे, तिला विशेषें करून कारणीभूत अशी ही तेथील स्वतंत्र स्थानिक व्यवस्थाच होय. साक्सन लोकांच्या काळापासून इंग्लंड माउलीच्या सर्व लेकरांना प्रजेचीं कर्तव्यें व प्रजेची जबाबदारी यांबद्दलचें शिक्षण स्वगृहींच उपलब्ध होत आलेलें आहे. आणि सर्वसाधारण हिताच्या गोष्टींकरितां जूटीनें कारभार करीत आल्यामुळें सार्वजनिक काम त्यांच्या अगदीं अंगवळणीं पडून गेलें आहे." त्याच प्रमाणें अमेरिकेंत इंग्रज लोकांनींच वसविलेला जो प्रांत नवें इंग्लंड नांवाचा आहे, तेथील म्युनिसिपालिट्यांविषयीं लिहितांना डिटाकव्हील ह्मणतात "स्वतंत्र राष्ट्राचें मुख्य बल ह्मटलें ह्मणजे प्रजेच्या स्थानिक मंडळ्यांवर अवलंबून असतें. स्थानिक मंडळ्या आणि राष्ट्रीय स्वतंत्रता यांचा परस्पर संबंध आणि पहिल्या पायरीच्या शाळा व विद्या यांचा संबंध सारिखाच आहे. स्वतंत्रता

आणि विद्या सर्व लोकांना प्राप्त होण्यास त्या मंडळ्या व शाळा उपयोगी पडतात, आणि प्राप्त झाल्यानंतर त्यांचा उपभोग व विनियोग कसा करावा हें ही त्यांपासूनच कळतें. कोणत्याही राष्ट्रांत स्वतंत्र राज्यव्यवस्था जरी स्थापिली, तरी स्थानिक व्यवस्थेचें जें खरें पाणी आहे, तें जर नसलें तर तेथें खरी स्वातंत्र्याची भावना राहूं शकणार नाहीं. क्षणिक हृदयवृत्तीचा कल तसा झाल्यामुळें, अथवा तात्कालिक हिताच्या संबंधानें, किंवा केवळ तसा बनाव बनून आल्यामुळें, स्वातंत्र्याचीं जीं बाह्य लक्षणें तीं उत्पन्न होतील. पण राजायत्त व्यवस्थेला जो त्या पासून क्षणभर धक्का बसला असेल तो पुढेंमागें नाहींसा होऊन ती व्यवस्था पुनः उपस्थित झाल्यावांचून राहणार नाहीं." त्याच प्रकारचा अभिप्राय प्रसिद्ध जान स्टुअर्ट मिल्ल यांनीं ही स्पष्टपणें दिला आहे. ते ह्मणतात "स्वतंत्रतेच्या व्यवस्थांपासून होणाऱ्या कार्यांपैकीं एका कार्याच्या महत्वाविषयीं मी फार निक्षून लिहिलें आहे. त्या कार्यास प्रजेचें सार्वजनिक शिक्षण असें नाव दिलें असतां चालेल. या शिक्षणामध्यें मुख्यत्वें करून साधनीभूत, अशा स्थानिक कारभाराकरितां स्थापिलेल्या व्यवस्था होत." तसेंच १८६९ सालीं आरोग्य संबंधीं जें रॉयल कमिशन नेमण्यांत आलें होतें, त्यांनीं ह्मटलें आहे कीं, "आपल्या राष्ट्रीय बलाढ्यतेचें बीज जें आहे तें स्थानिक स्वराज्य प्रसारांत सांपडेल असा सिद्धांत बहुतेक ठरल्या सारिखाच आहे." स्थानिक व्यवस्थेपासून राजकारणदृष्ट्या होणारे जे फायदे आहेत, त्यांचें प्रतिपादन करणारे अशा प्रकारचे आणखी अभिप्राय अनेक सांपडतील, पण ते येथें नमूद केल्या पासून तादृश फल होणार नाहीं. कारण इंग्लंड देशांत स्थानिकस्वराज्याला कांहींएक धास्ती नाहीं. स्थानिकस्वराज्याचा अंमल येथें वाढत जाणार आहे, कमी होणार नाहीं. कायदे करण्याचे कामांत पार्लमेंट सभेचे हात पाय अगदीं मोडून गेल्यासारखे झाले आहेत. आणि त्या स्थितीला जरूर योजिलाच पाहिजे असा उपाय ह्मटला ह्मणजे स्थानिक कमिट्यांला अधिकाधिक मुखत्यारी देत जावी हाच एक दिसतो. इतःपर कायदे करण्याचें काम हुजुराकडून होऊन त्या कायद्यांचा अंमल चहूंकडे व्हावा असें चालूं शकणार नाहीं. त्या त्या स्थानींच कायदे करण्यांत आले पाहिजेत, आणि त्यांचा त्या त्या हद्दींत अंमल

चालला पाहिजे. शिवाय तसे अभिप्राय नमूद न करण्याला दुसरें एक कारण आहे. तें असें कीं कोणत्याही स्वतंत्र राष्ट्राच्या चरित्रांत स्थानिक व्यवस्थेचा परिणाम मोठा आहे असें जरी कबूल केलें, तरी तो परिणाम कोणत्या प्रकारचा आहे हें दाखवून देणें कांहीं सुलभ काम नाहीं. उदाहरणार्थ, स्वतंत्र व परानपेक्ष स्थानिक व्यवस्था चालू असली तर तिच्यापासून हुजुराकडे व्यवस्थित राज्यरीति अवश्य उपस्थित होते, आणि सर्व प्रजेमध्यें स्वातंत्र्याची भावना फैलावते, हा सिद्धांत खरा आहे, किंवा स्वतंत्र प्रजेनें व्यवस्थित राज्यरीति चालविली असतां स्वतंत्र स्थानिक व्यवस्था त्यापासून नेमानें उत्पन्न होते, हा खरा आहे? यांपैकीं कार्य कोणतें आणि कारण कोणतें? अथवा हे दोन्ही सिद्धांत खोटे असून तिसराच एक पक्ष खरा, कीं हुजुराकडे व्यवस्थित राज्यरीति आणि सुयंत्र चालणारी स्थानिक व्यवस्था यांच्यामध्यें कार्यकारणभावच मुळीं नाहीं, आणि हीं दोन्हीं सर्व प्रजेंत प्रसृत झालेल्या स्वातंत्र्यभावनेचींच केवळ बाह्य आणि दृश्य लक्षणें असून त्यांचा प्रजास्वभावावर प्रतिपरिणाम होत असतो? हें एक मोठें गूढच समजलें पाहिजे, आणि अशाच प्रकारचीं कार्यकारणभावासंबंधी गूढें इतर पुष्कळ ठिकाणीं आढळांत येतात. पण तें कसेंही असो, इतकें खाचित आहे कीं, सर्वांशीं पूर्ण अशी जरी स्थानिक व्यवस्था एखादे ठिकाणीं अंमलांत असली, तरी तेथें राजकीय स्वातंत्र्य असलेंच पाहिजे असा कांहीं नियम बांधतां येत नाहीं. उदाहरण, मुसलमान लोकांच्या कारकीर्दींत उत्तर हिंदुस्थानांतल्या गांवांत स्थानिक स्वातंत्र्याची हानि मुळींच झाली नाहीं. हिंदुस्थानदेश पुनः पुनः निरनिराळे लोकांनीं काबीज केला. राजायत्त व्यवस्था सुरू असून एकामागें एक असे पुष्कळ राजे होऊन गेले. परंतु गांवकरी लोक आलेल्या प्रसंगाला पाठ देऊन पुढें आपला क्रम पूर्वीं प्रमाणेंच सुरळीत चालू ठेवीत. जोंपर्यंत गांवांकडे मागितलेले कर पोंहचत, तोंपर्यंत त्यांच्या स्थानिक व्यवस्थेंत कोणी हात घालीत नसे. पण स्थानिक स्वातंत्र्य इतकें असतांही हिंदुस्थानांतील गांवकऱ्यांचे राजकीय हक्क आणि त्यांचीं कर्त्तव्यें काय ह्मणून पाहूं गेलें, तर सर्व मिळून इतकेंच दृष्टोत्पत्तीस येतें कीं, जमिनीच्या साऱ्याबद्दल जितका प्रत्येकाच्या हिशाला येईल तितका गल्ला त्यानें द्यावा आणि

तोही दर एक गांवकऱ्यानें परभारें द्यावा असें नव्हतें, तर सर्व गांवकऱ्यांनीं मिळून. या उपर त्यांना राजकीय हक्कही नव्हते आणि कर्तव्यही नव्हतें. ब्रिटिश कारकीर्दींत साऱ्याबद्दल गल्ला घेण्यांत येत नाहीं, पैसाच घेतात; आणि साराही मन मानेल तसा बदलत नाहीं, नियमित ठरवून दिलेला आहे. तथापि हुजुरांचा आणि गांवकऱ्यांचा संबंध तद्देशीयांच्या कारकीर्दींत जसा होता, तसाच बहुतेक हल्लींही आहे. त्यांच्या स्वस्थतेच्या स्थितीमध्यें राजकारणी उलाढालीपासून कांहीं चलविचल होत नाहीं. गांवकऱ्याला जमिनीचा सारा द्यावा लागतो तो एक जबरदस्तीचाच प्रकार इतकें मात्र त्याला वाटतें. पुढें त्या पैशाचा व्यय कसा होतो, तें त्याला कळत ही नाहीं, आणि त्या विषयीं त्याला पर्वाही नाहीं. जे कर देतात त्यांना त्यांच्या व्ययाविषयीं कांहीं सत्ता जरूर असली पाहिजे, अथवा त्यांच्या व्ययापासून त्यांना जरूर फायदा झाला पाहिजे, असे त्याच्या स्वप्नीं देखील विचार येत नाहीं. आपल्या घरचा आणि आपल्या गांवचा कारभार यांबद्दल कायती त्याला कळकळ. त्या पलीकडच्या कारभाराशीं तो मुळींच संबंध ठेवीत नाहीं. तथापि एखाद्या हिंदुस्थानी गांवांतल्या पाटिलाच्या हातीं इंग्रजी वेस्ट्रीच्या अध्यक्षापेक्षां सत्ता बरीच जास्त आहे. गांवचें पंचायत अथवा ग्रामवृद्धांची मंडळी यांना आपल्या कोणत्याही वेस्ट्रीपेक्षां सत्ता फारच अधिक असते, आणि गांवांतल्या कारभारासंबंधीं गांवाची स्वतंत्रता आपल्या इंग्लंडांतील पारिशांपेक्षां अथवा नवीन इंग्लंडांतल्या म्युनिसिपालिट्यांपेक्षां जास्त आहे, यांत कांहीं संशय नाहीं.

ही जी येथें तुलना केली आहे, तिच्यामध्यें जरा खोल अर्थ आहे. हिंदुस्थानांतील गांव, इंग्लंडांतील पारिश, आणि अमेरिकेंतील म्युनिसिपालिटी या सर्वांचें खरोखरच जवळचें नातें आहे. पारिश आणि म्युनिसिपालिटी यांचें मूळचें रूप प्राचीन ट्युटानिक लोकांमध्यें मार्क ह्मणून ज्याला ह्मणत तेंच होय. आणि उत्तर हिंदुस्थानांतले रहिवासी हे ही ट्युटानिक लोकांसारखेच आर्यवंशांतले असून, तेथील गांव व ट्यूटन लोकांचा मार्क यांचा फार निकट संबंध आहे. मार्काचे जे कांहीं आवश्यक ह्मणून धर्म आहेत, ते सर्व त्या गांवांत

दिसून येतात. मार्क हा समुदाय जसा अर्थशास्त्रदृष्टया व कारभाराच्या संबंधानें एक व्यक्तीसारिखा गणला जातो, तद्वतच गांव ही गणला जातो. दोन्हींमध्यें कांहीं कुळें एकत्र होऊन राहतात, तीं आपआपल्यामध्यें खरें खोटें मूळचें कांहीं तरी नातें कल्पितात. आणि सर्व जमिनीवर समाईक मालकीचा हक्क चालवितात. ज्या जमिनीची वहिवाट सर्व कुळें मिळून यारीतीनें चालवितात, ती जमीन एकेका कुळांत देखील अशाच प्रकारें वाटलेली असते. आणि या सर्वजनसमाजांतील मनुष्यांचे परस्पर संबंधाचे हक्क व कर्त्तव्यकर्में हीं ही अशाच प्रकारें ठरविलेलीं असतात. कारभार चालविण्याच्या संबंधाचे जे मार्काचे धर्म आहेत, ते इंग्लंडांत हल्लीं पारिश अथवा म्युनिसिपालिटी यांत काय ते दिसतात. आणि अर्थशास्त्रदृष्ठया त्यांचे जे धर्म आहेत, ते आतां मानराच्या वहिवाटी गुरचरणीचे हक्क वगैरे या रूपानें कोठें कोठें मात्र राहिलेले आढळतात, आणि तेही लयाच्याच मार्गास लागलेले आहेत. हिंदुस्थानांत इतकें रूपांतर झालें नाहीं. तेथें थोड्याच वर्षांमागें प्रजेची सामाजिक स्थिति ह्मणजे निखालस विक्रियारहित अशीच दिसत असे. आज जें गांवांचें स्वरूप आहे, तेंच शेंकडों कदाचित् हजारों वर्षांमागचें स्वरूप. यामुळें हिंदुस्थानांत जे इंग्रज लोक जातात त्यांना मानुषावस्थेच्या प्राचीन तऱ्हा अद्यापि जशाच्या तशाच राहिलेल्या दृष्टीस पडतात. आणि सर हेन्री मेन यांनीं दाखवून दिलें आहे कीं, आमच्या स्थानिक चाली व व्यवस्था यांमध्यें ज्या कांहीं गोष्टी समजण्यास कठीण पडतात त्यांचा खुलासा होण्याला हिंदुस्थानांतील एखाद्या गांवांच्या स्थितीचें अवलोकन हें मोठें चांगलें साधन होय. आतां आर्यवंशांतल्याच दोन शाखांच्या व्यवस्थेमध्यें सुरुवातीला इतकें साम्य असतां पुढील चरित्रांत इतकी भिन्नता दिसून यावी हा एक मोठा चमत्कारच ह्मटला पाहिजे. पण त्या भिन्नतेचें कारण कांहींही असो. इतकें खचित आहे कीं, हिंदुस्थानच्या इतिहासावरून आपल्याला एका गोष्टीविषयीं खात्री होते. ती गोष्ट ही कीं, प्रतिनिधिसत्ताक राज्य कोणत्याही प्रकारें नसतांना देखील, स्थानिकस्वराज्याची व्यवस्था अतिशय दृढ व चिरस्थायी अशा दशेस आलेली असूं शकते. आणि ती व्यवस्था, राष्ट्रीय स्वातंत्र्याची व्यवस्था ज्यांच्या ध्यानीं मनींही नाहीं,

अशा लोकांच्या हातून देखील सुयंत्र रीतीनें चालूं शकते. याचें बीज कदाचित् असें असण्याचा संभव आहे, कीं राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि व्यवस्थित राज्यरीति यांचा संबंध मोठ्या शहरांतल्या व नगरांतल्या स्वराज्यव्यवस्थेशीं अधिक निकट असेल, आणि कदाचित् गांवच्या गांवासारिख्या लहान व बलहीन व्यूहाशीं नसेल. निदान इतकें खचित आहे कीं, इंग्लंड देशावर ज्या वेळीं प्रसंग आला, त्यावेळीं इंग्लंड देशाच्या स्वातंत्र्याकरितां तेथील शहरांनींच आपली तरवार गाजविली. ही कल्पना जर खरी असली तर इंग्लंड देशांतील म्युनिसिपालिट्यांच्या मासल्याबरहुकूम हिंदुस्थानांत म्युनिसिपालिट्या स्थापण्याचें जें काम सुरू आहे, तें एका महत्वाच्या राजनीतिविषयक प्रयोगाप्रमाणेंच मानिलें पाहिजे. हिंदुस्थानांतील जनसमाज विक्रियारहित जरी दिसतो, आणि आहे ही खरा, तरी आतां तेथें भावी चळवळीचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. पश्चिम खंडाकडील सुधारणा आणि इंग्रजी कायदे यांचा तद्देशीय लोकांच्या रीतिभातीशीं व व्यवस्थेशीं संबंध झाला ह्मणजे तेथें विक्रिया जरूर सुरू होते. बोभाटा कांहीं होत नाहीं. आणि कोणाला कांहीं कळतही नाहीं. पण त्या रीतिभातीचा आणि त्या व्यवस्थांचा हळु हळु ऱ्हास होऊं लागतो. इंग्रजी न्यायाची रीत, आणि हुकूमनाम्याच्या बजावणीकरितां जमिनीची विक्री करावी हा नियम, यामुळें हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं जुनी ग्रामव्यवस्था मोडकळीस येऊं लागली आहे. पुष्कळ मोठाल्या शहरांमध्यें इंग्रजी विद्येचा प्रसार विशेषें करून सधन लोकांत झाल्यामुळें ज्ञातिभेदाचें महत्त्व मोडूं लागलें आहे. अशीं बहुत चिन्हें दृष्टोत्पत्तीस येताहेत. त्याचप्रमाणें तद्देशीयांमध्यें असणाऱ्या इतर व्यवस्था, ह्मणजे ज्या अन्यत्रही प्रचारांत आहेत, त्यांना देखील उतरती कळाच लागली आहे. याप्रमाणें एकीकडून तद्देशीयांमध्यें जीं सामाजिक बंधनें होतीं तीं सैल पडत चाललीं आहेत. पण दुसरीकडून, तेथील इंग्रजी राज्यकर्ते ज्या म्युनिसिपालिट्या व त्याच प्रकारच्या दुसऱ्या व्यवस्था स्थापीत आहेत, त्यांच्या योगानें लोकांना स्वराज्याचा पाठ घालून देऊन तद्देशीय जनसमाजस्थितीला ते अधिक चिरस्थायी व हितावह अशा पायावर बसवून देत आहेत. या प्रयोगाचा परिणाम काय होणार ते परमेश्वरा-

ला माहित. प्रयोग मोठा विचारास पात्र आहे यांत संशय नाहीं. पण त्याचें पर्यवसान काय होईल तें हल्लीं कळण्यास मुळींच मार्ग नाहीं. तरी अंत येई तों पर्यंत त्यांत एक फायदा आहे. आपल्याला इंग्लंडांत राहून तपास केला असतां त्या प्रयोगापासून उपयुक्त ज्ञान मिळेल. आणि त्यापासून होणाऱ्या खर्चाचा किंवा जोखमाचा बोजा आपल्यावर पडणार नाहीं.

या उपर येथें स्थानिक स्वराज्याविषयीं शास्त्रीय विचार करण्यांत कांहीं तादृश हांशील नाहीं. स्थानिकराज्यव्यवस्था आणि राष्ट्रीय स्वातंत्र्य यांचा परस्पर संबंध कोणत्या प्रकारचा आहे या शास्त्रीय मुद्याचा ठराव करणें आपण दुसऱ्यांवर सोंपूं. या पुस्तकाचा हेतु शास्त्रीय नाहीं. केवळ व्यवहारोपयोगी आहे. आणि तो हेतु हाच कीं इंग्लंड देशांतल्या प्रजेला आपले हक्क व आपलीं कर्तव्यें काय आहेत हें कळावें. ह्मणून हे शास्त्रीय विचार इतक्यांतच आटोपून, पुढील भागांत आमच्या सर्व स्थानिकव्यवस्थांचा एकत्र तपास केला असतां स्वरूप कसें दिसतें हें दाखवून देण्याचा आह्मीं यत्न करूं. त्याच्याही पुढील भागामध्यें निरनिराळे स्थानिक प्रांत कसकसे केले आहेत, आणि त्या त्या प्रांतांत अधिकारांची वाटणी कसकशी केली आहे, याविषयीं तपशीलवार माहिती देण्यांत येईल. परंतु या सर्व विषयांचें साधारणतः निरूपण करण्यापूर्वी इंग्लंड देशांतली हुजुराकडून होणारी व्यवस्था व स्थानिक व्यवस्था यांच्यातील ठळक ठळक धर्मांची तुलना करून त्यांच्यामध्यें साम्य कितपत आहे, व भिन्नता कितपत आहे, हें दाखविलें असतां ठीक पडेल.

आतां स्थानिक कारभारांत आणि हुजुराकडील कारभारांत व्यवस्था बहुतेकांशीं प्रतिनिधिसत्ताकच आहे. आमच्या हुजुराकडील व्यवस्था आणि स्थानिक व्यवस्था दोन्ही क्रमाक्रमानें आपोआप हल्लींच्या स्थितीस आल्या आहेत; आणि दोन्हींमध्यें दुःश्लिष्टत्वाचीं उदाहरणें ओतप्रोत भरून राहिलेलीं आढळतील. परंतु इंग्रज लोकांनां दुःश्लिष्टत्वाची फारशी पर्वा नाहीं. जों पर्यंत कोणत्याही व्यवस्थेखालीं व्यवहार साधारणपणें चांगल्या रीतीनें चालत आहे तोंपर्यंत ती व्यवस्था दुःश्लिष्ट आहे अथवा ज्या तडजोडीनें ती व्यवस्था अंमलांत येत आहे ती

शास्त्रोक्त रीतीप्रमाणें नाहीं या विचारांत ते पडतच नाहींत. उदाहरणार्थ पारिशांची व्यवस्था घ्या. स्थानिक कामांत व्यवस्था प्रतिनिधिसत्ताक असावी असा जो साधारण नियम आहे, त्यास येथें मोठा ठळक अपवाद येतो. कारण पारिशांच्या कारभारांत अंमलदार ह्मटले ह्मणजे जस्टिस नांवाचे लोक, आणि त्यांची नेमणूक तर लार्ड लेफटनेंटांनीं फर्माविल्यावरून हुजुराकडून होत असते. आतां शास्त्रीय रीतीनें पाहूं गेल्यास हुजुराकडील व्यवस्थेंत अथवा दुसऱ्या स्थानिक व्यवस्थेंत प्रतिनिधिसत्ता असण्याबद्दल जीं सबळ कारणें आहेत तींच या ठिकाणींही लागू होतात हें स्पष्ट आहे. तसेंच मागील इतिहासाच्या दृष्टीनें पाहतांही पारिशांत प्रतिनिधिसत्ताक व्यवस्था असावी हेंच रास्त आहे. कारण साक्सन लोकांच्या कालांत सर्व व्यवस्था प्रतिनिधिसत्ताकच होती. परंतु हल्लींची स्थिति आहे, तिच्यांतलें बीज हें कीं, पारिशांतला कारभार आज मितीपर्यंत जरी केवळ निस्पृह बुद्धीनें चाललेला नसला, तथापि काठकसरीनें व सचोटीनें चालला आहे यांत संदेह नाहीं. आणि यामुळें झालें आहे काय? यद्यपि ही व्यवस्था इंग्रज लोकांच्या इतर व्यवस्थांपासून इतकी भिन्न आहे, आणि जरी या व्यवस्थेंत सर्व कारभार केवळ एकाच मंडलांतून घेतलेल्या अंमलदारांच्या हातीं राहतो, तरी आमच्या लोकांनीं याविषयीं कांहीं हरकत घेतली नाहीं. प्रतिनिधिघटित पारिश कमिट्या पुनः स्थापन करण्याकरितां अनेक बेत सुचविण्यांत आले आहेत, पण आजपर्यंत त्या सर्वांचा तात्काल लयच होऊन गेला आहे. पुढल्या खेपेस कदाचित् यश आलें तर येईल.

असो. प्रतिनिधि निवडण्याचे कामांत संमति देण्याचा हक्क जो आहे तो जमीन अथवा घरें यांच्या मालकीमुळें किंवा वहिवाटीमुळें मिळतो. आणी पार्लमेंट सभेकरितां व स्थानिक राज्यव्यवस्थेकरितां निवडणूक या संबंधानें सारखीच. सरकारी नोटा किती ही असल्या, किंवा प्राप्तीवरील कर किती ही भरला, तथापि तो हक्क मिळत नाहीं. परंतु करांच्या संबंधानें स्थानिक कर आणि राष्ट्रीय कर यांत इतकें अंतर आहे कीं, राष्ट्रीय करांचा बोजा स्थावर व जंगम यां दोन्ही प्रकारच्या मिळकतीवर पडतो, पण स्थानिक कर फक्त जमीन व घरें

यांवर घेण्यांत येतात. हा जो करभारासंबंधी फेर आहे याचा दोन मुद्यां-वर विचार करण्यासारिखा आहे. एक मुद्दा, हुजुराकडून स्थानिक कामांत मदत होण्याकरितां जो पैसा देतात त्या संबंधाचा; आणि दुसरा मुद्दा, स्थानिक कर जंगम मिळकतीवर घ्यावे किंवा न घ्यावे या संबंधाचा. स्थानिक खर्चांतल्या बऱ्याच अंशापासून फायदा जमीन व घरें यांस होतो, हें खरें आहे. पण दीन लोकांस मदत, आणि कनिष्ट प्रतीचें शिक्षण यांचा कांहीं स्थानिक मिळकतीशीं विशेष संबंध नाहीं. यावरून अशा प्रकारच्या बाबतींवर जो खर्च होतो त्यांतला निदान कांहीं अंश तरी जसा दृश्य खर्चावर ह्मणजे जमीनजुमल्यासंबंधी खर्चावर पडतो तसाच वास्तविक प्राप्तीवर ही पडावा हें रास्त दिसतें. असो. पार्लमेंट सभेचे सभासद निवडण्याचे कामांत दर एक मनुष्यास संमति देण्याचा हक्क सारिखाच आहे; ह्मणजे साधारणतः संमतींची संख्या कितीजण निवडायाचे यावर अवलंबून असते. स्थानिक निवडणुकींत संमति देण्याच्या निरनिराळ्या रीति अंमलांत आल्या आहेत. कांहीं बाबतींत, ह्मणजे उदाहरणार्थ स्थानिक कमिट्यांच्या निवडणुकींत, अनेक संमतीची रीत आहे; ह्मणजे स्थानिक कराबद्दल जितकी रकम भरावी लागत असेल तिच्या मानानें एकपासून साहापर्यंत संमति एक एका मनुष्यास देतां येतात. मि. मिल्ल साहेब स्थानिक कारभारांत हीच रीत पसंत करितात. ते ह्मणतात कीं राष्ट्रीय पार्लमेंट सभेकरितां आणि या सभांकरितां ज्या निवडणुकी करावयाच्या, त्या दोन्ही मध्यें अनेक संमतीच्या रीतीस अनुकूल अशीं सबळ प्रमाणें सारखींच आहेत. आणि हा अनेक संमतींचा हक्क द्रव्यसंबंधीं लायकीवरूनच मिळण्याला पार्लमेंट सभेच्या संबंधानें जी समर्पक हरकत आहे, तिची स्थानिक सभेच्या संबंधानें मातबरी फारशी नाहीं. कारण स्थानिक सभेच्या कर्तव्यांत, द्रव्याचा प्रामाणिक रीतीनें व काटकसरीनें व्यय करणें हें जितकें अतिशय महत्वाचें काम आहे, तितकें राष्ट्रीय सभेंत नाहीं, आणि यामुळें ज्यांच्यावर द्रव्यसंबंधानें जबाबदारी जास्त आहे, त्यांना या स्थानिक कारभारांत अधिक वजन असावें हें न्याय्यही असून फायदेशीरही आहे.

या दोन व्यवस्थांमधला दुसरा भेद ह्मटला ह्मणजे स्त्रियांच्या हक्का

संबंधीं. पार्लमेंटसभेच्या निवडणुकींत स्त्रियांना अभिप्राय देण्याचा हक्कही नाहीं, आणि त्यांना सभासदही होतां येत नाहीं. पण इतर गोष्टींसंबंधानें लायकी असल्यास स्थानिक व्यवस्थेसंबंधी सर्व हक्क स्त्रियांना आहेत. आणि स्थानिक हुद्यांपैकीं बहुतेक हुद्यांवर त्यांची नेमणूक ही कारितां येते. न्यायाधिकाऱ्यांनीं ठराव केले आहेत कीं, स्त्रियांना पुढें लिहिलेल्या हुद्यांवर नेमण्यास कायद्याची हरकत नाहीं. ते असेः—नळतपासनीस, दीनाश्रमव्यवस्थापक, तुरुंगावरील अधिकारी, बंदिखान्यावरील अंमलदार, पारिशांतील पोलीस कनिष्टेबल, पार्लमेंट सभेच्या निवडणुकीवरील संमतिग्राहक, दीनजनांची देखरेख करणारा, व त्यांची जोगवण करणारा. देखरेख करणाऱ्याच्या हुद्याविषयीं जेव्हां वाद निघाला तेव्हां न्यायाधीश लोकांनीं असें बोलून दाखविलें कीं, पुरुषाची नेमणूक करावी हाच मुख्यपक्ष, परंतु जर पुरुष न मिळाला तर स्त्री नेमण्यास हरकत नाहीं. आलिकडे शाळांच्या कमिट्यांचें काम करण्यास स्त्रियांनीं अनेक वेळां आपली इच्छा दर्शविली आहे. परंतु या खेरीज दुसऱ्या स्थानिक कामांत हात घालण्याविषयीं त्यांनीं कांहीं उत्साह दाखविला नाहीं. स्थानिक देशभक्तीपासून, आणि आपलें राजकारणांतलें व साधारण व्यवहारांतलें कौशल्य दाखविण्याची सवड मिळते या विचारावरून, स्थानिक हुद्यांकडे लक्ष्य पोहोंचवावें असें स्त्रियांस अजून वांटू लागलें नाहीं. असें असतां ज्याअर्थीं स्त्रीहक्काविषयीं हाकाहाक सुरु आहेच, त्याअर्थीं त्या हाकाहाकींतलें बीज कदाचित् हेंच असावें, कीं पार्लमेंटसभेकरितां सभासद निवडण्याचा हक्क त्यांना दिलेला नाहीं ह्मणून मात्र तो मिळण्याविषयीं इतका हुरूप दृष्टोत्पत्तीस येत आहे.

वर सांगितल्या प्रमाणें जरी स्थानिक व हुजुराकडील राज्यव्यवस्था या दोहोंचाही पाया प्रतिनिधिसत्ताकच आहे; तथापि दोन्ही व्यवस्थामध्यें कारभार पाहण्यास जीं माणसें निवडण्यांत येतात त्यांच्यामध्यें एक विशेष प्रकारचें अंतर दिसून येत असतें. ठोकळ रीतीनें पहातां असें दिसतें कीं हुजुराकडील व्यवस्थेमध्यें मूळ मुखत्यारी जनसमुदायाकडे असून त्यांचे हुकूम बजाविण्याचें काम श्रेष्ठ वर्गांतले लोक, ह्मणजे ज्यांनां उत्कृष्ट प्रतीचें शिक्षण प्राप्त झालें आहे व जे उत्तम बुद्धीचे आहेत, त्यांचेकडे आहे. पण स्थानिक कारभार जो आहे

तो बहुतकरून सर्व लहान लहान दुकानदारांच्या हातीं पडला आहे. आणि सभासद निवडण्याच्या कामांत देखील वर्चस्व त्याच लोकाचें आहे. आतां मध्यमवर्गीय लोकांतले जे खालच्या प्रतीचे लोक त्यांचे प्रतिनिधि या स्थानिक व्यवस्था पहाणाऱ्या मंडळ्यांमध्यें असावे हें अगदीं रास्त आहे; पण विशेष सुशिक्षित लोक या स्थानिक व्यवस्थेकडे मुळींच लक्ष्य पुरवीत नाहींत, व स्थानिक मंडळ्यांमध्यें कामकरी लोकांचे प्रतिनिधि अगदीं नसतात, हीं दोन मोठीं व उत्तरोत्तर वाढणारीं अरिष्टें आहेत. पहिल्याचा विचार करूं लागलों ह्मणजे असें दिसतें कीं, लोकसंख्या जसजशी वाढत जाते, आणि पदार्थविज्ञानशास्त्राच्या योगानें सार्वजनिक आरोग्य रक्षण व त्याची आवश्यक कारणसामग्री या विषयींचें ज्ञान जसजसें वृद्धिंगत होतें, तसतशीं स्थानिक राज्य व्यवस्थेंत समावेश पावणारीं प्रकरणें ही अधिकाधिक भानगडीचीं अशीं होऊं लागतात. आणि त्यांचा योग्य निकाल करण्यास सुशिक्षित बुद्धीची अधिकाधिक जरूर लागू लागते. दुसऱ्या अरिष्टा बद्दल हकीकत अशी आहेकीं स्थानिक कारभारांतल्या पुष्कळ प्रकरणांचा कामकरी लोकांशीं साक्षात्, आणि कांहींचा फक्त त्यांच्याशींच, संबंध असतो; ह्मणजे उदाहरणार्थ कनिष्ठ प्रतीचें शिक्षण, दीन लोकांस मदत, आणि पुष्कळ एक सार्वजानिक आरोग्यां करितां होणाऱ्या सुधारणा. तेव्हां अशी ज्याअर्थीं स्थिति आहे, त्याअर्थीं कारभार चालविणाऱ्या मंडळ्यांमध्यें कामकरी लोकांनीं स्वतः नेमिलेले असे त्यांच्या तर्फेचे कांहीं सभासद असावे हें नीट आहे. कारण, कांहीं झालें तरी जोड्यांत काय गोम आहे ती जोडा वापरणाराला जशी समजते तशी इतर कोणाला समजत नाहीं.

या शिवाय हुजुराकडील व स्थानिक राज्यव्यवस्था यामधले भेद व साम्य हीं पुढें वाचतां वाचतां लक्ष्यांत येतीलच, तेव्हां येथें त्यां विषयीं आणखी उल्लेख करण्याचें प्रयोजन नाहीं.

आतां येथेंच फ्रान्स देशांतील स्थितीचें वर्णन दिलें तर तें तुलना करण्यास उपयोगी पडेल, आणि त्या स्थितीची आणि इंग्लंडांतील स्थितीची तुलना करून पाहिली ह्मणजे दोहोंतले ही गुणदोष विशेष व्यक्त होतील. स्थानिक व्यवस्थेच्या संबंधानें फ्रान्स देशाचे ८६ भाग केले

आहेत. ते ठोकळमानानें ह्मटले ह्मणजे इंग्लंडांतील कौंटीसारखे आहेत. त्या भागांना ते डिपार्टमेंट ह्मणतात. प्रत्येक डिपार्टमेंटाचे कांहीं अंराडिस्मेंट ह्मणून विभाग आहेत. आणि त्या विभागाचेंही काम्यून ह्मणून पोट विभाग केलेले आहेत. तेव्हां कारभाराच्या बाबतींत काम्यून हा मूळभाग अथवा एक व्यक्ति असा धरिलेला आहे. आणि त्या पेक्षां मोठा जो प्रांत आहे तो अमुक इतके मूळभाग मिळून होत असतो. सर्व काम्युनांची संख्या ३६,९८९ आहे. ह्मणजे इंग्लंडांतील पारिश जे आहेत त्यांच्या दुप्पट संख्या झाली. डिपार्टमेंटाचें सर्व काम चालविणारे एक प्रेफे आणि एक कोन्सेल जनरल असे असतात. प्रेफे जो असतो त्याच्याकडे सर्व-कामें बजाविण्याचा अंमल असतो. आणि कोन्सेलाकडे केवळ विचार वगैरे करून हुकूम देण्याचा अधिकार असतो. प्रेफे हा हुजुराकडील पगारी नोकर असतो, व त्याच्यावर साक्षात् सत्ता काय ती हुजुराकडलीच. सर्व स्थानिक कामांमध्यें तो हुजुराकडील प्रतिनिधिच ह्मणायाचा. कोन्सेलाचा अध्यक्ष तोच असतो व आपल्या प्रांताचा कारभार चालविणारा मुख्य अंमलदार तोच होय. पोलीस सर्व त्याचे हाताखालीं, आणि कायद्याचा भंग न होऊं देणें व कायद्याचे हुकूम बजाविणें, हें सर्व काम त्याचें आहे. दिवाणी व फौजदारी कामांत त्याच्या मदतीला कोन्सेल दे प्रेफेचूर ह्मणून एक लहानशी मंडळी असते तिची नेमणूक हुजुराकडूनच होते. कोन्सेल जनरल ह्मणून जें पूर्वी सांगितलें आहे त्यांतील सभासद मात्र निवडलेले असतात. सहा सहा वर्षेपर्यंत त्यांचा अधिकार चालतो. त्यांपैकीं निम्मे सभासद तीन तीन वर्षांनीं पाळी पाळीनें हुद्यावरून निघून जातात. त्यांच्या सभा सर्व जाहीर सभाच असतात, व झालेल्या कामाचें टिपण वर्तमानपत्रांस द्यावें लागतें. आणि या संबंधी एक असा कायदा आहे कीं, कोणत्याही वर्तमानपत्रास त्या कोन्सेलाच्या एखाद्या ठरावावर टीका करणें असल्यास तो ठराव आपल्या पत्राच्या त्यांच अंकांत छापिल्याशिवाय तसें करितां येत नाहीं. हा नियम दिसण्याला अंमळ चमत्कारिक दिसतो पण मोठा शहाणपणाचा आहे. डिपार्टमेंटाकडून जमिनीचा सारा, घरपट्टी, अथवा माणूसपट्टी या बाबींबद्दल किती रकम आदा आली पाहिजे याचा ठराव कोन्सेल करिते. त्याच प्रमाणें

ती रकम सर्व अरांडिस्मेंटांमध्यें वांटून देतें. आणि या वांटपाबद्दल कोणत्याही अरांडिस्मेंटाची कांहीं हरकत असल्यास त्याबद्दलच्या आपिलाचा तें निकाल करितें. डिपार्टमेंटाच्या सर्व मिळकतीची वहिवाट तें कोन्सेलच करितें. सडका बांधण्याच्या, आणि पूल व तरी स्थापण्याच्या, कामावर देखरेख चालवितें; आणि त्यांची वापरण्यास लायकी असण्याबद्दलची जबाबदारी कोन्सेलावरच आहे. सामान्यत: डिपार्टमेंटाच्या हितार्थी जीं सार्वजनिक कामें असतील, त्यांची देखरेख तें कोन्सेल ठेवितें. उन्मत्ताश्रम, दीन मुलांचा सांभाळ आणि डिपार्टमेंटांतील दीनाश्रम, हीं सर्व त्यांच्याच अमलांत येतात. बाजार अथवा जत्रा यांबद्दल काम्युनानीं केलेल्या ठरावांचा तपास तें ठेवितें. आणि मालपट्टीचे फेरफारांचाही तपास तेंच ठेवितें. डिपार्टमेंटाचे सर्व हिशेब तपासण्याचें काम त्यांचेकडेच आहे. डिपार्टमेंटाच्या तर्फेनें जे पैसे देणें असतील ते सर्व हुजुराकडील अंमलदारांच्या मार्फतच देण्यांत येतात. डिपार्टमेंटाचें आयव्ययपत्रक दर वर्षास प्रसिद्ध होत असतें. त्यांत साधारण आयाच्या रकमा, आणि नैमित्तिक ह्मणजे विशेष कारणांकरितां बसविलेले कर अथवा उसनवारी काढिलेले पैसे, निरनिराळे दाखविलेले असतात. त्याचप्रमाणें त्यांत साधारण व नैमित्तिक खर्चाच्या रकमाही निरनिराळ्या दर्शविल्या जातात. अरांडिस्मेंट यांनां डिपार्टमेंटासारिखा संभूयकारित्वाचा अधिकार दिलेला नसतो. ते केवळ स्थल विभाग मात्र आहेत. त्यांत प्रमुख एक सूप्रेफे व दुसरे निवडलेले कौन्सलदार असे असतात. अरांडिस्मेंटांवर जो पट्टीचा फाळा कोन्सेलानें ठरविला असेल त्यावर अपील करणें झाल्यास हे करितात. आणि दरएक काम्युनानें त्या फाळ्यांतला किती हिस्सा द्यावा याचाही ठराव हेच करितात. काम्यूनाला संभूयकारित्वाचा अधिकार आहे. त्यांचा कारभार चालविणारे मेयर आणि म्युनिसिपल कोन्सेल असे असतात. मेयराची नेमणूक हुजुराकडून होत असते. कोन्सेलदार मात्र प्रजेनें निवडले जातात. मेयराला कांहीं पगार नसतो, आणि त्याला हुद्यावरून तूर्त बरतर्फ करण्याचा अधिकार प्रेफे याला आहे. जन्म मृत्यु आणि विवाह नोंदण्याचें काम त्याचें आहे. काम्यून सभेंत तो हुजुराकडला असतो. आणि इतर

लोकांकडील व्यवहारांत तो काम्यूनाच्या तर्फेनें वागत असतो. काम्यूनाचे बहुतेक अंमलदार नेमण्याचें काम त्याचें आहे. आणि उपद्रवनिरसन व इतर सार्वजनिक आरोग्याविषयींच्या तजविजी, अन्न सामग्रीची विक्री, रस्त्यांतून जाण्या येण्या बद्दलची व्यवस्था, सार्वजानिक स्थलांत बेतबात ठेवणें, व नाटक गृहांचें नियमन, या विषयांसंबंधीं कानू करण्याचा अधिकार त्याला आहे. काम्युनाचें आयव्ययपत्रक मेयर तयार करितो. आणि तें मंजूर नामंजूर करणें कोन्सेलाकडे आहे. कोन्सेलाचे सभासद तीन वर्षें पर्यंत कामावर राहतात. त्यांचीं कामें मेयराला मदत करणें, त्याच्यावर कांहीं अंशीं दाब ठेवणें, काम्यूनाच्या सर्व मिळकतीची वहिवाट करणें, आणि त्यांचे कारभार चालविणें, हीं आहेत. काम्युनाचीं कामें आहेत तीं येणें प्रमाणें:—काम्यूनाच्या हद्दींत नवीन रस्ते करणें, किंवा जुने दुरुस्त करणें, प्रेतनिधानस्थलें स्थापणें व त्यांची तजवीज ठेवणें, आणि स्थानिक पोलिस कनिष्ट प्रतीचें शिक्षण व दीन मुलांची तर्तुद इतक्या कामास लागणाऱ्या साधनांचा पुरवठा करणें. काम्युनें लहान मोठीं पुष्कळ असतात. परंतु त्यांत अधिकारव्यवस्थेसंबंधीं फेर ह्मणून काय तो इतकाच कीं, कोन्सेलांत सभासदांची संख्या त्या मानानें कमीजास्त असते. लोकसंख्येच्या मानानें सभासदांची संख्या १० पासून ३६ पर्यंत असते. ह्मणजे ५०० पेक्षां कमी लोकसंख्या असली तर कोन्सेलांत सभासद १० असावयाचे, आणि ६,००० पेक्षां जास्त असली ह्मणजे सभासद ३६. आतां लहानसान गांवांत व खेड्यापाड्यांत दहापेक्षां जास्त अशा कामास लायक माणसें मिळण्याचा संभव नसतो. आणि याच कारणामुळें बहुतकरून पादशाहीचें महत्त्व वाढतें, व हुजुराकडून नेमलेल्या मेयराच्या हातीं इतका मोठा अधिकार ठेवावा लागतो. व्यवस्थित राज्यरीतीच्या संबंधानें पाहूं गेलें, तर ज्या दोषाला हा उपाय योजिला आहे त्या दोषा पेक्षां उपायच अधिक अनर्थकारक होय. इंग्लंडांतील स्थानिक राज्यव्यवस्थेमध्यें दोष कितीही असले, तथापि पादशाही वाढविणें किंवा फाजील अधिकार बजाविणारे अशा अंमलदारांचें मंडल उत्पन्न करणें, हे दोष त्या व्यवस्थेला लावितां येणार नाहींत.

---

# भाग २ रा.

इंग्लंडांतील स्थानिक राज्यव्यवस्थेमध्यें समावेश पावणारीं जीं निरनिराळीं खातीं आहेत, त्यांची इत्थंभूत व समजण्यास सुलभ अशी हकीकत देणें ही दूरापास्त गोष्ट आहे. खरोखर पाहूं गेलें तर स्थानिक कारभाराची व्यवस्था इंग्लंडांत चालूं आहे, या ह्मणण्यांत व्यवस्था शद्बाचा अर्थ कांहीं विपरीत घेतला पाहिजे. आमचा स्थानिक कारभार चालविणारे जे निरनिराळे अधिकारी आहेत, त्यांच्या निरनिराळ्या अधिकारांमध्यें परस्पर समसमानतेचा भाव आहे किंवा वरिष्ठकनिष्ठपणाचा भाव आहे या विषयीं मुळींच व्यवस्था नाहीं. १८०१ सालच्या खानेसुमारीच्या देखरेखीसाठीं जे गृहस्थ कमिशनरच्या हुद्यांवर नेमण्यांत आले होते त्यांना या गोष्टीविषयीं अचंबा वाटून त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, या देशांतील कारभारामध्यें हा एक विलक्षण प्रकार दिसून येतो कीं, बहुतेक सर्व सार्वजानिक अंमलदार आपआपल्या खात्यासंबंधानें देशाचे विभाग निरनिराळे करतात, आणि ते अशा प्रकारचे कीं एकाचा दुसऱ्यांशीं संबंध मुळींच कांहीं नाहीं. दरएक अंमलदाराचें दुसऱ्या अंमलदाराच्या अस्तित्वाविषयीं किंवा निदान कारभाराविषयीं माहिती नसल्यासारखेंच वर्त्तन. गोशेन साहेबांनीं एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं, आमच्या स्थानिक कायद्यांच्या घोटाळ्या सारिखा ब्रह्मगोंधळ कोठें जगांत नाहीं. देश विभाग संबंधी घोटाळा, अधिकाऱ्यांसंबंधी घोटाळा, आणि करा संबंधीं घोटाळा, मिळून इंग्लंडांतील स्थानिक राज्य व्यवस्था झाली आहे असें ह्मटल्यास कांहीं चिंता नाहीं. मि. राथबोन साहेबांनीं एकदा हौस ऑव्ह् कॉमन्स् सभेंत असें बोलून दाखविलें कीं ज्या ठिकाणीं मी राहतों तेथें निरनिराळ्या स्थानिक अंमलदारांचीं खातीं सर्व मिळून ३९ पेक्षां कमी नाहींत.

इंग्लंड आणि वेल्स यांतले देशविभाग येणेंप्रमाणें:—

५२ कौंटी (पैकीं ४० इंग्लंडांत, आणि १२ वेल्स मध्यें.) २४९ म्युनिसिपालिट्या, ७० सुधारणुकेच्या कायद्या अन्वयें केलेले भाग, १००६

आरोग्यरक्षणसंबंधी पौर विभाग, ४१ आरोग्यरक्षणसंबंधीं बंदर विभाग, ५७७ आरोग्यरक्षणसंबंधी जानपद विभाग, २०९१ शिक्षणसंबंधी विभाग, ४२४ राजमार्गसंबंधी विभाग, ८९३ प्रेतनिधान संबंधी विभाग, ६४९ दीनरक्षणसंबंधी युनियन नामक विभाग, १९४ गस्त व दिवेबत्ती संबंधी विभाग, १४९४६ दीन रक्षणाच्या कायद्या अन्वयें केलेले पारिश, ५०६४ राजरस्त्यासंबंधी पारिश, ( हे पौर व राजरस्त्यासंबंधीं केलेल्या विभागांपासून भिन्न आहेत, ) आणि सुमारें १२००० धर्मखात्या संबंधी विभाग. एकंदरींत इंग्लंडांत स्थानिक कर बसविणारे स्थानिक अधिकारी सर्व मिळून २७,०६९ आहेत, आणि ते अधिकारी १८ निरनिराळ्या प्रकारचे कर घेतात.

युनियन आणि दीनरक्षणसंबंधी पारिश यांच्या हद्दींचें परस्पर मिश्रण होत नाहीं, कारण युनियन ह्मणजे अमुक एक पारिशांचा समूह. पण हा अपवाद एकीकडे ठेविला असतां, बाकीं राहिलेल्या सर्व विभागांच्या हद्दी एकमेकामध्यें घोटाळून गेलेल्या आहेत. उदाहारणार्थ ८९ पारिश आणि १८१ युनियनें यांचा कांहीं भाग एका कौंटींत आणि कांहीं भाग दुसऱ्या कौंटींत आहे. या सर्व देश विभागांचे कारभार निरनिराळ्या अधिकाऱ्यांकडे सोंपलेले आहेत. आणि त्या अधिकाऱ्यांची निवडणूकही निरनिराळ्या लोकांकडून व निरनिराळ्या रीतीनें होत असते. लंडन राजधानींतले अंमलदार व कायदे हे इतर स्थलां पासून फार भिन्न आहेत. शिवाय वर सांगितलेल्या देश विभागांच्या यादीमध्यें नोंदणीच्या संबंधाचे विभाग व जुनें हंड्रेड नामक विभाग हे तर नमूद केले नाहींतच. हंड्रेड नामक जे विभाग आहेत त्यांचा व्यवहारांत उपयोग ह्मणून आतां इतकाच राहिला आहे, कीं त्या विभागाच्या हद्दीमध्यें दंगे धोपे झाले असतां त्या पासून होणारें नुकसान भरून देण्याबद्दलची जबाबदारी त्या विभागांतील राहिवाशांवर आहे. ही जबाबदारी अमलांत आणण्याचा प्रकार सर्व १८२७ सालच्या एका आक्टांत सांगितला आहे. पण तो फारच विरळ प्रसंगीं बजाविण्यांत येतो. न्याय करण्याच्या कामासंबंधी सार्किट, कौंटी, कौंटी कोर्ट देश विभाग, पेटी सेशन देश विभाग, आणि पोलीस देश विभाग, अशी स्थानरचना केली आहे. यां पैकीं कौंटी खेरीज करून इतर

विभागांचा स्थानिकस्वराज्यव्यवस्थेच्या संबंधानें केलेल्या विभागांशीं कांहीं एक मेळ नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. या शिवाय वीस गांवें आहेत त्यांना शहराचे कौंटी अथवा गांवाचे कौंटी असें ह्मणतात. तीं न्यायाच्या संबंधानें आणखी दुसऱ्या कांहीं गोष्टींच्या संबंधानें कौंटीमध्येंच मोडतात. इतका घोटाळा असूनही त्यांत आणखी एक विशेष घोटाळा होण्याचें कारण असें आहे कीं या निरनिरळ्या विभागांनां एकच नांव असतें. उदाहारणार्थ, पार्लमेंट संबंधी गांव, म्युनिसिपालिटी संबंधीं गांव, आणि पूर्वीं सांगितलेले युनियन, या सर्वांचें नांव एकच पण हद्दी निराळ्या असें असूं शकतें. याचें एक उदाहरण चेष्टर हें होय.

हे सर्व स्थानिक राज्यव्यवस्थे संबंधी जे विभाग सांगितले ते कसकसे वांटले आहेत याचा मासला एका कौंटीच्या स्थितीवरून कळेल. बेडफर्ड शायर नांवनिशीच्या क्रमानें पहिलेंच येतें, तेंच उदाहरणार्थ घेऊं. त्याचें क्षेत्रफळ ९७,००० एकर आणि लोकसंख्या ४१,०००, आहे त्यांत एक कार्टर सेशनचें कोर्ट असतें. त्यांत ९ हंड्रेड, ७ पेटी सेशन संबंधीं भाग, आणि ८ लेफ्टेनन्सी संबंधी विभाग असे आहेत. पोलीस संबंधी विभाग (दोन खेरीज करून) पेटी सेशना संबंधी विभाग जे केले आहेत तेच होत. या कौंटींत ३ म्युनिसिपालीटीचीं शहरें आहेत; ३ आरोग्य रक्षणसंबंधी पौर विभाग; ६ आरोग्य रक्षण संबंधी जानपद विभाग आहेत, त्यांपैकीं कांहींकांची हद्द जवळच्या कौंटीमध्यें गेलेली आहे; ६ राजमार्ग संबंधी विभाग, त्यांपैकीं दोहोंची हद्द तशीच; ६ प्रेतनिधान संबंधी विभाग; ४ गस्त व दिवे बत्ती संबंधी विभाग; ४९ शिक्षण संबंधी विभाग, त्यांपैकीं चोहोंची हद्द जवळच्या कौंटींत जाते; ६ युनियनें, त्यांपैकीं कांहींच्या हद्दी कौंटींच्या हद्दींच्या पलीकडे गेल्या आहेत; १३४ दीनरक्षण कायद्या संबंधी सबंध पारिश, आणि ३ तशा पारिशांचे कांहीं अंश. या सर्व विभागांची एकमेकांमध्यें मिसळ आणि गुरफटणूक होऊन राहिली आहे; आणि दरएकामध्यें कारभार चालविणारे लहान लहान अधिकारी आहेत, ते दुसरे विभाग किंवा दुसरे अधिकारी मुळींच नसल्या सारिखें वर्तन करितात.

याप्रमाणें या विभागांची आणि अधिकाऱ्यांची स्थला संबंधी वाटणी

दर्शविली. आतां या स्थितीचा प्रजाव्यक्तिशीं संबंध काय आहे व या अधिकार विरोधापासून प्रजेला काय फळ होतें तें क्षणभर तपासून पाहूं. याविषयीं राइट्साहेब ह्मणतात कीं 'एका शहरांतील रहिवाशांना स्थानिक राज्यव्यवस्थेच्या संबंधानें चार विभागांत राहावें लागतें. ते चार विभाग ह्मणजे एक बरो, एक पारिश, एक युनियन, आणि एक कौंटी. यांपैकीं एकाची हद्द दुसऱ्यांशीं जर मिळत असली तर ती साहजिक मिळून गेलेली असते. मिळावीच अशा हेतूनें मुद्दाम ठरविलेली कधींच नसते. आणि एकाच बरोचे निरानिराळे भाग निरनिराळ्या पारिशांत निरनिराळ्या युनियनांत आणि निरनिराळ्या कौंटीत असूं शकतात. सहा प्रकारचे अधिकारी त्यांच्यावर अधिकार चालवितात; निदान इतके असण्याचा संभव तरी खचित आहे. ह्मणजे म्युनिसिपल कमिटी, वेस्ट्री, शिक्षणाधिकारिमंडल, प्रेतनिधानाधिकारिमंडल, गार्डियन, आणि कौंटी-कार्टर सेशन. हीं सर्व मंडलें परस्पर भिन्न आहेत. आणि एकाच बरोमधील रहिवाशी निरानिराळ्या वेस्ट्री वगैरे मंडळीच्या अमला खालीं असतात असें ही होऊं शकतें. त्यांच्या कडून बरोसंबंधी कर, साधारण प्रांतांचा कर, दीनरक्षणार्थकर, प्रेतानिधानकर आणि कौंटीचा कर इतके निरानिराळे कर घेण्यांत येतात. निदान इतके त्यांच्यावर बसण्याचा संभव आहे. स्थानिक अधिकारिमंडलाच्या हद्दींत राहाणाऱ्यालाही चार प्रकारच्या देशविभागांत राहावें लागतें. ह्मणजे स्थानिक अधिकारिमंडलाचा विभाग, पारिश, यूनियन, आणि कौंटी. त्याच्यावर अंमल सहा अधिकाऱ्यांचा असतो, किंवा निदान असण्याचा संभव आहे. ह्मणजे स्थानिक अधिकारिमंडल, वेस्ट्री, यूनियन, प्रेत निधानाधिकारिमंडल, क्वार्टर सेशन्स, आणि शिक्षणाधिकारिमंडल. शिवाय एकाच स्थानिक अधिकाऱ्यांच्या देशाविभागांत स्थानिक अधिकारि मंडल आणि त्यांचा देशविभाग हीं खेरीज करून इतर अधिकारी व देशविभाग हीं भिन्न भिन्न अंशाला भिन्न भिन्न असूं शकतात. ग्लास्टर शायरमध्यें एक २०० एकरांचें ठिकाण आहे तें कांहीं वर्षांमागें निरनिराळ्या बारा पारिशांत होतें. आणि त्याच्यावर सुमारें ९० निरनिराळे कर बसत असत. जानपद पारिशांतला राहिवाशी पारिश, यूनियन, कौं-

टी इतक्या विभागांत तर राहतोच, आणि बहुतकरून राजमार्ग संबंधीं विभागांत ही राहतो. त्याच्यावर अधिकार चालविणारीं मंडलें ह्मट-लीं ह्मणजे वेस्ट्री, शिक्षणमंडळ, प्रेतनिधानमंडल, राजमार्गमंडल, गार्डियन, व जस्टिस, इतके असतात, अथवा निदान असूं शकतात. इतकें ही असून या शिवाय आणखीं अनेक लहानसान प्रकरणें आहे-तच; त्यासंबंधानें हे जे देशविभाग, जीं अधिकारिमंडलें, आणि जे कर वर दर्शविले आहेत त्यांची संख्या वाढून त्यांच्यांत स्थलविशेषीं अथवा प्रसंग विशेषीं घोंटाळाही बराच वाढतो."

वर ज्या स्थितीचें वर्णन केलें आहे त्याचें कारण इंग्रज लोकांचीं तुकड्या तुकड्यांनीं कायदे करण्याची सवई हीच होय. प्रसंगास यो-ग्य दिसल्या प्रमाणें विशेष कारणाकरितां नवीन अधिकारि मंडलें आणि नवीन देशविभाग हीं, मनमानेल तशीं स्थापण्यांत आलीं आहेत. पुढें जसजसें लोकांच्या सुधारणुकीमुळें त्यांच्या वेगवेगळ्या व्यवस्थांमध्यें उणीवी अथवा दोष दिसून येऊं लागले, तसतसे जे उपाय योजण्यांत आले त्यांना कायद्यांचीं ठिगळें अशीच संज्ञा शोभते. त्याचा अखेर परि-णाम असा झाला आहे कीं, राज्यांत निरनिराळ्या अधिकाऱ्यांच्या अम-लांत असणारे अशा देश विभागांचें एक जंगलच होऊन गेलें आहे, आणि हीं अधिकारिमंडलें इतकीं रानोमाळ वाढलीं आहेत. त्यांनीं साधून घेतलेल्या स्वार्थाच्या योगानें त्यांचीं मुळें दृढ बसून गेलीं आहेत. दर एक छोटेखानी अधिकारीमंडल ह्मणतें कीं, आपण कारकून अंमल दार वगैरे कर भरणाऱ्याच्या खर्चानें ठेवणार, मग त्यांची कामाकरितां गरज असो किंवा नसो. सगळ्या कारभारांत ठळक गुण ह्मणजे घोटा-ळा आणि उधळेपणा. यापासून वेळ, पैसा, आणि मनुष्यश्रम यांचा जो व्यर्थ व्यय होत आहे त्याची गणती करितां येत नाहीं. यांत सुधारणा दोन प्रकारची पाहिजे. एक तर देशविभागासंबंधी घोटाळा कमी केला पाहिजे. आणि दुसरें, कांहीं अधिकारिमंडलें एकमेकांत सामील करू-न घेतलीं पाहिजेत. स्थानिक स्वराज्याच्या कार्याकरितां अमुक एक देशविभाग मूल स्थल असें ठरविलें पाहिजे. आणि त्यापेक्षां मोठे जे विभाग ते अशा मूल स्थलांची अमुक संख्या मिळून व्हावे

अशी व्यवस्था झाली पाहिजे. या शिवाय जें जें कार्य करणें असेल त्या त्या दरएक कार्याकरितां निरनिराळें अधिकारिमंडल चालवूं नये, व दरएक नवीन कार्याकरितां नवीन मंडल स्थापूं नये. एकाच अधिकारिमंडलाला निरनिराळीं खातीं घालून कांहीं निरनिराळीं कामें सहज बजावितां येतात. अवघ्या देशाची हुजुरा कडून जी व्यवस्था चालते, ती निरनिराळ्या खात्याच्या योगानें कारभार चालविणाऱ्या लहानशा प्रधानमंडलाकडून चालते. आणि याच रीतीनें स्थानिक काम ही चालवावें अशी शिफारस अनेक वेळां केली आहे. उदाहरणार्थ, एखादें म्युनिसिपालीटीचें शहर घ्या. हल्लींच्या व्यवस्थे प्रमाणें तेथील टौनकौन्सल जें असतें, त्यांचा सार्वजनिक आरोग्याच्या कामांत अंमल चालतो. मग गार्डियन, प्रेतनिधानाधिकारी आणि कदाचित् शिक्षणाधिकारी मंडल या सर्वांचीं हीं कामें त्यांच्या कडेच सोंपण्यास हरकत कोणती आहे बरें ? या निरनिराळ्या खात्यांवर कौन्सलांच्या लहान लहान कमिट्या करून त्यांच्या कडून देखरेख सहज करवितां येईल. जानपद विभागांत गार्डियन मंडळीकडे आरोग्य संबंधीं अधिकार असतो. मग राजमार्ग संबंधी अधिकारिमंडल, प्रेत निधानाधिकारिमंडल, आणि जेथें दिवे बत्तीची तजवीज करणारें मंडल असेल तेथें तें, इतक्या सर्वांचे अधिकार त्या गार्डियनांसच कां देऊं नये? हल्लींच्या स्थितींत अंमलदार आणि निवडणुकीचे प्रसंग यांची संख्या उगीच फुगून जाते. हीं निरनिराळीं जीं स्थानिक अधिकारि मंडलें आहेत त्यां सर्वांच्या निवडणूकी निरनिराळ्यावेळीं होतात. निवड करणाऱ्याची व निवडणूकेंतलि उमेदवारांची लायकी, या सर्व कामांत निरनिराळ्या गोष्टींवर अवलंबून आहे. तसेंच निवडणुकेची रीति, संमतिग्राहक अंमलदार व त्यांच्या हाताखालील मंडळी, आणि अधिकारोपभोगाची मुदत, हीं सर्व भिन्नभिन्न असतात. या भागाच्या अखेरीस एक कोष्टक जोडलें आहे, त्यांत पार्लमेंट सभेच्या हुकुमानें छापिलेल्या पत्रकाच्या आधारें हल्लीं निवडणुकी कशा होतात, हें सारांश रूपानें दाखविलें आहे. तें कोष्टक पाहिलें ह्मणजे अधिकारि मंडल्या आणि त्यांच्या निवडणुकीचे प्रसंग ह्यांची संख्या फार वाढल्यामुळें किती मेहनत व्यर्थ गेलीच पाहिजे हें ढळढळीत दिसतें. या चालीपासून



मनुष्यश्रम, पैसा, आणि वेळ यां सर्वांचा अव्यवस्थित व व्यर्थ व्यय फार होतो. पण हे अधिकार वांटून दिल्यापासून यांहीपेक्षां एक विशेष वाईट परिणाम होतो तो हा कीं, स्थानिक राज्यव्यवस्थेचा बोजा आपणावर घेण्यास तयार असून लायकीचे असे लोक थोडे पडल्यामुळें व अधिकारी मंडलें पुष्कळ असल्यामुळें नालायक लोकांचा त्यांत शिरकाव फार होतो. एखाद्या स्थळीं एका मंडला पुरतीं लायक माणसें मिळण्याचा संभव असला तथापि तेथेंच चारपांच मंडलां पुरतीं तशीं माणसें मिळणें ह्मणजे दूरापास्त गोष्ट. शिवाय हल्लींच्या ह्या छोटेखानी मंडलांत असणाऱ्या लोकांना आपल्या बंधुजनांची इतकी थोडी कामगिरी करण्याची सवड असते कीं त्यांत पडण्यास पुष्कळ लोकांचें मन सहसा घेत नाहीं. आतां ज्या लोकांना या बाबतींत सुधारणा नको आहे ते ह्मणतात, अहो आमच्या इंग्रजी स्थानिक व्यवस्थेंत असें कांहीं पाणी आहे कीं, त्यांत या उणीवींचीं व विसंगतपणाची गणना काय? पण ज्यांना सुधारणा इष्ट आहे ते याला जबाब असा देतात कीं विचारपूर्वक सुधारणा केल्यास तें पाणी जास्तच होणार आहे कमी होणार नाहीं.

स्थानिक राज्यव्यवस्थेच्या संबंधानें इंग्लंडांत प्राचीनकाळीं जणूं काय सत्ययुगच होतें. कारण त्याकाळीं त्या व्यवस्थेंत पाणी असून घोंटाळा मुळींच नव्हता. कांहीं उत्साही लोक अजून ह्मणतात कीं, तें सत्ययुग कोणत्या तरी रूपानें पुनरपि येईल. साक्सन कारकिर्दींत हुजुराकडला अंमल आहे कीं नाहीं हें कळत देखील नसे. राज्यांतील स्वतंत्र मनुष्यांच्या कर्तव्यांचा तपास करितां असें दिसतें कीं शिपाईगिरीची नोकरी करणें, पूल दुरुस्तींत ठेवणें आणि कोटांची दागदुजी करणें या धर्मत्रयांत त्या सर्व कर्तव्यांचा समावेश होत असे. चालू कारभाराच्या संबंधानें तर कौंटींतला अधिकार जवळ जवळ सर्वांशीं अप्रतिबंध ह्मणण्यासारिखा असे. कौंटींचे विभाग हंड्रेड ह्मणून असत; आणि त्यांचे पोटविभाग टौनशिप ह्मणून असत. या दरएक भागांत एक एक मंडळी असे ती कायदे कानू करीत असे, आणि आपआपल्या अधिकारांच्या हद्दीमध्यें सर्व स्थानिक कारभार व न्यायमनसुबा चालवीत असे. पोलिसाचा बंदोबस्त गोवनजामिनदारी किंवा परस्परसंरक्षणाच्या वहिवाटीमुळें नीट होत असे. दर

एक मिरासदाराला आपल्या टौनशिपच्या सभेंत बसण्याचा हक्क असे आणि व्यवहारांत स्वतंत्र मनुष्य आणि मिरासदार ह्मणजे एकच असत. हंड्रेड आणि कौंटी यांतल्या ज्या सभा असत त्यांत दरएक टौनशिपचे प्रतिनिधि असत. कायदे करण्याचें, न्यायमनसुबा करण्याचें, आणि कारभार चालविण्याचें, या तीन कार्यांत कांहीं भेद मानला जात नसे. राज्यव्यवस्था ठेवणें आणि न्यायमनसुब्याच्या कामांत मदत करणें हे सर्व स्वतंत्र मनुष्यांचे हक्क व धर्म समजले जात असत. अशी त्या काळीं स्थिति असे. आतां साक्सन कारकिर्दींतलीं स्थानिक राज्यव्यवस्थेचीं साधनें हल्लींच्या काळीं साक्सन पेहराव अथवा सक्सन शस्त्रास्त्राप्रमाणें निरुपयोगी तर खरींच. पण जानपद प्रदेशांत कौंटी, हंड्रेड आणि टौनशिप असा जो देशविभाग असे तो अतां पुनः स्थापला असतां फार चांगलें होईल असें दिसतें. ह्या त्रिधाविभागण्यांत मोठ्या शहरांचा मात्र समावेश झाल्यापासून कांहीं फायदा होणार नाहीं. त्यांना आपली स्वतंत्र नगरव्यवस्थाच असावी कारण स्थानिकराज्याच्या संबंधानें पाहतां शहरांची आणि जानपद प्रांतांची स्थिति भिन्न आहे. खानेसुमारीच्या अंमलदारांनीं जे प्रदेश शहरांत गणले आहेत त्यांत दरएक चौरस मैलास लोकसंख्या ४०६१ आणि बाकीच्या प्रदेशांत पाहिली तर फक्त १९८ आहे. जानपद प्रदेशांपेक्षां शहरांत व्यवस्था जास्त लागते. आणि विशेषें करून सार्वजनिक आरोग्याच्या संबंधानें थोड्याशा जागेंत मनुष्यांचे थव्याचे थवे जमून राहिले ह्मणजे व्यक्तिव्यक्तींच्यानें निवारण होऊं शकत नाहीं असली घाण उत्पन्न होतेच होते. यास्तव जानपद प्रदेशांपेक्षां शहरांत साधनसामग्री जास्त टापटीप ठेवण्यास लायक अशी पाहिजे. इंग्लंड देशामध्यें हा सिद्धांत अंमलात आणण्याचा बाबतींत प्रसंगोचितपणा व बेतबात मुळींच नाहींत हें खरें आहे. पण हा सिद्धांत सर्वमान्य आहे. उदाहरण, सार्वजनिकारोग्याच्या संबंधाचे जे आक्ट आहेत त्यां अन्वयें शहरांतील आरोग्याधिकाऱ्यांना जानपदारोग्याधिकाऱ्यापेक्षां जास्ती अधिकार दिलेले आहेत. आणि म्युनिसिपालिटी बद्दलचे आक्ट ज्या ज्या भाग्यशाली नगरांत लागू केले जातात, त्यांत त्या आक्टा अन्वयें कांहीं विशेष तजविजीही करतां येतात. फ्रान्स देशांत उलटा

प्रकार आढळतो. तेथें जानपद प्रदेश आणि शहरें यांत भेद मानीत नाहींत. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्या देशांत व्यावहारिक सोईकडे लक्ष्य कमी असतें, आणि सुश्लिष्ट व्यवस्थेकडे जास्त असतें. तेव्हां मोठें अवाढव्य शहर आणि एखादें क्षुद्रखेडें या उभयतांचे कारभार फ्रान्स देशांत एकाच शिस्तीनें चालवितात.

आतां स्थानिक कर व इतर बोजांच्या केवळ साधारण स्वरूपाविषयीं येथें चार शब्द लिहिले पाहिजेत. त्या विषयाचें बारकाईनें निरूपण दुसऱ्या ग्रंथांत केलें आहे. तो ज्यांना जास्त माहिती पाहिजे असेल त्यांनीं वाचावा.

इंग्लंड देशांत स्थानिक अधिकाऱ्यांच्या हातून काय काय रकमांची विल्हेवाट होत आहे, आणि स्थानिक व्यय व स्थानिक कर्ज हीं कितीं भयंकर रीतीनें फुगत चाललीं आहेत, याची बहुतेक फारच थोड्या लोकांना कल्पना असेल. पैसे खर्च करण्याच्या आणि कर्ज काढण्याच्या कामीं निवडलेल्या स्थानिक अंमलदारांचे पराक्रम जर एखादा कर भरणारा तपासून पाहील, तर आपण मोठेपणास चढविलेला हा कोणी भस्मासुरच आहे असें त्याला वाटल्या वांचून रहाणार नाहीं. पण या कामांत कर भरणारे लोक कांहीं हालचाल करीत नाहींत. इंग्रज लोकां सारखे द्रव्यसंपादनार्थ मेहनत करणारे कोणी नाहींत. पण आपले पैसे आपल्याकडून घेतले असतां त्यांच्या सारिखे स्वस्थ बसणारे ही लोक कोणी मिळणार नाहींत. हा विलक्षण मनस्वभाव स्थानिक कारभारांत ढळढळीत रीतीनें दिसून येतो. स्थानिक कर भरणाऱ्या लोकांना सामान्यतः कर वाढले किंवा पाऊस अतिशय पडला या दोन्ही गोष्टी सारख्याच वाटतात. दोन्ही विषयीं कुरकुर करावयाची इतकें खरें. पण दोन्ही विषयीं झालेल्या गोष्टींचीं कारणें काय याची चौकशी त्यांच्या हातून कधीं होणार नाहीं. कारण दोन्ही सारिख्याच नाइलाजाच्या गोष्टी असें ते समजतात. पण जरी या विषयीं अनास्था फार आहे तरी स्थानिक आयव्ययाची हकीकत लक्ष देण्याजोगी आहे.

सन १८७० सालीं स्थानिक कार्यांकारितां एकंदर दोन कोट नव्वद लक्ष पौंड खर्च झाले. सन १८८० सालांत तुरुंगाची व्यवस्था हुजुरा-

कडे गेली असतां देखील, पांच कोट पौंड खर्ची पडले आहेत. इतका खर्च भागण्यास तीन कोट दहा लक्ष पौंड स्थानिक करांच्या योगानें उत्पन्न झाले; वीस लक्ष हुजुर खजिन्यांतून मिळाले; दस्तुरी वगैरे मिळून ६० लक्ष; आणि बाकीचे उसनवारी काढून त्यांतून देण्यांत आले. खर्ची लिहिलेल्या रकमा स्थानिक राजव्यवस्थामंडलाच्या रपोर्टांत दोन सदरां खालीं दाखविलेल्या असतात. पहिलें सदर आयवर्धक खर्च, आणि दुसरें अनायवर्धक खर्च. दुसऱ्या सदराखालीं पोलिसाकरितां व दीन रक्षणा करितां खर्च केलेल्या रकमा दाखविल्या जातात. पहिल्या सदराचें आयवर्धक हें नांव केवळ मिथ्यास्तुतिपर होय. त्यांत राजरस्त्यांवरील अंमलदारांचा, व सार्वजनिक आरोग्य, शिक्षण, नळ, आणि प्रेतनिधान, या संबंधाच्या अधिकारिमंडलांचा खर्च येतो. शिवाय देवी काढण्यांकरितां व जन्म विवाह व मृत्यु नोंदण्याच्या कामांकरितां झालेला जो खर्च तो ही या सदरा खालीं येतो. या संबंधी तपास केला तर असें दिसून येतें कीं, सुमारें वीस लक्ष पौंड राजरस्त्यांवर खर्च झाले, चाळीस लक्ष शिक्षणावर, आणि देवी काढण्याच्या कामाला शायशींहजार पौंड. पण मुख्य खर्चाची रकम ह्मटली ह्मणजे एक कोटि सदुसष्ट लक्ष एकसष्ट हजार; ही शहरांतील सार्वजनिकारोग्या संबंधीं अंमलदार यांनीं खर्च केली. आणि जानपदप्रदेशांतील अधिकाऱ्यांना पाहूं गेलें तर पन्नास लक्ष पौंडापेक्षां कांहीं कमीच लागले. आतां अनायवर्धक खर्चाचा कच्चा हिशेब पाहतां असें दिसतें कीं गुन्हेगार व दीन लोकांप्रीत्यर्थ एक कोट बावन्न लक्ष पौंड खर्च झाले. आणि सगळ्या देशाच्या पोलीसबंदोबस्ताकरितां सत्तर लक्ष पौंड खर्ची पडले आहेत. दीनार्थ करापासून एकंदर एक कोटि चाळीस लक्ष पौंड उत्पन्न झाले पण अनेक आक्टांअन्वयें दीनजनांशीं मुळींच संबंध नाहीं अशा कांहीं खर्चाच्या रकमा त्या करांतून द्याव्या असे ठराव घालून दिले आहेत. तथापि खरोखर दीनांकरितांच खर्च झालेली रकम पाहून देखील अचंबा वाटतो. आपलें आरमार अर्वाचीन काळच्या सर्व साधनांनीं संपन्न असतां ही त्याला दरसाल फक्त एक कोट पौंड लागतात. पण हें जें आमचें दीनजनांचें सैन्य आहे त्याला खर्च जवळजवळ नव्वद लक्ष पौंड! या आमच्या वयांत आलेल्या सशक्त दीनजनांच्या सैन्यांत सरासरी एक लक्ष पांच हजार

मनुष्यें आहेत; आणि आरमारांतले व लष्करांतले चट सारे शिपाई मिळून या संख्येपेक्षां कांहीं फारसे जास्ती नाहींत. या आपल्या सशक्त दीनजन सैन्यांचा दरसाल मोठा मिरवणुकीचा तमाशा होत नाहीं ही एक दिलगिरीचीच गोष्ट समजली पाहिजे. आजपर्यंत इंग्लंडांत झालेल्या सर्व फौजेच्या तमाशांपेक्षां तो तमाशा मोठा भव्रकेदार होईल. या अनाथ मंडळीची पळटणें जर करभरणारांच्या प्रतिनिधिलोकांसमोरून मिरवत गेलीं, तर खचितच सशक्त दीनजनांबद्दल कांहीं तरी कडक कायदे झाल्यावांचून राहणार नाहींत. १८८० सालांत दीनरक्षणार्थ जे नऊ कोट पौंड खर्च करण्यांत आले त्यापैकीं अवघे अडीचशें पौंड परदेश गमनाला लागले. आणि खरोखर पाहूं गेलें तर हाच कायतो रास्तपणें आयवर्धक असा दीनरक्षणाचा प्रकार ह्मणतां येतो. कारण ज्याला परदेशगमनाला मदत मिळते तो मात्र काय तो या प्रकारानें दीनजनमंडळी मधून कायमचा निघून गेल्यासारिखा होतो.

१८८१ सालीं आपल्या स्थानिक कर्जाची रकम एकंदर चवदा कोटि चाळीस लक्ष पौंड होती. १८७९ सालीं ती सगळीं नऊ कोटि वीस लक्ष होती. यासंबंधानें कोष्टकांचा तपास करितां असें दिसून येतें कीं हे स्थानिक कर्ज दरसाल ऐशीं लक्ष पौंड या मानानें वाढत चाललें आहे.

याप्रकारें उधार बाजू झाली. आतां जमे बाजूकडे वळूं या. स्थानिक कर देण्यास पात्र अशी जी सर्व इंग्लंडांतली मिळकत तिचें एकंदर दरसाल उत्पन्न पंधरा कोटि सत्तर लक्ष पौंड आहे, आणि करा संबंधी त्याची आकारणी निवळ तेरा कोटि तीस लक्ष पौंड केली आहे. आतां स्थानिक कर भरण्याचें सामर्थ्य देशांत किती आहे याचा विचार करितांना एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं चाळीस लक्ष पौंड धर्मार्थदशमांश ह्मणून जातच आहेत. आणि तितक्या पुरता सर्व देश गहाणच आहे असें समजलें पाहिजे. हा दशमांश ह्मणून जो पैसा एकत्र केला जातो तो सर्वच पुरोहित मंडळीस पोंहोंचतो असें नाहीं. त्यापैकीं सुमारें दहा लक्ष जमीनदार गृहस्थांस जातो. पण बाकीचे तीस लक्ष जे राहिले ते सगळे आमचे नीतिसंबंधी पोलीसवाले असा ज्यांना किताब मिळाला आहे त्यां-

त्याकडे जातात. या दशमांशकराच्या बरेवाईटपणाबद्दल येथें विचार कर्तव्य नाहीं. लक्षांत इतकेंच ठेविलें पाहिजे कीं स्थानिक करां संबंधी विचार करितांना आपल्या जमिनीवर मुळींच बोजा नाहीं असें घेऊन चालतां येत नाहीं. दशमांशभोक्त्यांचे त्यावर इतके महाणच आहे असें समजून चाललें पाहिजे.

हा जो स्थानिक व्यवस्थेचा अवाढव्य खर्च व भयंकर कर्जाचा बोजा वर दर्शविला, त्यांचीं कारणें अनेक असावीं. पण त्यांतली ठळक ठळक म्हणजे हीं:—प्रथमत: ज्या कार्याकरितां पैसा एकत्र केलेला असतो त्याच कार्याला तो जोंपर्यंत लावला जातो तोंपर्यंत त्या खर्चावर म्हणण्यासारिखें नियमन म्हणून कांहींच नाहीं. दुसरें असें कीं स्थानिक अंमलदारामध्यें शिक्षण व बुद्धि हीं जितकीं साधारणत: असावीं तितकीं नाहींत. आणखी ज्या मंडळींमधून हे अंमलदार बहुतकरून निवडलेले असतात त्याच मंडळीस स्थानिक खर्चापासून विशेषें करून फायदा होणार तेव्हां हा उधळेपणा बंद करण्यांत त्यांचें हित नाहीं. अखेरचें कारण हें आहे कीं आमची स्थानिक व्यवस्था इतकी गुरफटलेली आहे, तिच्यामध्यें देशविभागांची आणि अधिकारांची एकमेकांशीं इतकी मिसळ आहे, आणि इतके परस्पर विरोध प्रसंग आहेत, आणि त्यात्या अधिकाऱ्यांच्या हिशेब तयार करण्याच्या तारिखा इतक्या भिन्न भिन्न आहेत कीं सर्व स्थानिक आयव्ययाचा एक आदावा काढण्याचा मुळींच संभव नाहीं. कोणत्याही एखाद्या स्थानाचा एकंदर खर्च किती आहे, हें समजण्याला मार्ग नाहीं. एखाद्या कर भरणारानें जर तें समजून घेण्याचा प्रयत्न केला तर तो घोटाळ्यांत मात्र पडेल, आणि त्याला कंटाळा येऊन हा नाद सोडून द्यावा लागेल. तथापि इतकें खचित आहे कीं स्थानिक खर्चवेंच मर्यादेंत कसा राखावा हें मोठें भयंकर गूढ सोडविणें इंग्लंडांतील प्रजेस हल्लींच फार महत्वाचें काम होऊन राहिलें आहे, आणि लवकरच निकडीचें होणार.

## कोष्टक.

(१) निरनिराळ्या मंडलांच्या निवडणुकेच्या तारिखा.

**(अ)** टौनकौन्सलें.—१ ली नोवेंबर. **(आ)** स्थानिक अधिकारिमंडलें—एप्रील महिन्याचा पहिला आठवडा.

(इ)गार्डियन मंडलें—७।८।९ एप्रील.(ई)राजमार्गसंबंधी मंडलें--२९मार्च
(उ)शिक्षणाधिकारि मंडलें—वर्षांत केव्हांही.(ऊ) दिवेबत्तीतपासनीस—वर्षांत केव्हांही.

(ऋ) पारिशांतील प्रेक्षक— २९ मार्च.

(२) संमतीच्या हक्कासंबंधी.

(अ) टौनकौन्सलें—वहिवाट करणाराला एक संमति.

(आ)स्थानिकअधिकारि मंडलें—करासंबंधी आकारणीच्या मानानें अडीचशें पौंडपर्यंत १ पासून ६ पर्यंत संमति मालकाला; त्याच मानानें वहिवाट करणाराला. ता. क. एकाच मनुष्याला दोन्ही नात्यांनीं संमति देण्याचा हक्क आहे. आणि अडीचशें पौंडांपर्यंत आकारणी झाली असल्यास १२ संमति देतां येतात. ( इ ) गार्डियन मंडलें—मालक आणि वहिवाटदार यांना स्थानिक अधिकारिमंडलास लागू असणाऱ्या नियमांप्रमाणें

(ई) प्रेतानिधान, राजमार्ग, दिवेबत्ती, पारिश देखरेख. } यांसंबंधी मंडलें.—१८१८ सालच्या वेस्ट्री आक्टांत ठरविल्याप्रमाणें वहिवाटदारांस दीडशें पौंडपर्यंत १ पासून ६ संमति.

(उ)शिक्षणाधिकारिमंडलें-जितकेजण नेमायचे असतील तितक्या संमति सर्वांस [जातात.

(३) अधिकाराची मुदत.

(अ) टौन कौन्सलें—तीन वर्षें; दरसाल एक तृतीयांश अधिकार सोडून

(आ) स्थानिक मंडलें—सदर्हू प्रमाणें.

(इ) प्रेतनिधानाधिकारि मंडलें—सदर्हू प्रमाणें (ई) शिक्षण मंडलें—३ वर्षें; सर्व सभासद एकदम निघून जातात.

(उ) गार्डियन, दिवेबत्ती, राजमार्ग, पारिश देखरेख. } यांसंबंधी मंडलें—एक वर्ष.

(४) निवडणूकेची रीत.

(अ) टौन कौन्सलें--एक संमति, गुप्त रीतीनें;(आ)स्थानिक मंडलें--संमतिप्रदर्शक पत्रकें संमति देणारांच्या घरीं वाटतात. आणि तीन दिवसांनीं गोळा करितात. अनेक संमतीचा परिपाठ आहे.

(इ) गार्डियन मंडलें--सदहू प्रमाणें; पत्रकें मात्र दिल्याच्या दुसऱ्या दिवशीं गोळा करितात (ई) प्रेतनिधान, राजमार्ग, दिवेबत्ती यासंबंधीं अधिकारिमंडलें--हस्तप्रदर्शन, आणि कोणी तशी सूचना केली तर जाहीर रीतीने संमति देणारे मनुष्यांची गणती; अनेक संमति (उ) पारिशांतील प्रेक्षक--सदहू प्रमाणें; जस्टिस लोकांची मंजुरी मात्र या उपर लागते (ऊ) शिक्षण मंडलें--गुप्तरीतीनें, जितके जण नेमायचे असतील तितक्या संमति सर्वांस

(५) उमेदवारांची लायकी.

(अ) टौन कौन्सलें--चार किंवा जास्त पोट भाग केलेल्या शहरांत १०००पौंड,किंवा स्थानिक करांकरितां आकारलेलें सालिना उत्पन्न ३० पौंड किंवा त्याउपर; इतर शहरांत ५०० पौंड अथवा आकारणी १५ पौंड किंवा उपर. (आ) गार्डीयन-निरनिराळ्या यूनियनांत १५ पासून ४० पौंड पर्यंत स्थानिक करां करितां आकारणी (इ) स्थानिक मंडलें-- २०,००० पेक्षां लोकसंख्या कमी असल्यास १५ पौंड आकारणी,२०,०००पेक्षां जास्त असल्यास३० पौंड आकारणी.जंगम मिळकत स्थानिक कर न भरले तरी चालते, तिची किंमत मात्र ५०० किंवा १००० पौंड लोकसंख्येच्या मानानें असली पाहिजे. (ई) प्रेतनिधान, राजमार्ग, दिवेबत्ती, आणि पारिश देखरख यासंबधी अधिकारी--स्थानिक कर भरणें.

(उ) शिक्षण मंडलें--कोणीही चालतो, विशेष अटी नाहींत.

ता०क०--यांत स्थलविशेषीं अंतर पडतें. कोठें कोठें विशेष आक्ट अमलांत असतात, (उदाहरणार्थ,सौथवेल्स) तेथें कांहीं फेरफार आढळेल.

# भाग ३ तिसरा.

स्थानिक व्यवस्थेच्या संबंधानें बहुतकरून पारिश शब्दाचा अर्थ दीनरक्षण कायद्याच्या संबंधाचा पारिश असें समजावें. आणि अशा पारिशाचें लक्षण हेंच कीं ज्या देश विभागांत स्वतंत्र रीतीनें दीनजनांकरितां कर घेतां येतो, अथवा ज्यांत स्वतंत्र प्रेक्षक ह्मणून अंमलदार नेमतां येतो, तो दीनरक्षण कायद्याच्या संबंधाचा पारिश ह्मणावा. स्थानिक व्यवस्थाधिकारि मंडलाच्या एका रपोर्टांत असें ह्मटलें आहेकीं, "असा देशविभाग ह्मटला ह्मणजे एक सबंध जुना पारिश असूं शकतो. अथवा एक किंवा अधिक राजमार्ग संबंधाचे टौनशिप, अथवा पारिशांतील देवालयाच्या प्रांतांतील विभाग, अथवा इतर देवालयाच्या प्रांतांतील विभाग, अथवा क्वार्टर, अथवा गांव, अथवा एखादा जुन्या पारिशाचा भाग कीं ज्याला यापैकीं कोणतेंच नांव देतां येत नाहीं." १८७३ सालीं पारिशांच्या हद्दी विषयीं चौकशी करण्या करितां एक कमिशन नेमण्यांत आलें होतें. त्याच्या शोधाअंतीं असें दिसून आलें कीं यूनियन खेरीज करून दुसऱ्या कोणत्याही कारभारासंबंधी केलेल्या देश विभागांचा आणि पारिशांचा कांहीं विशेष संबंध ह्मणण्या सारखा नाहीं. एकच पारिश दोन कौंटींत असूं शकतो; एका कौंटींत आणि एका म्युनिसिपालिटींत असूं शकतो; अथवा कांहीं भाग एखाद्या स्थानिक अधिकारि मंडलाच्या हद्दींत आणि कांहीं हद्दी बाहेर. शिवाय एका पारिशांतल्या जमिनी सभोंवताली सबंध लाविलेलें कुंपण असतेंच असाही नेमनाहीं. एखादे ठिकाणीं मुख्य पारिश आणि त्यांतील जमिनी यामध्यें बरेंच अंतर असतें. १८७३ सालीं यार्कशायर मध्यें असे सत्तर तुटक पारिश होते; आणि एकाच पारिशाचे दुसऱ्या पारिशांमध्यें मिसळलेले असे दहा तुकडे होते. सगळे मिळून तुटक पारिश १३०० होते; पण सन १८७६, १८७९, १८८२, सालीं तीन आक्ट झालेले आहेत, त्यांत तुटक पारिशांच्या हद्दींबद्दल तोड जोड करण्याची आणि तुकड्या तुकड्यांचा नवा पारिश स्थापण्याची अथवा जवळच्या पारिशांतच समावेश करण्याची मुखत्यारी स्थानिक व्यवस्थाधि-

कारिमंडलास दिलेली आहे. पण या आक्टाअन्वयें अद्यापि फारसे हुकूम झाले नाहींत. वर दर्शविलेल्या आक्टांत विहित रीतीनें जेथें हद्दी ठरविल्या नाहींत तेथें पारिशांच्या हद्दी पूर्वापार चालत आलेल्या वहिवाटीवरून समजावयाच्या. आणि त्यांच्या विषयीं "पाहणी प्रदक्षिणेत" ठराव होऊन पुरावा राहत असतो. मागें या प्रदक्षिणा दरसाल रोगेशनाच्या आठवड्यांत होत असत, पण आतां त्या तीन वर्षांत एकदाच व्हाव्या असा नियम दिसतो. कारण १८४४सालच्या कायद्याप्रमाणें प्रदक्षिणा तीन वर्षांतून एक वेळ यापेक्षां अधिक प्रसंगीं न झाल्यास त्यांचा खर्च दीनार्थकरांतून देतां येतो. या पारिशांच्या हद्दीचे दगड रोंवण्याचा आणि ते कायम ठेवण्याचा खर्च त्याच करांतून मिळतो. पारिशापारिशांत क्षेत्रफळ आणि लोकसंख्या या संबंधानें फार अंतर असतें. पुष्कळ पारिशांचें क्षेत्रफळ १० एकरांपेक्षां कमी आहे, आणि पुष्कळांचें १०,००० एकरांवर आहे. अठ्ठायशीं पारिशांतली लोकसंख्या ९० पेक्षां कमी आहे, आणि ६००० पारिशांतील लोकसंख्या ३०० च्या खालींच आहे. नार्थंबर्लंड मध्यें कांहीं पारिश आहेत त्यांत अवघीं पांच सहा माणसें आहेत. फ्रे-साहेबांनीं ह्मटलें आहे कीं एक पारिश आहे त्यांत कर भरणारा एकच मनुष्य आहे. पण दुसरे अनेक पारिश आहेत तेथील लोकसंख्या ३०,००० पेक्षां जास्त आहे. उदाहरणार्थ, टाक्स्टेथ टौनशिपमध्यें १,७०,००० लोक आहेत. एकंदर सरासरी पाहतां पारिशांत लोकसंख्या १९०० पर्यंत असते. आणि बहुतेक पारिशांत २०० पासून १००० पर्यंत लोक असतात. लहान लहान पारिश एकत्र करून एक पारिश करण्याचा अधिकार कोणालाही नाहीं. पण एखाद्या मोठ्या पारिशांतील स्थावरमिळकतीचे मालक आणि वहिवाट करणारे यांच्या अर्जावरून पारिशांचे पोटभाग करण्याचा अधिकार स्थानिक व्यवस्थाधिकारिमंडलास दिला आहे.

या शिवाय दुसरेही पारिश आहेत, पण ते दीनार्थ पारिशांपासून भिन्न आहेत हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. उदाहरण, जमिनीच्या सान्यासंबंधीं कांहीं पारिश आहेत. त्यांविषयीं स्थानिक व्यवस्थेच्या संबंधानें विवेचन करण्याची जरूर नाहीं. राजमार्गासंबंधी पारिश दीनार्थ पारिशापासून

भिन्न असतो किंवा दोन्ही एकच असूं शकतात. पुष्कळ खेडीं, गांव, दशमांश प्रदेश, असे आहेत कीं ते स्वतंत्र दीनार्थ पारिश नाहींत, पण पुरातन वहिवाटीमुळें स्वतंत्र राजमार्गपारिश असे गणले जातात. या पारिशांची संख्या कळत नाहीं. पण स्थानिक व्यवस्थाधिकारिमंडलाकडे १८८१ सालीं १४,७७७ पारिशांकडून माहिती आली होती इतकें मात्र समजतें. याशिवाय एक धर्मसंबंधी पारिश राहिला. मागें दिवाणी अथवा दीनार्थ पारिश आणि हा धर्मसंबंधी पारिश हे एकच असत. पण आतां जरी एखादे वेळेस त्यांच्यामध्यें गोंधळ पडतो, तरी त्यांचा कांहीं संबंध राहिला नाहीं. उदाहरणार्थ, दशमांशासारख्या धर्मविषयक कार्याच्या संबंधानें एखादा गांव एका पारिशांत असतो. आणि दीनार्थ करासारख्या दिवाणी कार्याच्या संबंधानें तो दुसऱ्याच पारिशांत असूं शकतो. १८७१ सालाच्या खानेसुमारीप्रमाणें त्या सालीं इंग्लंडदेशांत दिवाणी पारिशांची संख्या १४,९४९ होती. धर्मसंबंधी पारिशांबद्दल हुजुर दप्तरीं कागदपत्र नसल्यामुळें त्यांची बरोबर संख्या सांगतां येत नाहीं. पण तसे पारिश १३,००० हजार असावे असा अजमास केला होता. आतां दिवाणी आणि धर्मसंबंधी विभागांची फाटाफुट झाली आहे तेव्हां पारिश हें धर्मसंबंधी नांव फक्त धर्मसंबंधी विभागासच लावीत नाहींत ही दिलगिरीची गोष्ट समजली पाहिजे. तसें केलें ह्मणजे टौनशिप ह्मणून जी जुनी संज्ञा आहे ती दिवाणी विभागास लावण्यास ठीक पडेल.

इतिहासदृष्ट्या, आपल्या स्थानिक व्यवस्थांमध्यें पारिशव्यवस्था मोठी मनन करण्या लायक आहे. प्रथमारंभीं पाहिलें तर जुन्याकाळचा टौनशिप ह्मणून जो देशविभाग असे त्यासच धर्मसंबंधी कार्याकरितां पारिश ही संज्ञा होती असें दिसतें. तेव्हां हल्लींचा जो दिवाणी पारिश आहे त्याची उत्पत्ती साक्षात् जुन्या धर्मसंबंधी पारिशांपासून आणि परंपरया त्याच्याही पूर्वींच्या साक्सन कालच्या टौनशिपापासून कशी झाली ती आपल्याला समजून घेतां येते. कांहीं लोकांनीं याही पूर्वींची उत्पत्ति दाखवून दिली आहे. उदाहरणार्थ, डिटाकविल ह्मणतात कीं टौनशिप हा लोकव्यूह इतका स्वाभाविक आहे कीं कांहीं ठिकाणीं लोक एकत्र राहूं लागले कीं तो व्यूह आपोआपच बनतो कीं काय असें वाटतें. राजस-

त्ताक राज्यें आणि प्रजासत्ताक राज्यें जशीं मनुष्य कृतीनें बनतात, तसे हे पुरातन लोकव्यूह साक्षात् ईश्वराच्याच हातानें घडले जातात असें दिसतें. पण इतक्या पुरातन कालच्या स्थितीबद्दल कांहीं विचार न करितां देखील असा सिद्धांत करण्यास कांहीं बाध नाहीं, कीं इंग्लंडांतील पारिशव्यवस्था हीं जुन्या टयूटन लोकांच्या मार्कापासून सारिखी ओघानें आली आहे; आणि हा पारिश, व नव्या इंग्लंडांतील टौनशिप, व फ्रान्स किंवा बेल्जम देशांतील काम्यून, आणि उत्तर हिंदुस्थानांतला गांव, हीं सर्व एकाच व्यवस्थेचीं केवळ निरनिराळीं रूपें आहेत, आणि ती व्यवस्था जेथें जेथें ह्मणून आर्य लोक आहेत तेथें तेथें दृष्टीस पडते. टयुटानिक मार्कांच्या सर्वच चाली आमच्या साक्सन पूर्वजांनीं इंग्लंड देशांत आणिल्या किंवा नाहीं याविषयीं भवतिनभवतीला जागा बरीच आहे. पण इतकें खचित आहे कीं साक्सन काळचें जें टौनशिप ह्मणून होतें त्याचे विशेष गुण हे मार्कांच्या वहिवाटीवरून त्याला प्राप्त झाले होते. टौनशिप हें नांव गृहसमुदायाच्या सभोंवतालीं जें कुंपण असे आणि ज्याला टून ह्मणून संज्ञा होती त्यावरून पडलें. या गृहसमुदायाच्या सभोंवतालीं त्या टौनशिपच्या जमिनी असत आणि त्यांची वहिवाट बहुतेक समाईकच असे; पण कांहीं भाग तेथील राहणाऱ्या स्वतंत्र मनुष्यांच्या स्वाधीन असत. टौनशिपची सर्व व्यवस्था प्रजासत्ताक असे. तेथील ग्रामसभेंत दरएक स्वतंत्र मनुष्य जात असे. आणि तेथील कायदे कानू करणें, तेथील कोर्ट किंवा न्यायसभा भरणें, त्यांच्या अंमलदारांची नेमणूक करणें, आणि त्यांच्या सर्व कारभाराची व्यवस्था ठेवणें हीं कामें त्याच एका सभेच्या हातून होत असत. त्याचे अंमलदार ह्मणजे जेरीफा आणि दशमांशग्राहक असे असत. जेरिफाचें काम न्याय संबंधी असे असें दिसतें, व हंड्रेडाच्या न्यायसभेंत व शायराच्या मंडळींत तो व चार स्वतंत्र मनुष्यें असे मिळून टौनशिपचे प्रतिनिधि असत. दशमांशग्राहक जो असे तोच त्यांचा स्वस्थतारक्षक अथवा पोलीस अधिकारी असे.

इंग्लंडांतील धर्म संबंधी व्यवस्था तेथील दिवाणी व्यवस्थेच्या नंतर उत्पन्न झाली या मुळें टौनशिप पहिल्यानें होऊन पारिश हे विभाग

नंतर करण्यांत आले. प्रोफेसर स्टब्स ह्मणतात कीं ज्या टौनशिपाला अथवा टौनशिपांच्या समूहाला एकच पुरोहित असे व जे त्या एकाच पुरोहिताला आपला दशमांश कर व दुसऱ्या धर्मसंबंधी बाबी देत त्याला पारिश संज्ञा असे. आतां निरनिराळें देवालय व पुरोहित यांची दरएक टौनशिपांत जरूरही नसे व त्यांचा खर्च चालविण्याची अयपत ही नसे. या मुळें कांहीं पारिशांत अनेक टौनशिपांचा समावेश होई. सांप्रतकाळीं कांहीं ठिकाणीं पारिशांची हद्द आणि त्यांतील टौनशिपांची हद्द जुळत नाहीं. पण हें आलीकडील कायद्यामुळें झालेलें आहे. हे पारिश नांवांचे जे इंग्लंडदेशाचे विभाग केले आहेत ते तिसऱ्या एडवर्डाच्या राज्यापर्यंत संपूर्ण झाले नव्हते. पण मध्यंतरीं टौनशिपांच्या व्यवस्थेंत फारच फेरफार घडून आले. सर्व टौनशिपें अवघ्या देशाप्रमाणेंच फ्यूडल सिस्टिम अथवा जहागिरी शिरस्त्याच्या अंमला खालीं आलीं. जुनी व्यवस्था सर्व नाहींशी होऊन तिच्या ऐवजीं वेस्ट्री आणि मानराची न्यायसभा या दोन मंडळ्या स्थापित झाल्या. आणि कांहीं लोकांचे असें ह्मणणें आहे कीं दिवाणी व धर्मसंबंधी अधिकार विभक्त होऊन या दोन रूपांनीं राहिला. मूळचें टौनशिपांचें प्रजासत्ताकरूप जाऊन मानराचें व्यवस्थितराजसत्ताकरूप त्यास कसकसें प्राप्त झालें याची सर्व इत्यंभूत हकीकत आतां कळण्याला फार कठिण आहे. पण मानर आणि टौनशिप हीं दोन्हीं ठळक ठळक धर्मांच्या संबंधानें एकच आहेत हें अगदीं स्पष्ट आहे. प्रोफेसर स्टब्स ह्मणतात कीं "मानर ह्मणजे प्राचीन जें टौनशिप तेंच होय, कमी नाहीं आणि जास्त नाहीं. त्याची वहिवाट करणारे जे जमिनदार त्यांना कांहीं न्यायमनसुब्या संबंधीं हक्क असत. ते हक्क ज्या सनदेअन्वयें त्यांना मानर मिळालें असे त्या सनदेच्या कलमांप्रमाणें भिन्न भिन्न असत. दरएक मानरांत कोर्टबारन ह्मणून सभा असे, ती टौनशिपाची जी गिमाट ह्मणून सभा असे तिच्याच सारखी. त्या सभेनें कायदे कानू करावे आणि सर्व स्थानिक कामाची व्यवस्था लावावी. कांहीं मानरांत कोर्टलीट ह्मणून एक निराळी न्यायसभा असे. तिला फौजदारी संबंधी कांहीं अधिकार असे." तें कोर्टलीट असलें ह्मणजे तेथें हजर असणाऱ्या लोकांना हंड्रेडाच्या कोर्टलीटाला जाण्याची जरूर पडत नसे.

सांप्रतकाळीं मानर आणि मानर कोर्ट अथवा न्यायसभा यांचा स्थानिक राज्यव्यवस्थेंत कांहीं संबंध राहिला नाहीं. आणि या ग्रंथांत त्यांचा पुढील वृत्तांत निवेदन करण्याची कांहीं जरूर नाहीं. मानरांच्या अधिकारांचा सनदांत उल्लेख असल्यामुळें त्या बाहेरील सर्व कारभार क्रमाक्रमानें वेस्ट्रीच्या हातीं गेला. हें खरें आहे कीं, वेस्ट्री ही सभा प्रथमारंभीं टौनाशिपांच्या धर्मसंबंधी कामकाजाकरितांच असे, पण पुढें पुढें मानराच्या अधिकारा बाहेरील काम, मग तें धर्मसंबंधी असो किंवा दिवाणी असो, सर्व त्या वेस्ट्रीच्या हातीं आलें. आणि जेव्हां दिवाणी कामें वेस्ट्रीच्या हातीं येऊं लागलीं, तेव्हां दिवाणी कारभारांत पारिश, टौन, टौनशिप, वील, टैथिंग या सर्व शब्दांचा एकाच अर्थी प्रयोग होऊं लागला. मात्र धर्मसंबंधी कामांत पारिशशब्दाचाच नेहमीं प्रयोग होत असतो. हल्लींचें जें पारिशांचें स्वरूप आहे, तें बहुतकरून एलिजाबेथ राणीच्या राज्याच्या त्रेचाळीसाव्या वर्षांत जो प्रख्यात कायदा करण्यांत आला त्यापासून उपस्थित झालें आहे. त्या कायद्याअन्वयें हल्लींची दीन रक्षणाची व्यवस्था स्थापिली जाऊन दरएक पारिशांत दीनांच्या देखरेखीकरितां प्रेक्षक नेमण्यांत आले, आणि देवालयांतील अंमलदार हुद्याच्या नात्यानें प्रेक्षक असावेत असें ठरलें. त्या कायद्यापासून जेव्हां जेव्हां टौनशिपाकडे नवीन कामें सोंपण्याचा प्रसंग आला, तेव्हां तेव्हां कायदे करणारांनीं जहागिरी व्यवस्थेला एकीकडे ठेवून ही जी धर्मसंबंधी व्यवस्था आहे तीच कामाला लाविली. ह्मणजे तीं कामें मानरांकडे न देतां पारिशांच्या स्वाधीन केलीं. यामुळें पारिश सभेंत, ह्मणजे वेस्ट्री सभेंत, अध्यक्षस्थानीं बसण्याचा हक्क जमिनदाराचा नाहीं, तेथील पुरोहिताचा आहे. आतां हा धर्मसंबंधी पारिश आणि दिवाणी कामासंबंधी पारिश हे दोन्ही मुळचे एक असतां हल्लीं भिन्न कसे झाले हें दाखविलें पाहिजे. हल्लीं सुमारें १९,००० दिवाणी व १३,००० धर्मसंबंधी पारिश आहेत. या १९,००० पैकीं १८७१ सालीं फक्त १०,००० च्या हद्दी त्याच नांवाच्या धर्मसंबंधी पारिशांच्या हद्दीशीं जुळत होत्या. या स्थितीचीं कारणें दोन प्रकारचीं आहेत, धर्मसंबंधी आणि लौकिकसंबंधी. पहिल्या प्रकारच्या कारणांचा तपास केला ह्मणजे असें दिसून येतें कीं देवळें बांधण्याबद्दल जे अनेक कायदे झाले आहेत त्यांतील अधिकारा-

अन्वयें, कांहीं पारिशांत लोक संख्या जास्त झाल्यामुळें धर्मसंबंधी कामाकरितां त्यांचे पोट विभाग केले आहेत, आणि ते निरनिराळे पारिश असे गणले जातात. पण दिवाणी कामाच्या संबंधानें या पोट विभागांपासून पारिशाला कांहीं बाध नाहीं. लौकिक संबंधाचीं कारणें अंमळ जास्त भानगडीचीं आहेत. एक तर मोठाल्या पारिशांच्या हद्दीजवळचीं जीं टौनशिपें आहेत त्यांना चालू वहिवाटीमुळें आपआपले निरनिराळे स्वतंत्र प्रेक्षक नेमण्याचा व दीनार्थ कर स्वतंत्र रीतीनें भरण्याचा हक्क फार दिवसांपासून मिळाला आहे. त्यावर १८१९ सालीं एक कायदा मंजूर झाला त्याअन्वयें साठ वर्षें पर्यंत मूळ पारिशापासून या रीतीनें विभक्त पडलेले पारिश कायम करण्यांत आले. पण अशा रीतीनें नवीन पारिशांच्या उत्पत्तीस आतां निषेध प्राप्त झाला आहे. दुसरें कारण असें कीं कांहीं स्थलीं हा पारिश विभाग साक्षात् कायद्यानेंच केला आहे. उदाहरण, १८६२सालीं एककायदा मंजूर झाला. त्यांत उत्तरेकडील प्रांतांत कांहीं पारिश फार अवाढव्य झाले आहेत असा उपन्यास करून ठरविलें आहे कीं त्या प्रांतांतील दर एक टौनशिपांत व गांवांत स्वतंत्र प्रेक्षक असावे. शिवाय, कांहीं ठिकाणीं मुळचें जंगल किंवा दलदल असल्यामुळें, तीं पारिशाच्या बाहेर ह्मणून वहिवाट पडून तशींच गणलीं जात असत. पण १८५७ आणि १८६८ सालीं मंजूर झालेल्या कायद्यांअन्वयें तीं ठिकाणें जवळच्या पारिशांतच सामील करण्यांत आलीं आहेत. आतां दीन रक्षणार्थ कायद्यांचें जाळें सर्व इंग्लंड देशावर अशा रीतीनें पसरलें आहे कीं, मनुष्य कर भरण्याच्या लायक मात्र असला पाहिजे, मग तो किती ही उडाणटप्पू असेना, त्याला त्या जाळ्यांतून सुटण्यास मार्ग सांपडतच नाहीं. याशिवाय दुसरी एक कायद्यांची मालिकाच लागून गेली आहे तिच्या योगानें पारिशांचे तुटक विभाग जे असतील ते जवळच्या पारिशांत सामील होतात. या सर्व कारणांचा परिणाम असा झाला आहे कीं दिवाणी पारिशांपैकीं सुमारें एक तृतीयांशाचा धर्मसंबंधी पारिशाशीं मुळींच संबंध राहिलेला नाहीं.

कारभाराच्या संबंधानें पारिशांची पूर्वींची मातबरी आतां फारशी राहिली नाहीं. त्यांच्या विस्ताराच्या वैषम्यामुळें आणि जुन्या काळच्या

व्यवस्थेमुळें कारभार नीट रीतीनें चालण्यास अडचणी येतात. आणि यामुळें पारिश अंमलदारांचे अधिकार एकामागून एक त्यांच्या कडून काढून घेऊन दुसऱ्या अधिकारि मंडलास देण्यांत येत आहेत. उदाहरण, १८३४ सालीं दीनरक्षणार्थ कायद्याची व्यवस्था वेस्ट्रीच्या हातून काढून गार्डियन नामक अधिकाऱ्यांकडे सोंपली गेली. १८५६सालीं कौंटी पोलीस स्थापन झाल्यापासून पूर्वींच्या पारिश कनिष्टबलाची जरूर राहिली नाहीं. आणि १८७२ सालच्या कायद्यांत कानिष्टबलांची जागा कमी करण्याची परवानगी सर्व पारिशांना मिळाली आहे. खेड्या पाड्यांतील सार्वजनिक आरोग्यरक्षणाबद्दलची मुखत्यारी वेस्ट्रीकडे जी असे ती १८७२ सालच्या सार्वजनिक आरोग्याबद्दलच्या कायद्याअन्वयें गार्डियनांकडे गेली. शहरांत तर तो अधिकार त्यांच्याकडून पुर्वींच गेला होता. सांप्रत कालीं पारिश व्यवस्थेचा उपयोग ह्मणजे काय तो दोन कार्यांसंबंधी आहे. एक कराच्या कामांत, आणि दुसरें प्रतिनिधि नेमण्याच्या कामांत. दीन रक्षणार्थ करांत ज्या करांचा समावेश होतो ते सर्व कर पारिशापारिशांकडूनच घेतले जातात, आणि हौस ऑफ कॉमन्स व म्युनिसिपालिटया यांच्या करितां प्रतिनिधि निवडणार असामींच्या यादी ज्या असतात त्या ही पारिशवारच करण्यांत येतात.

पारिशांचे मुख्य व्यवस्थापक ह्मणजे एक वेस्ट्री आणि प्रेक्षक. पुर्वीं सांगितलेंच आहे कीं वेस्ट्री ह्मणजे मुळची धर्मसंबंधी कारभार करणारी टौनशिपाची सभा, आणि तिला हें नांव जुन्या सभा भरण्याच्या जागेवरून प्राप्त झालें होतें. सुमारें तीनशें वर्षांच्या मागली जर आपण स्थिती पाहूं गेलों तर असें दिसून येतें कीं दरएक इंग्रज मुख्य संस्थापित धर्मपंथांतला असे इतकेंच नव्हे, तर आपल्या पारिशांतील देवालयास जाण्याचें त्याच्यावर बंधनही असे. पारिशांत ज्या जाहिराती द्यायच्या त्या सर्व देवळांत देत असत, आणि प्रार्थना वगैरे आटपल्या नंतर पारिशासंबंधी सर्व कामकाजाची वाटाघाट करून निर्णय करण्याला गांवकरी मंडळी जमून देवळाच्या बाहेरल्या आंगच्या खोलींत जाऊन बसण्याचा प्रघात असे. त्या काळीं हें सोईवार असल्यामुळें असा प्रघात पडणें साहाजिक

253344

होते. हल्लीं पारिशांसंबंधीं जाहिराती देवालयांत देतां येत नाहींत. तरी अजूनही देवालयाच्या दरवाज्यावर चिकटविण्यास हुकूम आहेच. आणि दुसरी अशी तजवीज केली आहे कीं दोन हजारांपेक्षां जेथें पारिशांतील लोकसंख्या जास्त असते तेथें देवालयाच्या फार जवळ मोठ्या व दंग्याच्या सभा न व्हाव्या ह्मणून वेस्ट्री मंडळीला वेस्ट्रीगृह बांधण्यास अथवा भाड्यानें घेण्यास परवानगी दिली आहे.

वेस्ट्री दोन प्रकारच्या आहेत. एक साधारण आणि एक निवडक. साधारण वेस्ट्री ह्मणजे एखाद्या पारिशांतील सर्व कर भरणाऱ्या इसमांची भरलेली सभा. त्या सभेंत दर एक कर भरणाराला मत देण्याचा हक्क आहे, मग तो तेथील रहिवासी असो किंवा नसो. वेस्ट्रीची सभा भरण्यापूर्वीं तीन दिवसांची सूचना दिली पाहिजे. पारिशांतील ग्रामोपाध्याय हजर असल्यास अध्यक्षस्थानीं बसण्याचा अधिकार त्याचा आहे. जर तो हजर नसला, किंवा तो पारिश धर्मसंबंधी पारिशापासून भिन्न असला, तर सभेनें पाहिजे त्याला अध्यक्ष नेमावें. सभेच्या कामाचें टांचण ठेविलें पाहिजे, आणि त्यावर अध्यक्षानें आपली सही घातली पाहिजे. सभेचा अभिप्राय हस्तोत्क्षेपणानें कळावयाचा, परंतु हजर असलेल्या कोणत्याही सभासदास मतें मोजून घेवविण्याचा हक्क आहे; जर मतें मोजून घ्यावयाचीं असलीं तर अनेक संमतींचा शिरस्ता आहे; ह्मणजे कराच्या आकारणीप्रमाणें दरएक कर भरणाराला एका पासून सहापर्यंत संमति देतां येतात. पन्नास पौंड आकारणी वर एक संमति; याउपर आकारणीच्या दर एक पंचवीस पौंडाला एक संमति;त्या सहा संमति होत तों पर्यंत. सहाच्या वर संमति, आकारणी कितीही असली, तरी कोणास मिळत नाहीं. कर भरणारीण स्त्री असली तर तिला संमति देतां येते, आणि संभूयकारी मंडळी असली तर तिच्या तर्फेनें चिटणीस अथवा इतर मुखत्यारानें संमति द्यावी असा नियम आहे

कांहीं पारिशांत निवडक वेस्ट्री भरण्याची वहिवाट पडली आहे. असें असलें ह्मणजे वेस्ट्रीचे सभासद असावे किती व त्यांची निवडणूक व्हावी कशी, यागोष्टींचा निकाल वहिवाटीनुरूप होतो. निवडणुकी बहुतकरून सहकार्यमंत्रणाच्या रीतीनें होतात; ह्मणजे सभासदांनींच आपल्या जोडीस

आणखी सभासद निवडून नेमावे. अशी वहिवाट पडण्यास कारण बहुतकरून पारिश संबंधी कारभाराबद्दल पुष्कळ रहिवासी लोकांत अनास्था हेंच असावें. १८३१ सालीं एक कायदा मंजूर झाला त्याला हाबहौसचा कायदा असें ह्मणण्याचा प्रघात आहे. त्या कायद्या अन्वयें हीं कांहीं निवडक वेस्ट्री स्थापल्या गेल्या आहेत. तो कायदा आज्ञापक नाहीं फक्त अनुज्ञापक आहे. आणि शिवाय कर भरणाराची संख्या आठशें वर असली तरच तो अंमलांत आणितां येतो. अंमलांत आणणें असलें तर रहिवासी लोकांस योग्य सूचना दिली पाहिजे आणि त्यांपैकीं दोन तृतीयांशांचा अभिप्राय तसें करण्यास अनुकूल असला पाहिजे. त्या कायद्याप्रमाणें निवडक वेस्ट्रीची निवडणूक कर भरणारांकडूनच व्हावयाची. ह्या निवडणुकींत दरएक कर भरणाराला एकच संमति देतां येते. सभासदांची संख्या अशी नियमित केली आहे कीं दर १००० करभरणाऱ्या लोकांना १२ वेस्ट्रीचे सभासद असावे, पण एकंदर सभासदांची संख्या १२० पेक्षां जास्त असूं नये. पारिशांतला ग्रामोपाध्याय आणि देऊळतपासनीस हे हुद्याच्या नात्यानें सभासद असावयाचे. निवडक वेस्ट्रींतिल सभासदांपैकीं एकतृतीयांशांना दरवर्षास हुद्दा सोडावा लागतो. याशिवाय पारिशधर्मखात्याचे हिशेब प्रसिद्ध करण्याविषयीं, आणि तपासण्या करितां हिशेबतपासनीस नेमण्याविषयीं, हीं कायद्यांत कलमें आहेत. लंडन राजधानींत हा कायदा बराच अंमलांत आणिला होता, नंतर तो तेथें लागू करूं नये असा ठराव करण्यांत आल्यामुळें आतां त्याचे अंमलाखालीं फारसे पारिश राहिले नाहींत असें वाटतें.

वेस्ट्रीचीं कामें ह्मणजे मुख्यत्वें करून पारिशांच्या मिळकतीची, व तेथें धर्मखातीं असल्यास त्यांची, व्यवस्था चालविणें, आणि कांहीं अनुज्ञापक कायदे लागू करून बजावणें, हीं होत. उदाहरणार्थ, वेस्ट्रीला धर्मार्थग्रंथालयासंबंधी कायदा लागू करून अमलांत आणण्याचा अधिकार आहे. तसेंच खेड्यापाड्यांतील पारिशाला १८३३ चा दिवेबत्ती व रखवालदारीचा कायदा लागू करून तेथें दिवेबत्तीची तजवीज त्यांना करतां येते. शिवाय जास्त प्रेतनिधानाची जागा पाहिजे असा त्यांना

ठराव करतां येतो. आणि मग या जागेच्या देखरेखीला अधिकारि-मंडल नेमण्याचें काम त्यांचेकडेच आहे. पण वर दर्शविल्याप्रमाणें त्यांची नित्याचीं कामें बहुतेक त्यांच्या हातून काढून घेतलीं आहेत. मोठ्या पारिशांत एक पगारी कारकून नेमण्यास मोकळीक असते. तो वेस्ट्रीच्या चिटणिसाचें काम चालवून प्रेक्षकांना आपलें काम बजावण्यास मदत करतो.

दिवाणी पारिशाचे अंमलदार दीनजनप्रेक्षक हे होत. दिवाणी आणि धर्मसंबंधी पारिश जेथें एकच आहेत तेथें देऊळ तपासनीस हुद्याच्या नात्यानें प्रेक्षक असतात. या शिवाय दर एक पारिशांत नेमलेलेही प्रेक्षक असतात. इलिझाबेथ राणीच्या कारकीर्दीतल्या कायद्यांत असें कलम होतें कीं चार, तीन, किंवा दोन ऐपतदार गृहस्थ दरएक पारिशांत प्रेक्षक नेमावे. त्या नंतर मंजूर झालेल्या कायद्याप्रमाणें एकच प्रेक्षक नेमला तरी चिंता नाहीं. त्याची नेमणूक दरवर्षास जस्टिस लोक करितात आणि ती मार्च महिन्याच्या २६ व्या तारखेस किंवा त्या तारखेपासून चवदा दिवसांच्या आंत झाली पाहिजे. कांहीं नालायकीबद्दल व मोकळिकीबद्दल अटी आहेत. पण त्या लागू नसल्या ह्मणजे ज्याची नेमणूक होईल त्याला काम पत्करलेंच पाहिजे. ज्याची मर्जीविरुद्ध नेमणूक झाली असेल त्याला क्वार्टर सेशन्सच्या अधिकाऱ्याकडे अपील करतां येतें. प्रेक्षकांना पगार नसतो. आपलें काम चालविणारा बदली नेमण्याचा, किंवा त्याला पगार देण्याचा, त्यांना अधिकार नाहीं. पण प्रेक्षकांचीं कांहीं अथवा सर्व कामें करण्यास्तव एक किंवा जास्त समजूतदार पुरुष मदतनीस प्रेक्षक ह्मणून नेमण्यास वेस्ट्री मुखत्यार आहे. अशा प्रकारें नेमलेल्या लोकांची दोन जस्टिस लोकांच्या मोर्तबांनिशीं नेमणूक करण्यांत येते. मदतनीस प्रेक्षकांचा पगार दीनार्थ करांतून दिला जातो; आणि त्यांना जामीन द्यावे लागतात. गार्डियनांच्या अर्जावरून पारिश यूनियनांतील कोणत्याही पारिशा करितां पगारदार उग्राणी करणारही नेमतां येतो.

दीनांच्या तर्तुदी संबंधी जें प्रेक्षकांचें काम असे तें आतां गार्डियनांकडे सोंपविलें आहे. पण अजूनही फार निकड असल्यास दीन

लोकांना मदत मिळविण्याबद्दल प्रेक्षकांना हुकूम देतां येतो. प्रेक्षकांचें दुसरें एक काम जुरीच्या लोकांची याद तयार करणें आणि हाऊस ऑफ कामन्स व म्युनिसिपालिट्या यांच्या करितां सभासद निवडण्याचा हक्क ज्यांना आहे त्यांच्या नांवाच्या यादी तयार करून प्रसिद्ध करणें, हें आहे. त्याचप्रमाणें कोणी आपलें नांव दाखल केल्याबद्दल हरकत घेतली किंवा न दाखल केल्यामुळें हक्क सांगितला तर तशा लोकांची नांवानिशीही तेच छापतात आणि चौकशीच्या वेळीं तपासणाऱ्या न्यायाधीशां-समक्ष त्यांना आपल्या वह्यांनिशीं हजर रहावें लागतें. पण त्यांचें मुख्य काम ह्मटलें ह्मणजे दीनार्थकर बसवून गोळा करणें हें होय. या विषयीं मि. आर. एस. राइट साहेब ह्मणतात कीं हा दीनार्थकर पारिशांतील सर्व जमिनी, घरें, व खाणी, यांच्या निव्वळ किंमतीच्या आकारणीवर एकसारख्या दरानें घेतला जातो. किंमतींची याद यूनियन कमिटी कायम करते, आणि कर बसवितांना पूर्वींची किंमतींची याद, दुरुस्ती वगैरे झाल्या असतील त्यां सुद्धां, घेऊन प्रेक्षक तिची नक्कल एका पत्रकावर करितात, व त्यांतच रुपया मागें अमुक आणे घेतले ह्मणजे जितकी पाहिजे असेल तितकी रकम उभी होईल असें दर्शवितात. आणखी त्याच पत्रकांत दोन सदरें जास्त जोडतात. एकांत दर एक वहिवाटदाराकडून किती रकम घ्यावयाची तें लिहितात. आणि दुसऱ्यांत थकलेली बाकी अथवा सूट दिलेली असेल ती दाखवितात. अशा रीतीनें तयार केलेल्या पत्रकास असेस्मेंट ह्मणावें. तें बिनचूक आहे अशा विषयीं खालीं दाखला असतो त्यावर प्रेक्षकलोक सही करतात. आणि मग तें जस्टिस लोकांकडे मंजुरीस पाठवितात. कर नीट शिरस्त्या प्रमाणें असल्यास मंजुरी दिलीच पाहिजे. मंजुरी मिळाली ह्मणजे तें पत्रक रेट ह्मणून ठरलें. तें प्रसिद्ध करावें लागतें. आणि सर्व कर भरणारांस व कांहीं अंमलदारांस पाहिजे तेव्हां तें पाहण्याची मोकळीक आहे. कोणाकडूनही जी रकम घेणें असेल, तिच्या बद्दल लेखी मागणी केली पाहिजे. या शिवाय कांहीं भानगडीचीं कलमें आहेत, त्यां अन्वयें वहिवाटदारानें कर भरण्याऐवजीं लहान घरें वगैरेचे मालकांनाच एक उधड रकम भरून देतां येते. या विषयींची मोठीं

महत्वाचीं कलमें १८६९ सालच्या एका कायद्यांत आहेत. त्या अन्वयें आठ पौंड अथवा त्यापेक्षां कमी ज्या घरांची आकारणी झाली असेल, त्या घरांच्या मालकांना वेस्ट्रीच्या संमतीनें पंचवीस टक्के कमी करून उधड रकम देतां येते. किंवा वेस्ट्रीला तीस टक्के कमी करून त्यांच्या कडून उधड रकम जबरीनें वसूल करतां येते.

एक गोष्ट या संबंधी लक्षांत ठेविली पाहिजे कीं दीनजनांच्या तर्तुदीचा कांहीं संबंध नसतांहीं कांहीं खर्चाच्या रकमा दीनार्थ करांतून द्याव्या आणि कांहीं कर ही या कराचे अंशभूत असल्यासारखेच त्या बरोबर वसूल करावे असा कायद्यांत टराव आहे. उदाहरणार्थ बरोच्या संबंधाचा कर या रीतीनें वसूल करतां येतो.

## धर्मसंबंधीपारिश.

१८६८सालच्या कायद्यानें धर्मसंबंधी कर सर्वांनीं भरण्याची जरूर नाहीं असें टरविल्यापासून धर्मसंबंधी पारिशांची स्थानिक राज्यव्यवस्थेच्या संबंधानें व्यवहारदृष्ट्या मातबरी फारशी राहिली नाहीं. आतां पारिश व्यवस्था ही केवळ वैकल्पिक व्यवस्था होऊन राहिली आहे. तथापि पूर्वी स्थानिक कारभारांत हें एक मोठेंच प्रकरण होतें; आणि ज्यापक्षीं तें केवळ आलीकडे नाहींसें झालें आहे, त्यापक्षीं त्या विषयीं थोडीशी माहिती दिली असतां गैर होणार नाहीं. शिवाय यद्यपि इंग्रजी प्रजेवर धर्म संबंधी पारिशांचें रहिवासी या नात्यानें फारसा बोजा नसला तथापि कायद्या प्रमाणें तिला त्या नात्यानें कांहीं महत्वाचे हक्क आहेत. इंग्रजी कायद्यांच्या नियमांप्रमाणें हर एक इंग्रज संस्थापितधर्मपंथांतला आहे असाच गणला जातो. पंथांतर करण्याची मोकळीक अनेक कायद्यांनीं त्याला प्राप्त झाली आहे. त्या कायद्या वरून एखाद्याच विशेष मुद्याचा निकाल झाला आहे; अथवा एखादें विशेष अनिष्ट वारलें आहे. पण असें पंथांतर केल्यानें राष्ट्रीय पंथांतला असल्यापासून जे कांहीं हक्क मिळतात ते त्याचे जात नाहींत. त्या कायद्यांचा परिणाम इतकाच कीं त्या संबंधानें जीं कांहीं त्याचीं त्रास दायक कर्तव्यकर्मे असत, त्यांतून तो मुक्त झाला. येथें ही गोष्ट विसरतां कामां नये कीं साधारण आणि नैमित्तिक अशा दोन्हीं

प्रकारचा दशमांश कर संस्थापितपंथांतले व पंथांतर केलेले अशा उभयतांना भरावे लागतात. धर्मसंबंधी पारिशाचे सर्व कारभार वेस्ट्री चालविते, आणि वेस्ट्री ह्मटली ह्मणजे, ग्रामोपाध्याय, देऊळ रक्षक, आणि पारिशकरलोक यांचीसभा. देऊळ व प्रेतिनिधानाची जागा यांच्या मरामतीसाठीं आणि देवळांतील सामानसुमान व दागदागिने हीं नीट राखण्यासाठीं जो खर्च लागेल त्याकरितां धर्मकर बसविण्याचें काम वेस्ट्री कडे असे आणि अजूनही आहे असें ह्मटलें तरी कदाचित् चालेल. हें खरें आहे कीं १८६८ सालच्या एका कायद्या करून धर्मकर जेथें पुर्वी गहाण लावून दिलेलें नसतील तेथें ते वसूल करण्यास कोर्टांकडून मदत मिळूं शकत नाहीं. पण तें कर अजूनही देण्या घेण्यास प्रत्यवाय नाहीं असा त्याच कायद्याचा स्पष्ट गर्भितार्थ आहे. कारण संभूयकारी मंडळ्यानीं अथवा दिंमतदारांनीं धर्मकर भरल्यास त्यांना ते हिशोबीं मजुरा मिळतील असें एक त्याच कायद्यांत स्पष्ट कलम आहे. त्याशिवाय धर्मकर ज्यानें भरला नसेल त्याला त्या करांपासून उत्पन्न झालेल्या पैक्याच्या खर्चाबद्दल मत देण्याचा हक्क नाहीं असें ही एक कलम आहे. यावरून असें दिसून येतें कीं ज्यांना कायद्यांत अनावश्यक कर्तव्यें ह्मणून ह्मणतात त्यांपैकीं धर्मकर भरणें हें एक कर्तव्य आहे. ह्मणजे तें कर्तव्य तर खरेंच, पण तें न केलें असतां त्याबद्दल कांहीं दंड नाहीं. धर्मसंबंधी पारिशाच्या धर्मविषयक कामांत अंमलदार ग्रामोपाध्याय, आणि दिवाणी कामांत देऊळरक्षक. ग्रामोपाध्याय जो असतो, मग तो, रेक्टर, विकर, अथवा इन्कम्बंट असो, त्याला इंग्रजी कायद्यांत कार्पोरेशन सोल असें ह्मणतात, ह्मणजे कायद्याच्या दृष्टीनें त्याचे हक्क व त्याचीं कर्तव्यें हीं व्यक्तीस अनुलक्षून विहित नसतात, त्याच्या हुद्यास अनुलक्षून असतात. उपाध्यायाचीं कर्तव्यें ह्मणजे कायद्यांनीं ठरविल्या प्रमाणें देवळांतील धर्मकर्में करावीं. त्यांशिवाय त्याच्याकडे कांहीं व्यावहारिक कामें ही आहेत. उदाहरणार्थ, त्याला नोंदणीचें काम करावें लागतें; ह्मणजे त्याच्या कडून उपाध्यायाच्या नात्यानें ज्या बाप्तिस्म्याचा अथवा विवाहाचा विधि झाला असेल त्यांबद्दल व्यावहारिक उपयोगाकरितां त्याला लेख ठेवावा लागतो. तसेंच त्याच्या देखरेखी खालच्या प्रेतनिधानाच्या जागेत

जितकीं प्रेतें गाडलीं असतील तितकीं नोंदलीं पाहिजेत. आणि त्या बद्दलची शिरस्त्याप्रमाणें फी घेण्याचा त्याला हक्क आहे, मग तो गाडण्याचें क्रियाकर्मांतर करावयास असला नसला तरी हरकत नाहीं. हुद्याच्या नात्यानें देऊळ त्याच्या स्वाधीन असतें. व अनेक कार्यांस्तव देवळाची व तत्संबंधी जमीनीची मालकी त्याची अशी गणली जाते. प्रेतनिधानस्थलाची देखील मालकी त्याचेकडेच, पण त्यावर गृहस्थ मंडळीचा गाडण्याचा हक्क आहे. साधारण इंग्रजी कायद्या प्रमाणें पारिशाचे हद्दींत जो मरतो तो पारिशांनला रहिवासी असो नसो त्याला पारिशांच्या प्रेतनिधानस्थलांत गाडलें पाहिजे. आणि कोणी आपल्या पारिशा बाहेर मेला तरी त्याला आपल्या प्रेतनिधानस्थलांत गाडण्याचा हक्क आहे. दोन वर्षां मागें या साधारण हक्कांत एक नियामक असे. तें असें कीं पवित्र केलेल्या स्थलांत संस्थापितपंथाच्याच विधीनें गाडतां येतें असें, दुसऱ्या विधीनें नाहीं. आणि धर्मनियमा प्रमाणें तर ज्याला बाप्तिस्मा प्राप्त झाला नाहीं, किंवा जो मरणकालीं बहिष्कृत होता, किंवा ज्यानें आत्महत्येचा गुन्हा केला असेल, त्याचें संस्थापितपंथाप्रमाणें और्ध्वदेहिककर्म निषिद्ध आहे. पण १८८० सालीं जो कायदा झाला आहे त्यांत जरी सदरील नियमाचा कंठतः निषेध केला नाहीं, तथापि त्या नियमाचा पाया मोडून टाकला आहे. कारण त्यांत असें ठरविलें आहे कीं पारिशप्रेतनिधानस्थलीं गाडून घेण्याचा ज्याला हक्क आहे असा एखादा मनुष्य मेला, तर त्याच्या आप्त मंडळीला कायद्याप्रमाणें सूचना देऊन, उपाध्यायापाशीं विचारपूस न करितां, त्यास्थलीं गाडविण्याची मोकळीक आहे. त्या प्रसंगीं धर्मक्रिया मुळींच न केली तरी चालते, किंवा आप्त मंडळीस योग्य वाटेल त्या प्रकारची केली तरी चालते, मात्र ती संभावित रीतीची व ख्रिस्ती मताप्रमाणें असली पाहिजे. या शिवाय संस्थापितपंथांतील धर्मोपाध्यायांना प्रसंगविशेषीं प्रेतनिधान क्रिया गाळून टाकून तिच्या ऐवजीं प्रार्थना ग्रंथांतून महोपाध्यायाच्या संमतीनें निवडलेलीं प्रार्थनागीतें गाण्यास त्या कायद्या अन्वयें मोकळीक आहे. १८८२ सालच्या एका कायद्या अन्वयें, अपमृत्युप्रेक्षकांच्या तपासणी वरून आत्महत्येचा गुन्हा शाबीत झाला असेल, तर पूर्वीप्रमाणें आत्मघातकाला राजरस्त्यावर

गाडावें अथवा त्याच्या शवांतून काठी रोवून गाडावें असा हुकूम करितां येत नाहीं, तर जेथें आत्महत्या न झाली असतां त्याचें प्रेत गाडतां आलें असतें तेथेंच गाडण्याचा हुकूम दिला पाहिजे. या कायद्याचीं कलमें स्पष्टशीं नाहींत, पण अशा प्रसंगीं ख्रिस्ती धर्माप्रमाणें गाडण्याची क्रिया निषिद्ध आहेसें वाटतें. आमची हल्लीं सुधारणेची पायरी कोणती आहे हें पाहतां अशा प्रकारचा कायदा या पूर्वींच झाला नाहीं हें मोठें चमत्कारिक आहे.

धर्मसंबंधी पारिशांच्या दिवाणी अंमलदारांमध्यें मुख्य देऊळरक्षक हे होत. ते बहुधा दोघे जण असतात. आणि दर वर्षास गुड फ्रैडे नंतरच्या पहिल्या आठवड्यांत निवडले जातात. जर ग्रामोपाध्याय आणि पारिश रहिवासी यांचा निवडणुकीच्या कामांत मतभेद पडला तर उपाध्याय एकास नेमतो, आणि वेस्ट्री सभा दुसऱ्यास नेमते. असें ह्मणतात कीं धडधडीत नालायक मनुष्य जर निवडण्यांत आला तर महोपाध्यायाला प्रतिबंध करण्याचा अधिकार आहे.

कोणीही कर भरणारा गृहस्थ त्या हुद्यास लायक आहे, आणि जसा इतर स्थानिक हुद्यांविषयीं शिरस्ता आहे तसाच याही हुद्याविषयीं असा शिरस्ता आहे कीं निवडणूक झाली ह्मणजे कामगिरी कबूल करणें भाग आहे. साधारण इंग्रजी कायद्याप्रमाणें देऊळरक्षक न होण्याबद्दल बडे लोक व पार्लमेंट सभेचे सभासद यांस मोकळीक आहे. आणि निरनिराळ्या लेखी कायद्यांनीं कांहीं प्रतिष्ठित धंद्याच्या लोकांस तशीच मोकळीक दिली आहे. धर्मसंबंधी मतभेद मोकळीक मिळण्यास योग्य कारण ह्मणून गणला जात नाहीं, पण धर्मसंबंधी अप्रतिबंधाविषयींच्या कायद्यांत असा ठराव केला आहे कीं, जर एखाद्या पंथांतर केलेल्या गृहस्थास देऊळरक्षकाच्या हुद्यावर नेमलें तर त्याला नायबाच्या हातीं काम करविण्याची परवानगी आहे. आणि त्यानंतरच्या एका कायद्यानें तशीच परवानगी रोमन क्याथलीक पंथाच्या लोकांसही मिळाली आहे. धर्मसंबंधी पारिश आणि दिवाणी पारिश एकच असला ह्मणजे देऊळरक्षक हुद्याच्या नात्यानें दीनप्रेक्षकही असतो. देऊळ व जवळची प्रेतनिधानाची जागा यांची मरामत नीट राखण्याचें काम देऊळरक्षकाचें आहे. मरामत करण्याची जरूर

लागली ह्मणजे तीं करण्यास खर्च किती लागेल याचा अजमास त्यांना काढावा लागतो. आणि मग लागेल तो कर बसविण्याकरितां वेस्ट्रीची सभा त्यांनींच भरविली पाहिजे. आवश्यक देवालयकर काढून टाकला आहे तरी या बाबतींत त्यांचें जें काम आहे त्याचा बोजा त्यांचे शिरावरून गेला नाहीं. हा प्रकार साधन तर देत नाहीं आणि कार्य तर झालें पाहिजे असें ह्मणण्यासारखा आहे खरा, पण असें इंग्रजी कायद्यांत इतर ठिकाणींही आढळतें. देऊळरक्षकांना आपल्या खर्चवेंचाचा हिशेब दरसाल स्थानिक व्यवस्था मंडलाकडे रूजू करावा लागतो. या शिवाय प्रार्थना वगैरे चालू असतां देवळांत बेतबात राखण्याचें काम देऊळरक्षकाचें आहे. आणि प्राचीन काळीं पारिशांतील सर्व लोकांची चालचलणूक वगैरे विषयीं पूसतपास करण्याचें काम ही त्यांनां करावें लागे. मग ज्यांची वर्तणूक गैर असे त्यांनां धर्मसंबंधी ठपका मिळावा किंवा दंड व्हावा ह्मणून गुडफ्रैडेच्या परीक्षणयात्रेच्या प्रसंगीं देऊळरक्षक हजर करीत. या शिवाय दुसऱ्या दोन व्यावहारिक अमलदारांबद्दल येथें चार शब्द लिहिले पाहिजेत. पारिश कारकुनाचा हुद्दा पूर्वी मोठ्या दर्जाचा असे; आतां त्याचा मोठेपणा नाहींसा झाला आहे. तो हुद्दा वतनदारी सारखा असे. कारकुनाला प्रथमारंभीं जी फी मिळण्याची वहिवाट असे ती आतां लेखी कायद्या अन्वयें ठरवून ठेविली आहे. १८८४ सालाच्या एका कायद्यांत असें कलम आहे कीं पारिश कारकुनाचें काम करून फी घेण्यास क्युरेट लोकांनां मोकळीक आहे. आणि दुसरें एक कलम पारिश कारकुनाला दुर्वर्तनाकरितां बरतरफ करण्याबद्दल आहे. आतां उरल्यापैकीं त्याचें दिवाणी काम ह्मणून इतकेंच कीं कांहीं सार्वजानिक कारखाने सुरू करण्यापूर्वीं त्यांच्यापाशीं कांहीं नकाशे व दस्ताऐवज गुदरावे लागतात ते त्यानें नीट राखून ठेवावे. आणखी एक धर्मसंबंधी पारिशांचा अमलदार राहिला, तो सेक्स्टन. त्याची निवडणूक बहुधा वेस्ट्री कडून होत असते. हा हुद्दा फार पुरातन असून वतनदारी सारखा आहे. सेक्स्टनचें काम ह्मणजे देऊळ नेहमी साफसूफ करून स्वच्छ ठेवावें, आणि देऊळरक्षकाच्या हुकुमाखालीं देवळांतील सामानसुमानावर देखरेख ठेवावी. मयत मनुष्या करितां खाडा खणणें व तो भरून काढणें हें ही त्याचेंच काम,

आणि त्याला त्याबद्दल शिरस्त्या प्रमाणें कांहीं फी मिळते. त्या हुद्या विषयीं एक गोष्ट सांगण्या सारखी ही कीं स्त्रियांनां हाच कायतो धर्मसंबंधी हुद्दा देतां येतो. किंग्सबेंच नांवाच्या मोठ्या कोर्टापुढें या मुद्यावर तकरारी होऊन न्यायधीशांनीं असें ठरविलें कीं स्त्रिया या हुद्यास लायक आहेत, आणि कर भरणाऱ्या स्त्रियांना निवडणुकींत आपलीं मतें देण्याचा हक्क आहे. या ठरावाचें कारण जें दिलेलें आहे तें स्त्रियांस कांहीं भूषणास्पद ह्मणण्या सारखें नाहीं. पहिल्या मुद्यावर न्यायाधीशांच्या मनांत मुळींच शंका नव्हती. दुसऱ्यावर पहिल्यानें शंका होती, पण अखेरीस स्त्रियांच्या तर्फेनें निकाल केला, आणि निकालास आधार असा दाखविण्यांत आला कीं "ज्या अर्थीं या हुद्यांचा जनसमाजाशीं अथवा पारिशराहिवाशांच्या नीतियुक्त वर्तनाबद्दल देखरेख करण्याच्या व काळजी घेण्याच्या कामाशीं संबंध नाहीं, त्या अर्थीं ज्या स्त्रिया कर भरतात त्यांना निवडणुकींत अभिप्राय देण्याचा हक्क नसण्याला कांहीं कारण दिसत नाहीं."

## भाग. ४

इंग्लंडदेशाचे यूनियन ह्मणून कांहीं विभाग केले आहेत त्यांचा मुळचा संबंध दीनजनांच्या तर्तुदीसाठीं केलेल्या कायद्याशीं आहे. पण प्रसंगें करून दुसऱ्याही कामांशीं संबंध जुळला आहे. यूनियन ह्मणजे एका गार्डियनमंडलाच्या हद्दींतला प्रदेश. बहुत करून दीनजनांकरितां केलेल्या कायद्याच्या संबंधाचें जे पारिश आहेत, तसे कांहीं पारिश मिळून एक यूनियन होतें. पण लोकसंख्या फार असली तर एकाच पारिशास सुद्धां यूनियनांची अधिकारव्यवस्था घालून देतां येते. सर्व मिळून इंग्लंडांत ६४९ यूनियनें आहेत. त्यां पैकीं २९ एकएकट्या पारिशाचीं अशीं आहेत. बाकींचीं पारिशसमूहघटित आहेत. यूनियनें, क्षेत्रफळ व लोकसंख्या यांच्या संबंधानें बरोबरीचीं नसतात. आणि पुष्कळांचीं हद्दही फार वेडीवाकडी गेलेली असते. यूनियनाच्या हद्दींची आणि दानार्थ कायद्याच्या संबंधाचे जे पारिश त्यांच्या हद्दींची मिसळ कोठेंहीं झालेली नाहीं. पण यूनियनांच्या हद्दी दुसऱ्या स्था-

निक व्यवस्थेकरितां केलेल्या विभागांचा विचार मुळींच न करतां चालू न दिल्या आहेत. ६४९ यूनियनांपैकीं १८१ यूनियनांच्या हद्दी कौंटीच्या हद्दींमधून जातात. क्षेत्रफळाच्या न्यूनाधिकतेचें उदाहरण पाहिजे असल्यास हें घ्या. हर्फोर्डशायरांत वेल्विन यूनियन जें आहे त्यांत चार पारिश आहेत. आणि त्यांच्या देखरेखीला पांच गार्डियन आहेत. मार्पेथ यूनियनांत बाहात्तर पारिश आहेत, आणि तेथें गार्डियन पाऊणशें. लिंकन यूनियनाला एकशेंचार गार्डियन आहेत. तसेंच खेड्या पाड्यांतील युनियनें घ्या. १८७४ सालीं प्रेस्टैन युनीयनांत लोकसंख्या ४०००. होती; आणि क्षेत्रफळ चाळीस चौरस मैल. आणि त्याच सालीं टाविस्टाक युनियनांत लोकसंख्या ३२०००. आणि क्षेत्रफळ अडीचशें चौरस मैल.

हल्लींची आमची दीनजनांबद्दलची व्यवस्था १६०१ सालापासून सुरु झालेली आहे, आणि हल्लींची या संबंधाच्या कारभाराची रहाटी १८३४ सालीं सुरु झाली. त्या सालीं तो कारभार वेस्ट्री मंडळीच्या हातून काढून गार्डियनांचे स्वाधीन करण्यांत आला. या संबंधी सर्व माहिती ह्या मालिकेंतील दुसऱ्या एका ग्रंथांत दिली आहे म्हणून येथें फक्त त्या बद्दलच्या स्थानिक व्यवस्थेचेंच थोडेंसें वर्णन देऊं.

पुष्कळ वर्षां मागें म्हणजे सन १६६२ सालीं दीनार्थ कायदा अंमलांत आणण्याच्या संबंधानें विशेष लेखी कायद्या अन्वयें पारिशांचा समूह करण्याचा प्रघात सुरु झाला. आणि सन १७७२ सालीं गिल्बर्टचा कायदा म्हणून एक अनुज्ञापक कायदा मंजूर झाला, त्या अन्वयें घरांतल्या घरांतच दीनजनांला मदत करण्या करितां पारिशांचा समूह करण्यास मोकळीक मिळाली. पण हल्लीं जो व्यवस्थेचा प्रकार आहे तो १८३४ सालच्या कायद्यावरहुकूम झालेला आहे. त्या वर्षाच्या पूर्वीं पारिशांतील कारभाराची शैली आणि लेकवळ्याबद्दलचे कायदे यांच्या योगानें खेड्यापाड्यांतील गरीब लोक आचारभ्रष्ट होऊन गेले होते. आणि यामुळें सुधारलेल्या पार्लमेंट सभेला या दीनजनां करितां केलेल्या कायद्याच्या व्यवस्थेंत अव्वल पासून अखेरपर्यंत फेरफार करून नवीन शिस्त घालून देण्याचें काम पाहि-

त्यानेंच हातीं घ्यावें लागलें. या करितां फार व्यापक अधिकार देऊन एक मोठें व्यवस्थामंडल स्थापिलें. आणि पारिशांचे यूनियन नामक समूह करून ते स्थानिक व्यवस्थे करितां गार्डियनांच्या स्वाधीन करण्याची कामगिरी त्यांचे कडे सोंपविली. कांहीं वर्षां नंतर तें मंडळ कायमचें रहावें असा ठराव झाला. आणि त्याला दीनार्थ कायद्या संबंधी अधिकारिमंडल ह्मणून किताब मिळाला. शेवटीं तें मंडळ १८७१ सालीं स्थानिकराज्यव्यवस्थामंडलांतच सामील करण्यांत आलें. त्या मंडलांनीं यूनियनें कशीं स्थापिलीं याचा खुलासा मि. आर, एस, राइट यांनीं दिला आहे तो येणें प्रमाणें. "यूनियन स्थापन करण्याविषयीं मुख्य सिद्धांत असा असे कीं एखादा बाजार भरण्याचा गांव हा मध्यबिंदू असा कल्पून त्या बाजारांत ज्या ज्या पारिशांचे रहिवाशी येत ते सर्व पारिश मिळूनएक यूनियन असें ठरवावें. यांतलें बीज इतकेंच कीं गार्डियन लोकांनां व पारिशांच्या अमलदारांनां त्या मध्यवर्ती ठिकाणीं हजर असण्यास सोईवार पडावें. या वर एक नियामक सिद्धांतअसा असे कींगार्डियन लोकांनां सर्व कारभाराची बारकाईनें प्रत्यक्ष माहिती मिळण्यास अडचण पडेल इतका आवाढव्य समूह होऊं देत कामा नये. आणि तेव्हांचा एक समज असा होता कीं कामाची जसजशी माहिती अधिक होत जाईल,व भानगडी नाहींशा होऊन कारभार जसजसा सरळ मार्गानें चालत जाईल, त्या त्या मानानें हे समूह वाढवितां येतील. या शिवाय, कांहीं समूहांच्या हद्दी त्या वेळेस असणाऱ्या दीनाश्रमाच्या स्थानाला अनुलक्षून ठरविण्यांत आल्या. आणखी ही नानाप्रकारच्या लोकसमजुतींच्या व इतरगोष्टींच्या अनुरोधानें मुळच्या ठरविलेल्या बेतांत फेरफार करण्यांत आले असतीलच. पूर्वींच्या कायद्या अन्वयें स्थापिलेलीं यूनियनें तशींच राहूं दिलीं होतीं. तीं आलिकडेच हळुहळु नाहिशीं झालीं आहेत." सदरील वर्णना वरून असें स्पष्ट दिसतें कीं या बेतांत म्युनिसिपालिट्यांच्या हद्दी व जुने जमिनीचे हंड्रेड नामक विभाग यांचा मुळींच विचार करणें अशक्य होतें. कांहीं कामां करितां स्थानिक व्यवस्थामंडलाकडून कांहीं यूनियनांचा यूनियनकोटी नामक समूह कर-

ण्यांत येतो. पण असे कौंटी आणि त्याच नांवाचे जे खरोखरीचे कौंटी ह्मणून विभाग आहेत, त्यांच्यामध्यें कांहीं मेळ नाहीं.

स्थानिकव्यवस्थामंडलाच्या हातीं यूनियनें ह्मणजे कुंभाराच्या हातांतल्या मातीसारखीं आहेत. त्यांना वाटेल तें रूप यूनियनास देण्याला ते मुखत्यार आहेत. त्या मंडलाला नवीं यूनियनें बनवितां येतात; जुनीं यूनियनें मोडतां येतात; आणि जुन्यां यूनियनाचे घटक पारिश बदलतां येतात. हा अंमल बजाविण्यांत प्रतिबंधक विचार ह्मणजे केवळ एखाद्या पारिशाच्या सिद्धस्वार्थाविषयीं मंडलाच्या मनांतील काळजी पासून उत्पन्न होईल तितकाच. कारण एका यूनयिनांतून दुसऱ्या यूनियनांत वर्ग झाल्यामुळे खर्चवेंचाचा जो फाळा एखाद्या पारिशावर पडणार त्यांत बराच फेरफार होण्याचा संभव असतो. जरी दीनजन आपल्यामध्यें सर्वत्र आहेत तरी त्यांची संख्या देशभर समसमान रीतीनें वाटलेली नाहीं. १८७९ सालच्या कायद्या अन्वयें गार्डियन लोकांच्या संमतीनें दीनार्थ कायद्या संबंधी कार्याकारितां अनेक यूनियनांचा समूह करण्याचा स्थानिकव्यवस्थामंडलास अधिकार आहे. घरकामाच्या न्ाकराशिवाय दुसरा कोणीही यूनियनाचा चाकर स्थानिकव्यवस्थामंडलाच्या मंजुरी वांचून नेमतां येत नाहीं. आणि नेमलेल्या नोकरास गार्डियनांकडे विचारपूस न करितां रजा देण्याचा अधिकार स्थानिकव्यवस्थामंडळास आहे. यूनियनांचे हिशेब देखील त्या मंडलाकडेच तपासण्याकरितां जातात. या यूनियनांच्या संबंधानें हुजुराकडील नियमन परिपूर्ण आहे ह्मणून सर्व कारभाराचीं सूत्रें लंडन राजधानींतूनच हालवितां येतात. आतां या विषयीं एक विचाराचा मुद्दा उत्पन्न होतो कीं दीनार्थ कायद्यासंबंधी कारभार सगळ्या देशांत सारख्याच रीतीनें चालावा, अथवा स्थानिक व्यवस्थापकांनां त्या कारभारांत आपआपल्या बुद्धी प्रमाणें फेरफार करून त्यावर आपली छापी बसवूं द्यावी—या पैकीं कोणता पक्ष उत्तम. हा मुद्दा फार गहन आहे आणि येथें त्या संबंधी चर्चा करण्याची जरूर नाहीं. इतकी गोष्ट मात्र उघड आहे कीं आपआपल्या नोकरांनां रजा देण्याचा अधिकार स्थानिकव्यवस्थापकांकडे असावा. हल्लींच्या शिरस्त्या प्रमाणें अननुगुण अथवा नालायक नो-

करालासुद्धां वाटेला लावणेंही फार प्रयासाची गोष्ट आहे. एखादा मनुष्य आपल्या कामांत अगदीं नालायक जरी असला तरी हुजुराकडून त्याच्या बरतरफीचा हुकूम मिळविण्याला त्याच्यावर जसा कांटेकोर चार्ज ठेविला पाहिजे, तसा तयार करणें अशक्य पडावें ही अगदीं साहजिक गोष्ट आहे. अशा प्रसंगीं त्याचें आपलें जमत नाहीं इतक्याच कारणामुळें स्थानिक व्यवस्थापकांना आपल्या नोकरास रजा देण्यास मुखत्यारी अवश्य असावी. आणि त्यांबद्दल वरिष्ट अधिकाऱ्यापाशीं विचारपूस करण्याची देखील कांहीं जरूर पडूं नये.

दर एक यूनियनांत कारभार पाहणारे लोक ह्मणजे गार्डियनमंडल हेंच होय. लंडन राजधानी खेरीज करून इतर सर्व ठिकाणीं गार्डियनांचे दोन वर्ग आहेत. ह्मणजे कांहीं हुद्याच्या नात्यानें आणि कांहीं निवडलेले. हा पूर्वी सुचविल्या प्रमाणें साधारण नियम समजावयाचा. ऑक्सफर्ड, बर्मिंघम ( आणि कांहीं इतर स्थलें हीं असतील ) येथें त्याचे अपवाद आढळण्यांत येतात. असो. हुद्याच्या नात्यानें गार्डियन ह्मणजे यूनियनाच्या हद्दींत राहणारे जस्टिस ऑव्ह धी पीस हे होत. असें ह्मणतात कीं जस्टिस लोक बहुत करून सभांत हजर नसतात. तथापि पुष्कळ ठिकाणीं जे हुद्याच्या नात्यानें गार्डियन आहेत त्यांपैकींच कोणी तरी मंडलाचा अध्यक्ष असतो. दरएक मंडलांत निवडक गार्डियन किती असावे याचा निकाल स्थानिकमंडला कडून होतो. इतकीच अट आहे कीं दरएक घटक परिशाच्या तर्फेचा निदान एक प्रतिनिधि असला पाहिजे. ३०० पेक्षां लोक संख्या कमी असली तर एक पारिश शेजारच्या पारिशाशीं स्थानिकव्यवस्थामंडलाच्या हुकुमानें निवडणुकींच्या कार्याकरितां जोडतां येतो. उदाहरणार्थ ९० पर्यंत लोकसंख्येचा पारिश १००० पर्यंत लोकसंख्येच्या पारिशाशीं जोडून त्या संयुक्त प्रदेशाला दोन गार्डियन देतां येतात. वास्तविक पाहिलें तर या रीतीनें धाकटा पारिश थोरल्यांत मिळून गेल्यासारखेंच होते. जे गार्डियन निवडावयाचे ते लायक असण्याला मिळकत किती असली पाहिजे याचा ठराव स्थानिकव्यवस्थामंडलच करितें. त्यांत अट ह्मणून इतकीच कीं स्थानिककराची आकारणी सालीना ४० पौंड पेक्षां जास्त बसवितां येत

नाहीं. गार्डियन बहुधा एक वर्ष पर्यंत हुद्यावर राहतात. पण जर एखाद्या पारिशांतील कर भरणारांनीं ते जास्त मुदत पर्यंत राहावे असा ठराव केला तर स्थानिकव्यवस्थामंडलास मुदत फिरविण्याचा अधिकार आहे. या अधिकारा अन्वयें नाटिंघम आणि लीड्स यूनियनांत त्या मंडलांनीं एक वर्षा ऐवजीं तीन वर्षांची मुदत ठरविली आहे. साधारण वार्षिक निवडणूक एप्रील महिन्यांत होत असते. गार्डियनांचा कारकून मतग्राहकाचें काम करितो. गार्डियनांच्या निवडणुकींत मत देण्याचा हक्क ज्या पारिशांत निवडणूक व्हावयाची, तेथील कर भरणारे व जमिनीचे मालक यांचा आहे. जर एखाद्या पारिशांतील लोकसंख्या २०००० पेक्षां जास्त असली, तर त्याचे वार्ड ह्मणून पोटभाग करितां येतात. आणि दरएक पोट भागास, एक किंवा जास्त गार्डियन निवडण्याचा अधिकार देतां येतो. अनेक संमतींचा शिरस्ता प्रचारांत आहे, आणि मिळकतीच्या मानानें एक पासून सहा पर्यंत संमति एका मनुष्यास देतां येतात. पारिशांत राहणाऱ्या जमिनदाराला जमिनीचा मालक आणि कर भरणारा या दोन्ही नात्यांनीं संमति देतां येतात. याचा परिणाम असा होऊं शकतो कीं पारिशांत राहणाऱ्या जमिनदाराची मिळकत पुरे इतकी असल्यास त्या एकट्याला १२ संमति देतां येतात. ५० पौंडापेक्षां कमी आकारणीच्या मिळकतीवर एक संमति देण्याचा हक्क प्राप्त होतो. आकारणी ५० पौंडावर आणि १०० पेक्षां कमी असल्यास दोन संमति. या उपर २५० पौंडांपर्यंत दरएक ५० पौंडाला एक एक जास्त संमति देण्याचा हक्क मिळतो.

संमति देण्याचा अधिकार मिळण्याकरितां जमिनदारांनीं आपलीं नावें नोंदून घेतलीं पाहिजेत. वहिवाटदारांचीं नांवें करांच्या वह्यांत नेमानें येतातच. पारिशा बाहेर राहणाऱ्या जमिनदाराला आपल्या तर्फेनें संमति देण्याकरितां दुसऱ्याला मुखत्यारी देतां येतें. ज्याला संमति देण्याचा हक्क आहे त्याला आपलेंच अथवा दुसऱ्या कोणत्याही लायकीच्या मनुष्याचें नांव गार्डियनाच्या हुद्यावर नेमणुकेसाठीं सुचवितां येतें. ज्यांच्या नांवाची सूचना झाली असेल त्यांची काम पत्करण्याची मर्जी नसल्यास त्यांनीं

नको ह्मणावें. या बाबतींत इंग्लंड देशांतील इतर स्थानिक हुद्यांत आणि यांत भेद आहे. कारण पूर्वीं सांगितल्या प्रमाणें इतर हुद्दे नाकबूल करितां येत नाहींत. सुचविलेल्या नांवाची संख्या जितके गार्डियन निवडायाचे त्या संख्येपेक्षां जास्त असली, ह्मणजे प्रतिस्पर्धेच्या प्रसंगीं जे नियम लागू असतात ते अमलांत येतात. प्रतिस्पर्धेचा प्रकार येणें प्रमाणें. दरएक संमति देणाऱ्याच्या अथवा त्याच्या मुखत्याराच्या घरीं संमति पत्रकें वाटलीं जातात. तीं पत्रकें एप्रील महिन्याच्या ७ व्या तारखेस लिहून तयार ठेवण्याविषयीं त्यांत सूचना केली असते. दुसऱ्या दिवशीं ह्मणजे ८ वे तारखेस तीं पत्रकें एकत्र करावीं लागतात, आणि ९ वे तारखेस अथवा त्यानंतर होईल तितक्या जलदीनें मत ग्राहक या मतपरिसंख्यानाचा निकाल जाहीर करतो. कांहीं अंशीं हा मतप्रदर्शनाचा प्रकार पेटींत गुटिका टाकण्याचा जो प्रकार आहे त्यापेक्षां जास्त सोईवार आहे. आणि खर्चही या प्रकारांत कमी होतो. शिवाय हें ही खचित आहे कीं निवडणूकीचें काम आपलें घर सोडून इतर ठिकाणीं जाऊन करणाऱ्या लोकां पेक्षां आपल्या घरींच तें काम करणारे लोक जास्त असणारच असणार. या प्रकारांत दोष ह्मणून इतकाच काढला आहे कीं संमति पत्रकांत लबाडीचीं संधानें करण्यास सुलभ पडतें. १८७८ सालीं हौस ऑव्ह कामन्स पुढें त्याच सभेंतल्या एका कमिटीनें रपोर्ट सादर केला होता. त्यांत असें म्हटलें आहे कीं "संमति पत्रकांची जी हल्लीं वहिवाट सुरू आहे तिच्या पासून गैरसोई व असव्यवहार फार होतात. ह्मणजे धमकी देणें, पत्रकें चोरून नेणें, किंवा बनावट पत्रकें तयार करणें, किंवा त्या संबंधी इतर संधानें करणें, हे प्रकार जारीनें चालतात. अनेक वेळां मतदेणारांकडे पत्रकें पोहोचतच नाहींत, आणि कांहीं प्रसंगी केवळ सांकेतिक संबंधाच्या क्षुलक व्यंगा मुळें तीं बेकायदेशीर ठरतात. असव्द्यवहाराचें मुख्य कारण असें दिसून येतें कीं पत्रकें बहुतेक मत देणारे घरांत नसले ह्मणजे त्यांच्या घरीं टाकलीं जातात. आणि मग त्यांच्या सांगण्यावांचून त्यांच्या बायकांकडून तीं नवऱ्यांच्या नांवांनीं लिहून घेतलीं जातात." असो. एखाद्या गार्डियनाच्या निवडणुकीबद्दल वाद उत्पन्न झाल्यास त्याचा

निकाल करण्याचें काम स्थानिकव्यवस्थामंडलाकडे आहे. कांहीं प्रसंगीं हे पत्रव्यवहारानें होतें. पण प्रसंगविशेषीं जरूर पडल्यास स्थानिक चौकशी करण्याविषयीं हुकूम होतो. कांहीं लोकांचें असें ह्मणणें आहे कीं शहरांत वाद बहुत करून राजकारणांसंबंधीं असतात; आणि खेड्या पाड्यांत व्यक्तिविशेष संबंधी असतात.

गार्डियनाचें मुख्य काम म्हणजे दीनजनांची तर्तुद होय. यूनियनाचे शिधासामग्री पुरविणारे अंमलदार, व वैद्य, आणि दीनाश्रमाचे अध्यक्ष, उपाध्याय, आणि शिक्षक, या सर्वांची नेमणूक ते करितात. मात्र त्यांना स्थानिकव्यवस्थामंडलाची मंजुरी घ्यावी लागते. शिधासामग्री पुरविण्याच्या कामावर नियमन त्यांचेंच असतें. आणि दीनाश्रमांवर व दीनजनाकरितां स्थापिलेल्या शाळांवर देखरेख ही त्यांची असते. दोन मोठ्या कामांत त्यांना फार विचार करून निकाल करावा लागतो. एक हें कीं, दर एक व्यक्तीस शिधासामग्री घरीं पुरवावी किंवा दीनाश्रमीं राहावयास लावावें ह्या संबंधी ठराव त्यांना करावा लागतो. या बाबतींत निरनिराळ्या यूनियनांत व्यवस्था फार निरनिराळ्या प्रकारांनीं होत असते. कांहीं यूनियनांत १८३१ सालचा कायदा मोठ्या कडक रीतींनें अमलांत आणितात. कांहीं ठिकाणीं स्थानिकव्यवस्थामंडलाचें रडगाणें आहेच कीं "कोणत्या तरी रूपानें रोजमुऱ्याची भर करण्याची जी जुनी वाईट चाल ती बरीच प्रचारांत असली पाहिजे". दुसरें काम हें कीं जेथें शिधासामग्री घरच्या घरीं पुरवायाची असें ठरलें ती तेथें त्याच रूपानें द्यावी किंवा पैशाच्या रूपानें द्यावी, याचा निकाल गार्डियनांला करावा लागतो. पहिल्या रीतीमध्यें फायदे पुष्कळ आहेत. स्थानिकव्यवस्थामंडलानें असें लिहिलें आहे कीं, "दीनलोकांस पोषणाला पैसा दिला, तर ज्यांच्या पोषणार्थ तो देतात त्यांनां, ह्मणजे बायका वगैरे घरांतील माणसें ह्यांना, त्या पैकीं फारच थोडा अंश पोंहोचतो; आणि खेड्यापाड्यांत बहुतेक अंश बीर दारूच्या पिठ्यांवर, आणि शहरांत जिन दारूच्या पिठ्यांवर जातो, असें वारंवार आमच्या कानीं आलें आहे. शिधासामग्रीच जर दिली तर या प्रकारचा अपव्यय फार थोड्या प्रसंगीं होण्याचा संभव असतो असें

आह्माला आढळलें आहे. जर एखाद्या दीन मनुष्यास दर आठवड्यास पैसा न देतां तितक्याच किमतीचें अन्न अथवा इतर उपयोगाच्या जिनसा दिल्या, तर त्या जिनसांचा अपव्यय केल्यानें त्याला नेहमींच्या व्यसनाचा पदार्थ पूर्वी पेक्षां कमी मिळतो. १८८१ सालीं घरीं पोषणासाठीं पैसा दिला तो २२,९७,००० पौंड, आणि अन्नादि सामग्री दिली तिची किंमत अवघे ३,२५००० पौंड; ह्मणजे जेथें ७ पौंड वाईट रीतीनें अथवा द्रव्यरूपानें वाटले गेले तेथें फक्त १ पौंड सामग्री रूपाने दिला." त्यासालीं दीनपोषणार्थ खर्च एकंदर ८१,०२,१०६ पौंड झाला.

या दीन पोषणाचे संबंधानें अलिकडे गार्डियनांच्या हातीं एक मोठी कामगिरी सोंपविली आहे. ती ही कीं ज्या मुलांच्या आईबापांनां मदती शिवाय मुलांची शाळेतली फी भरवत नाहीं,त्यांची फी गार्डियनांला भरावी लागते. या रीतीनें ३३००० पौंड १८८१ सालीं खर्च झाले आहेत.

पारिशांतील आकारणीच्या यादी प्रेक्षक तयार करितात, पण त्यांचा तपास गार्डियनांची एक कमिटी असते तिला करावा लागतो. त्या कमिटीचें नांव आकरणीची कमिटी. तिला सर्व हरकती ऐकून निकाल करावा लागतो. गार्डियनांवर अपील क्वार्टर सेशनाकडे चालतें. जरी गार्डियनांचें मुख्य कर्तव्य दीनार्थ कायद्याच्या संबंधाचें आहे, तरी आलिकडे त्यां कर्तव्याशीं संबंध नसणारीं अशीं बरींच कामें त्याच्याकडे देण्यांत आलीं आहेत. खेड्यापाड्यांत शालाधिकारिमंडल नसतें तेथें मुलें शाळेत हजर ठेवण्याच्या कामावर गार्डियनांची कमिटी असते. त्याच प्रमाणें आतां खेड्यांपाड्यांत सार्वजनिक आरोग्या संबंधी अधिकार गार्डियनांकडेच आहे. आणि एखाद्या यूनियनाची व राजमार्गसंबंधी देशविभागाची हद्द जर एकच असली, तर राजमार्गांवर देखील त्यांनांच अंमलदार होतां येते, आणि राजमार्गाधिकारिमंडलाचे सर्व अधिकार त्यांस मिळतात. जन्ममृत्यु नोंदणारे नेमणें, व त्यांचे पगार देणें, व त्यांना सोईच्या कचेऱ्या मिळवून देणें, तसेंच देवी काढण्याबद्दल व भटारखान्यांच्या नियमनांबद्दलचे कायदे अमलांत आणणें, हीं कामें त्यांच्याच हातीं आहेत. जेथें जेथें लोकसंख्या बरीच आहे, तेथें

तेथें त्यांच्यावर काम फार पडत असेल असें सहज लक्षांत येईल. आलि-कडील एका हौस ऑव्ह् लॉर्ड्सच्या कमिटीनें लिहिलें आहे कीं, "त्यांना अनेक प्रसंगीं काम आटपण्यासाठीं सहा सहा सात सात तास हजर रहावें लागतें, आणि ज्यांच्या मागें पोटा करितां खासगी कामाचा उपव्द्याप असतो त्यांना हा मोठाच दंड आहे." खेड्यापाड्यांतील देशविभागांची गुरफटणूक जर काढून टाकणें आहे, तर गार्डियनांवर अस-णाऱ्या हल्लींच्या उदंड बोजावर आणखी कामाचा बोजा लादण्यानें तें कार्य होणार नाहीं. जर कांहीं कांहीं लहान पारिश मिळून एक एका नवा पारिश बनविण्याची तजवीज केली, तर पुरातनकाळची टौनशिपाची अथवा पारिशाची व्यवस्था पुनरुज्जीवित करून वेस्ट्रीमंडळीकडे जीं मागें कामें होतीं त्यांपैकीं कांहीं तिच्याकडे पुनः देतां येतील. इतकेंही करून गार्डियनांच्या अंगावरचा बोजा फाजील आहेसें वाटल्यास त्यांची कांहीं कामें कौंटीकडे वाटून द्यावी. पण खेड्यापाड्यांतील विभागांमध्यें अ-धिकार फक्त कौंटी, यूनियन, आणि पारिश या तिघांकडे असावा; आणि खेड्यापाड्यांतील सर्व स्थानिक व्यवस्था या तीन अधिकाऱ्यांमध्यें वाटलेली असावी;—ही रचना कोणालाही ठीक दिसणार आहे.

## भाग. ५

इंग्लंड देशांत नगरव्यवस्था ह्मणून कांहीं ठरीव पद्धत अशी नाहीं. कांहीं थोड्या नगरांना मात्र म्युनीसिपाल कमिटी संबंधीं कायद्या अन्वयें संभूयकारित्वाचे हक्क दिले आहेत, आणि कायद्याच्या दृष्टीनें नगरव्यक्तीचें स्वरूप प्राप्त झालें आहे. स्थानिक व्यवस्थेच्या संबंधानें फक्त यांचाच विचार करण्याची जरूर आहे. दुसऱ्या कांहीं नगरांत सुधारणा-धिकारी नेमले आहेत, त्यांच्याकडे विशेष कायद्याअन्वयें दिवेबत्ती फरसबंदी, नळ, गटर, वगैरे निर्दिष्ट केलेलीं सार्वजनिक उपयोगाचीं विशेष कामें करण्याचें सोंपलें आहे. तसेंच कांहीं पुरातन नगरांनां संभूयकारित्वाच्या सनदा मिळालेल्या आहेत. त्या नगरांतील स्वतंत्र रहिवाशांचे हक्क ज्या लोकांनां आहेत, त्या लोकांच्या तर्फेनें मिळकत मिळवून तिची वहिवाट करण्याचा अधिकार त्या नगरांनां दिला आहे. या

बहुतेक नगरांत मेयर, आल्डरमेन, टौन कौन्सलदार, आणि नगरव्यवस्थेचा बाकी सर्व उपकरणाचा पसारा आहेच. पण स्थानिकव्यवस्थेच्या संबंधानें या सर्व अंमलदारांच्या कर्तव्यांचा शोध केला असतां देखील त्यांचा पत्ता लागत नाहीं, किंवा तीं केवळ नांवाला आहेत असें दिसून येतें. तरी त्यांच्याबद्दल गोष्ट ध्यानांत ठेवण्याजोगी एक आहे ती ही कीं जरी कारभाराच्या व्यवस्थेचें काम त्यांचेंकडे नाहीं, तरी त्यांच्या हातीं फौजदारी न्यायाधीशाचें काम असतें तें मात्र फार महत्वाचें आहे हें उघड आहे. असो.

इंग्लंड देशांतील बहुतेक नगरांनां कायद्याच्या दृष्टीनें अस्तित्वच नाहीं, ह्मणजे त्यांना संभूयकरित्वाचा अधिकार नाहीं. तीं सर्वथा अनिर्दिष्ट, अथवा मनमानेल त्या रीतीनें निर्दिष्ट, अशा भूमिभागांचीं फक्त नांवें आहेत, आणि त्यांत नगरांत चालणाऱ्या पेशांचीं माणसें राहतात, इतकेंच काय तें. उदाहरणार्थ, सरे जिल्ह्यांत क्राइडन नामक शहर आहे, तेथें न्याय कचेरी भरत असते ही जगजाहिर गोष्ट आहे. आतां क्राइडनचा रहिवासी ह्मणजे काय? असा जर प्रश्न निघाला, तर पहिल्यानें क्राइडन ह्मणजे त्या नांवाचा पारिश, अथवा त्या नांवाचा स्थानिकमंडलाचा इलाखा, अथवा शालामंडलाचा इलाखा, अथवा हीं सर्व मिळून, त्या नांवाखालीं येऊं शकतात, किंवा या सर्वांपासून भिन्नच कांहीं एक असेंही होऊं शकतें! १८७१ सालीं २००० पेक्षां जास्त लोकसंख्येचीं अशीं ९३८ शहरें इंग्लंडांत होतीं, त्यांपैकीं १८३९ सालच्या कायद्या अन्वयें फक्त २२९ शहरांत म्युनिसिपालिट्या स्थापिल्या होत्या आणि या शिवाय फक्त ५१ शहरांत सुधारणाधिकारी होते. हल्लीं म्युनिसिपालिट्यांचीं शहरें २४२ आहेत. पण २००० पेक्षां जास्त रहिवाशांच्या शहरांची संख्या बहुतकरून ह्या ही पेक्षां जास्त मानानें वाढली असावी. म्युनिसिपालिटी असणें व तत्संबंधीं हक्क प्राप्त होणें हें लोकसंख्येवर अवलंबून नाहीं. १९ शहरें आहेत त्यांत म्युनिसिपालिट्या असून लोकसंख्या ३००० पेक्षां कमीच आहे. आणि पुष्कळ शहरांत लोकसंख्या २९,००० पेक्षां जास्त असून ही म्युनिसिपालिटी नाहीं. म्युनिसिपाल कमिट्यांसंबंधीं कायद्याप्रमाणें सनदांनीं नव्या म्युनिसिपालिट्या स्थापिल्या जातात. त्याचा प्रकार असाः एखाद्या शहरांतील रहिवासी गृहस्थांना आपल्या शहरांत म्युनिसिपालि-

टी असण्या पुरती योग्यता आहे, आणि ती चालवून पाहावी, असें वाटलें तर त्यांनीं राणी सरकारास संभूयकरित्वाचे हक्क मिळण्याविषयीं आणि म्युनिसिपालिटी संबंधी कायदा आपल्या शहरास लागू करण्याविषयीं अर्ज करावा. किती रहिवासी अर्ज करणारे असले पाहिजेत याबद्दल कोठेंही निर्देश केलेला नाहीं. अर्ज गुदरला ह्मणजे त्याविषयीं लंडन ग्याझेटांत जाहिरात येते, व तो चौकशी करितां राणीसाहेबांच्या प्रिवि कौन्सल नामक मोठ्या मंत्रिमंडलाच्या कमिटीकडे रवाना होतो. त्या कमिटीच्या हुकुमावरून स्थानिक चौकशी होते व त्या प्रसंगीं अनुकूल प्रतिकूल जबान्या सर्व घेण्यांत येतात. याप्रकारचे सनदा करितां अर्ज थोडेच केले जातात, आणि फारच थोडे मंजूर होतात. सन १८३५ सालचा म्युनिसिपालिटीसंबंधी कायदा जेव्हां पास झाला त्यावेळीं तो १७८ शहरांना लागू होता. त्या नंतर नगरवस्ती दुपटीच्या मानानें वाढली आहे. पण म्युनिसिपालिटीचीं शहरें काय तीं ६३ जास्त झालीं आहेत. प्रिविकौन्सलाच्या ज्या कमिटीकडे अर्ज अभिप्रायाकरितां रवाना करण्यांत येतो तिला दुसरा अधिकार असा आहे कीं इतर स्थानिक अधिकाऱ्यांचा म्युनिसिपाल कमिटींतच समावेश व्हावा किंवा त्यांचा आणि म्युनिसिपालिटीचा संबंध दुसऱ्या कोणत्यारितीनें कायम करावा या विषयींची सर्व योजना त्यांनीं ठरवून द्यावी लागते. एखाद्या स्थानिक अधिकाऱ्यास त्या योजनेपासून अपकार होत असल्यास त्याला हरकत घेतां येतें. जर हरकत निघाली तर ती योजना अमलांत येण्यास पार्लमेंटानीं केलेल्या कायद्याची मंजुरी अवश्य लागते. हरकत न झाली तर कौन्सलचा हुकूम बस आहे. नवीन म्युनिसिपालिटीची स्थापना झाली ह्मणजे तेथील छोटे जे स्थानिक अधिकारी असतात त्यांचा तींत समावेश होऊन जातो. सनदांकरितां हल्लींपेक्षां जास्त अर्ज होत नाहींत त्याचें एक मुख्य कारण हेंच. जे हल्लीं अधिकारी आहेत त्यांना अधिकारहानि खपत नाहीं. आपलें व्यक्तिस्वरूप नाहींसें होऊन श्रेष्ठवस्तुस्वरूपीं लीन होऊन निर्वाण पावणें हें बौद्धधर्माच्या लोकांस पसंत पडो. पण तें स्थानिक लुडबुड्यांना रुचत नाहीं. ह्या चिमुकल्या ग्रहांना खग्रासग्रहणाची मुळींच

आवड नाहीं. असो. सनद दिली ह्मणजे नगरांत कौन्सलदार किती असावे आणि पोटविभाग करणें असले तर ते किती असावे व त्यांच्या हद्दी कसकशा असाव्या याविषयीं त्या सनदेंतच कलमें असतात. प्रारंभीं जे अंमलदार असावयाचे त्यांची नेमणूकही त्या सनदेंत असते. आणि म्युनिसिपालिटीचें यंत्र चालू होण्याकरितां म्युनिसिपालिटयांच्या कायद्यांत योग्य मुदतीपर्यंत कांहीं फेरफार आवश्यक असतील तेही सनदेंत दर्शविले असतात. इतकी गोष्ट खेरीज करून नगराला सनद मिळून अमलांत आली, ह्मणजे हा म्युनिसिपालिटी संबंधीं कायदा नगराला लागू झालाच, आणि सर्व अधिकाररचना त्या कायद्यांत ठरविल्याप्रमाणें तयार असते. यामुळें हल्लीं म्युनिसिपालिटयांची व्यवस्था सर्वत्र एकाच मासल्याची आहे, आणि त्यांचा कारभार चालविण्याकरितां जी यंत्ररचना आहे ती सर्वत्र सारखीच आहे, असें म्हटलें असतां चालेल. लिवरपूल शहराची लोकसंख्या ९,००,००० आहे. आणि चिप-न्हाम हें एक क्षुल्लक १३०० लोकांचें गांव आहे. पण त्या दोन्हींचा कारभार एक सारख्याच रीतीनें चालतो. आतां ही कारभार चाल-विण्याची रीति कशी आहे, या विषयींचें निरूपण करण्या पूर्वीं अंमळ प्राचीन कालाकडे लक्ष वळवून इंग्लंड देशांत म्युनिसिपालिट्यांची स्थिति कशी काय चालत आली आहे त्याचा इतिहास ध्यानांत आणल्यास ठीक पडेल.

प्रोफेसर स्टब्स साहेब ह्मणतात कीं, आंग्लोसाक्सन लोकांच्या कालांत बर्ह ह्मणून जें होतें तें आणि टौनाशिप हीं स्वरूपतः एकच. मात्र त्यांत व्यवस्थितपणा जास्त असे. त्याच्या सभोंवतीं कुंपणाच्या ऐवजीं एक खंद-क आणि एक बांध असे. टून ह्मणून जसें जमीन लागवड करणा-ऱ्यानें सुरक्षित केलेलें घर, त्याचप्रमाणें बर्ह ह्मणजे बडया जमिनदाराचा तटबंदी वाडा आणि सोपा. त्यांच्या घरा सभोंवती त्याच्या आ-धारानें लहान सान लोक पुष्कळ जमावे हें साहजिकच होतें. आणि याच रिवाजा पासून ज्याला हल्लीं आपण शहर ह्मणतों तें पुढें उत्पन्न झालें. नार्मन विजयाच्या सुमारास इंग्लंडातील पुष्कळ शहरांत व्यवस्था जुन्या टौनाशिपांसारखी न राहतां हंड्रेडा सारखी झा-



ली होती. आणि या मुळें हंडूडांतलीं जीं कोर्टें असत त्यांचा यांत अंमल चालत नसे. कांहीं शहरांना आपलीं कोर्टें स्थापण्याचा, व कर जो भरावयाचा त्या बद्दल उक्ती रकम देऊन सुटण्याचा, हक्क प्राप्त झाला होता. पण अलिकडे संभूय-कारी मंडळी ह्मणून जी उत्पन्न झाली आहे तिचे जे धर्म, ह्मणजे कायद्याच्या दृष्टीनें एकव्यक्तिस्वरूप, निरंतर स्वत्वानुवृत्ति, आणि एक साधारण शिक्का राखणें, यांचा त्या पूर्वींच्या व्यवस्थेत मूळीं गंध देखील नव्हता. लंडन शहरांत पोर्ट्रीव आणि महोपाध्याय हे दोन अमलदार असत; त्यांपासून त्या शहराला एक विशेष प्रकारचें एक-व्यक्तिस्वरूप आणि ऐकात्म्य दिसत होतें खरें. तथापि खरोखर पाहिलें तर लंडन शहर देखील भिन्नभिन्न व्यवस्थेचे समाज, टौनशिप, आणि पारिश, यांचें एक जागीं गाठोडें बांधून ठेवल्यासारखें होतें. त्यांत एकजीव झाल्या सारखें कांहीं दिसत नसे. असो. कांहीं काल गेल्यावर या शह-रांनां जमीनदाराकडून अथवा खुद्द राजाकडून सनदा वगैरे मिळून अधिकाधिक हक्क प्राप्त होऊं लागले. यांत मोठ्या ठळक हक्काचें नांव फर्मार्बर्ग, ह्मणजे करांबद्दल सरकाराशीं ठराव करून उक्ती रकम द्यावी, आणि आपआपसांमध्यें वांटणी आपण करावी असें करण्याचा हक्क. ज्याप्रमाणें व्यापार आणि द्रव्य यांच्यायोगानें शहरांनां देशांत मोठेप-णा मिळूं लागला, त्याचप्रमाणें शहरांतल्या शहरांत व्यापारी बळावत चालले. सर्व व्यापारधंद्यांचें नियमन त्यांच्या हातीं आलें, आणि त्यां-च्या हक्कांनां अनेक सनदांनीं दृढीकरण मिळालें. यावरून असें को-णी समजूं नये कीं शहराची उत्तरोत्तर वृद्धि एकसारख्या बेताबातानें होत होती. सर्व शहरांत कांहीं प्रकारचें साम्य आढळतें खरें, तथापि दरएकाच्या व्यवस्था व वहिवाटी विशेष प्रकारच्या होत्याच. तिस-ऱ्या आणि सातव्या हेनरी राजांच्या कारकीर्दीच्या दरम्यान या म्युनि-सिपालिटयांच्या ज्या व्यवस्था होत्या त्यांबद्दल मुख्य मुख्य मुद्यांचा इतिहास संक्षेपानें प्रोफेसर स्टब्स साहेबांच्या ग्रंथांत दिला आहे तो येणें प्रमाणें.

सन १२१६ सालीं इंग्लंडांतलीं जीं शहरें फार सुधारलेलीं होतीं

त्यांनां आपआपल्या सनदांअन्वयें विशेष हक्क मिळालें होते. त्यांमध्यें शहरा शहरांत भेद होताच; पण निवडलेल्या अंमलदारानीं कोर्टांमध्यें अध्यक्षस्थानीं बसावें, आणि त्यां कोर्टांपासून होणारें उत्पन्न आप आपलें आपणच ठेवावें; आपल्या हद्दींत न्यायसंबंधी कामांत शेरीफाचा रिघाव होऊं न द्यावा; हुजुरास भरण्याच्या ज्या रकमा त्या बद्दल उक्ता ठराव करून आपआपसांत त्या उक्त्या रकमेचा वसूल करावा; आपआपले बेलिफ आपणच निवडावे व कांहीं ठिकाणीं आप आपले मेयरही आपणच निवडावे; आणि आपल्या व्यापारी पूगांची सनदा मिळवून व धंद्याच्या पूगांची सनदा मिळवून अथवा नजराणे देऊन सरकाराकडून मान्यता करवून घ्यावी; इतके हक्क सामान्यतः त्यांनां प्राप्त झाले होते. वर दर्शविलेल्या कालाच्या अखेरीस शहराची अधिकाररचना बहुतकरून अशी झाली, कीं दर एकांत मेयर, आल्डरमन आणि कौन्सल असें एकजुटीनें असावयाचें, आणि त्यांची संख्या व व्यवस्था सर्व बारकाईनें ठरविलेली असावयाची. ही रचना सर्वत्र सारखीच असे असें नाहीं, तरी साधारण स्वरूप हेंच. शिवाय त्यांनां कायद्यांत संभूयकारी मंडळी जिला ह्मणतात तिचे धर्म प्राप्त झाल्यामुळें नवीन रूप तर आलेंच होतें आणि निरनिराळ्या स्थलीं त्यांनां निरनिराळे विशेष हक्कही मिळाले होते. त्यांच्यामध्यें व्यवहारांत बरेंच न्यूनाधिक्य होई. असो; ऐतिहासिक प्रमाणावरून लंडनचा पहिला मेयर हेनरी फिटझआल्विन हा होता. तो मरण पावल्यावर १२१९ सालीं जानराजानें लंनडच्या रहिवाशांनां दर वर्षास आपला मेयर निवडण्याचा हक्क दिला. मेयराच्या मदतीस पंचवीस रहिवासी असत. ते काम नीट करण्या बद्दल शपथ वाहत असत. त्यांना पहिल्यानें जुराट ह्मणत. नंतर त्यांना आल्डरमन हें नांव मिळालें. पण मूळचें आल्डरमन हें नांव दरएक धंद्याच्या पूगां मधील अध्यक्षाला असे. सर्व शहरांपेक्षां लंडनशहरांतच सामर्थ्य जास्त होतें. आणि तेथील लोकांसच सर्वांपेक्षां जास्त हक्क मिळाले होते. ह्मणून दुसऱ्या शहरांनीं त्यांचाच नमुना घेऊन त्यांच्या सारखे हक्क व तशाच व्यवस्था आपल्याकडे असण्याबद्दल प्रयत्न केले ही साहजिकच गोष्ट आहे. लेस्टर शहराच्या अधिकाररचनेची जी हकीकत तीच इत-

र बहुतांची असें ह्मणण्यास कांहीं बाध नाहीं. त्या विषयीं स्टब्स साहेबांनीं लिहिलें आहे कीं "शहरांतलें मुख्य कोर्ट पोर्टमन्मोट ह्मणून होतें. तेथें १२४६ साल पर्यंत जमिनदाराचा बेलिफ अध्यक्ष असे. त्या शिवाय व्यापारीपूग असे त्यांत आल्डर्मन अध्यक्ष असत. १२४६ सालापासून आल्डरमनच्या जागीं मेयर आला, त्यानें बेलिफालाही वाटेस लाविलें. पण पोर्टमन्मोट आणि व्यापारीपूग हीं नावें राहिलींच होतीं. आणि त्यांचे अधिकारही राहिले होते. व्यापारी पूगांच्या खालीं धंद्याचे पूग असत. दरएक शिंपी स्वतंत्र धंद्यास लागला ह्मणजे शिंपीपूगाला व्यापारीपूगास दहा शिलिंग द्यावे लागत. आणि बाकीचे पूगही बहुतकरून तसेंच करीत असावे. १४६४ सालीं चोवीस नगरवासी आणि एक साधारण कौन्सल यांस चवथ्या एडवर्डा कडून मानमान्यता मिळाली. आणि १४६७ सालीं त्यांना मेयर निवडण्याची मुखत्यारी प्राप्त झाली. १४८४सालीं त्या चोवीस जणांनीं आल्डरमन असा किताब धारण केला. आणि शहरचे पंधरा पोटविभाग केले. मग १४८९सालीं मेयर, चोवीस आल्डर्मन, आणि अठ्ठेचाळीस कौन्सलदार यांची एक संभूयकारी अनन्यप्रवेश्य मंडळी जमली. त्यांनीं इतर स्वतंत्र रहिवाशांस म्युनिसिपालिटीच्या निवडणुकींतून वगळण्याबद्दल शपथ घेतली, आणि १५०४ सालीं आपली नवीन अधिकाररचना नव्या सनदेंत मंजूर व कायम करून घेतली". दुसऱ्या पुष्कळ शहरांत कारभाराची शैली हीच पण प्रातिनिधिसत्ता जास्त होती. कौन्सलदार नगरवासी लोकांपैकींच असत आणि ते सर्वांनीं निवडले जात असत. सर्वांस हा हक्क बक्षीस मिळाल्यानें, खरेदी केल्यानें, किंवा शहरांत नोकरी असल्यानें किंवा लग्न अथवा जन्म झाल्यानें, मिळत असे. पण नेहमीं या हक्कवाल्या मंडळी शिवाय इतर रहिवासी मंडळी बरीच असे. त्यांच्यावर नाना प्रकारचे त्रासदायक कर व प्रतिबंध असत. १८३५ सालाच्या कमिशनानें बारीक रीतीनें तपास केला त्या वेळेस या शहरांची जी व्यवस्था व जें स्वरूप दिसून आलें ती व्यवस्था व तें स्वरूप सनदी शहरांना बहुतेक पंधराव्या शतकांत प्राप्त झालें होतें. दुसऱ्या रिचर्डाच्या कारकीर्दींत म्युनिसिपालिटीच्या सनदांमध्यें कमिटीच्या

अंमलदारांना जस्टिस ऑव्ह् धी पीस नेमण्याचा प्रघात सुरू झाला. शिवाय दरएक सनदी शहराला पार्लमेंटांत आपल्या तर्फेचे एक किंवा अधिक नगरवासी गृहस्थ प्रतिनिधि दाखल पाठविण्याचा अधिकार असे. हा अधिकार स्पष्टरीतीनें कबूल केला तो चवथ्या एडवर्डानें वेन्लाक शहरास सनद दिली तेव्हां. पण हा हक्क सनदेंत जो नमूद केला तो बहुतेक प्रसंगीं पूर्वी असणाऱ्या हक्कांच्या दृढीकरणार्थच केवळ असावा. पंधराव्या शतकाचे पूर्वी उमराव वगैरे बडे लोकांच्या वर्चस्वाचें प्रतिविधान करण्याकरितां शहरांचें माहात्म्य वाढवावें हा सरकारचा कृतसंकल्प असे. आणि सातव्या हेन्रीच्या कारकीर्दीपर्यंत शहरांतील लोकांच्या स्वातंत्र्यास जे अपकार झाले होते ते केवळ स्थानिक व यादृच्छिक होते. पण ट्यूडरवंशीय राजांच्या कारकीर्दींत मेयर किंवा दुसरा मुख्य अंमलदार आणि कौन्सल यांच्याच हातीं सर्व व्यवस्था असावी अशा मजकुराच्या सनदा हुजुराकडून मिळूं लागल्या. यापैकीं बहुत सनदांत त्याच व्यवस्थापकांनां पार्लमेंटाचे सभासद निवडण्याचाही अनन्योपभोग्य हक्क देण्यांत आला होता. त्या काळीं सरकारला बडे लोकांची धास्ती मुळींच राहिली नव्हती. आणि पुष्कळ ठिकाणीं है स्टुवर्ड ह्मणून एक नवा हुद्दा उत्पन्न करून त्यावर एखाद्या बलाढ्य उमरावाची अथवा जमिनदाराची नेमणूक करीत असत. मग तो शहराचा मोठा मुरब्बी बनत असे; आणि आपल्याला वाटे त्यास पार्लमेंटचा सभासद करीत असे असें ह्मणण्यास चिंता नाहीं. परंतु जेव्हां इंग्लंडांत प्रजासत्ताक राज्य झालें त्या वेळेस बडे लोकांचें बल अगदीं लयास गेलें. आणि पुनःप्रतिष्ठापनानंतर आपण प्रजासमाजाचे प्रतिनिधि या नात्यानें शहरवासी लोक सरकारी व दरबारी मंडळीस प्रतिकूल होऊं लागले. मध्यम प्रतीचे लोक तर बहुतेक व्हिगपक्षाचे आणि सुधारलेल्या धर्माचे होते. ह्मणून शहरांचें बल मोडण्याकरितां कोर्टाच्या हातीं शस्त्र द्यावें असें ठरलें. अटर्नी जनरल ह्मणून जो कायदे कामासंबंधी सरकारचा मोठा अंमलदार आहे त्यानें लंडन शहरावर पहिल्यानें अधिकाराधार दाखविण्याबद्दल फिर्याद केली. आणि किंग्सबेंच नामक कोर्टानें असा ठराव केला कीं बाजारासंबंधीं कांहीं दस्तुरी घेण्यांत आली होती ती बेकायदेशीर व अंमलाबाहेर असल्यामुळें सनद रद्द झाली. हा निकाल

झाल्यावर सरकारानें सनद रद्द करण्याबद्दलचा आग्रह न धरितां कांहीं आपण बसविलेले नियम कबूल करवून घेऊन राजधानीचे सर्व हक्क पूर्वी प्रमाणेंच कायम ठेविले. जे नियम केले ते असे होते कीं तेणेंकरून शहर अगदीं सरकारच्या तंत्रानें वागणारें होऊन गेलें. उदाहरण, मेयर, शेरीफ किंवा रिकार्डर यां हुद्यांवर राजाच्या पसंतीशिवाय कोणालाही नेमूं नये असा एक नियम होता. या रीतीनें राजधानीचा पाडाव झाल्यावर दुसऱ्या कांहीं शहरांवरही तशाच अधिकारसधार दाखविण्याबद्दल फिर्यादी झाल्या. आणि दुसऱ्या पुष्कळांनीं आपल्यावरही प्रसंग येणार ह्मणून त्या पूर्वीच आपल्या सनदा आणून स्वेच्छेनें प्रत्यर्पण केल्या. १६८४ सालीं जेफ्रीझ नांवाचा न्यायाधीश उत्तर कडील भागांत मोकदमे तपासण्यास गेला होता त्याचें असें बढाईचें बोलणें होतें कीं "मी सर्व सनदा आपल्यापुढें जेरीकोच्या तटाप्रमाणें पाडून टाकल्या आणि परत येतांना प्रत्यर्पण खतांच्या मोठ्या राशीच्या रूपानें शहरांची लूट घेऊन आलों." जुन्या सनदांच्या ऐवजीं ज्या शहरांनां नवीन सनदा दिल्या त्यांत व्यवस्था अंमळ अल्पजनसत्ताक असून, शहरच्या संभूयकारी मंडळींत व्यवस्थापक जे व्हावयाचे त्यांची नेमणूक पहिल्यानें हुजुराकडून व्हावी अशी अट ठेविली होती. पण १६८८ सालानंतर बहुतेक संभूयकारी मंडळ्यांनीं आपल्या जुन्या सनदा अमलांत आणण्याचा क्रम सुरू केला. त्यावेळेस हुजुराकडील दाब राहिला नव्हता. त्या सालापासून तहत १८३२ सालापर्यंत शहरांच्या इतिहासाचा संबंध स्थानिक प्रकरणाशीं फारच थोडा आणि पार्लमेंटाशींच पुष्कळ, अशी स्थिति झाली. जार्ज राजांच्या कारकीर्दीत ज्या सनदा दिल्या गेल्या त्या बहुतेक पूर्वींच्या कालांतील सनदांच्याच नमुन्यावर होत्या. आणि जनस्थितिसुधारणेच्या मानानें म्युनिसिपालिटयांच्या व्यवस्थेंत सुधारणा जी व्हावी तिकडे अत्यंत दुर्लक्ष्य झालें असें दिसतें. स्वतंत्र नगरवासीपणाची मातबरी काय ती त्यापासून पार्लमेंटाचे सभासद निवडण्यांत मत देण्याचा जो हक्क प्राप्त होई त्यामुळें होती. संभूयकारी मंडळींत सामील होण्यास जे प्रयत्न होत ते मुख्यत्वें करून पार्लमेंट सभेचे सभासद निवडण्याच्या हक्कापासून जो पैसा मिळे, त्याकरितां असत. १८३९सालचे कामिशनर ह्मणतात कीं " बहुत संभूयकारी मंडळ्या राखून ठेविल्या आहेत, त्या फक्त राज-

कारणी फलप्राप्तीसाठीं. आणि ज्या शहरांत त्या आहेत त्यांना त्यापासून फायदा न होतां उलटें अनेक प्रसंगीं फार नुकसान होतें. एका पक्षाचें अथवा एका घराण्याचें राजकारणांत मिळविलेले वर्चस्व राखणें हाच कार्य तो एक हेतु. याशिवाय त्या मंडळ्यांनां दिलेले आधिकार अंमलांत आणण्याचा दुसरा हेतु नाहीं. हद्दींत रहाणारे व इतर गृहस्थ रहिवासी दाखल सामील करण्याचे कामांत ह्या हेतूवर पूर्ण लक्ष्य ठेविलेले दृष्टीस पडतें. तसेंच कौन्सलदार व माजिस्ट्रेट नेमण्यांत, कनिष्ट अंमलदार व स्थानिक पोलिस नेमण्यांत, म्युनिसिपालिटयांच्या अधिकाऱ्यांकडे सोंपविलेल्या धर्मादायाच्या कारभारांत, संभूयकारी मंडळीच्या खर्चवेंचांत, आणि त्यांच्या मिळकतींच्या वहिवाटींत, याच हेतूवर कायतें लक्ष्य असतें." बहुतकरून स्वतंत्र रहिवाशांचीं संख्या फार वाढूं देत नसत. पण एखाद्यावेळेस राजकारणामुळें तसेंही करावें लागे. उदाहरणार्थ, माल्डन येथें दरसाल सुमारें सतरा रहिवासी नवीन करण्यांत येत असत. पण १८९६ सालच्या निवडणुकींच्या प्रसंगीं एकदम एक हजार जास्त करण्यांत आले. त्याच निवडणुकींच्या प्रसंगीं लेस्टरच्या मंडळीनें राजकारणी पक्षांमध्यें आपल्या तर्फेचा जो गृहस्थ होता त्याची निवडणुक व्हावी एतदर्थ १०,००० पौंड खर्च केले व शिवाय मिळकत गहाण टाकिली होती. शहरांत राजकारणासंबंधी जे असद्व्यवहार होते ते १८३२ सालच्या कायद्यानें सर्व समूळ मोडून टाकले. अनेक लहानलहान शहरांचे हक्क काढून घेतले, दुसऱ्यांच्या हद्दी दुरुस्त केल्या, आणि सभासद निवडण्याचा हक्क सर्व दहा पौंड आकारणीच्या वहिवाटकरणारांस देण्यांत आला, मग ते स्वतंत्र रहिवासी असोत अथवा नसोत. पण इतक्यानेंच सुधारणेचा दम आटपला नाहीं. शहराची स्थानिक व्यवस्था दुरुस्त करून विशेष लोकसत्तात्मक होईल, आणि स्थानिक कारभारा करितां तींत जास्त कार्यसाधकपणा येईल, अशी तजवीज करण्याविषयीं ठराव झाला. १८३३ सालीं रॉयल कमिशन नेमिलें होतें. त्यांनां आमच्या म्युनिसिपालिट्यांच्या व्यवस्थेचें स्वरूप व त्यांचा कारभार यांचेविषयीं बारकाईनें तपास करण्याचें काम सोंपलें होतें. त्यांच्या रपोटांतून कांहीं वेंचे पूर्वी दाखल केले आहेत. त्या रपोटावरून असें स्पष्ट दिसून आलें कीं योजिलेल्या कार्यास असद्व्यवहा-

राचें एक ब्रह्मांड साफ करावें लागणार. त्यांतील कांहीं माहिती येथें देतों. स्थानिक कामावर बहुतेक सर्वांशीं दुर्लक्ष्य असे. आणि लांच, जुलूम, आणि स्वार्थसाधूपणा हीं सर्वत्र जारीनें चाललीं होतीं. संभूयकारी मंडळ्यांचे हक्क आणि शहराची व्यवस्था यांत बहुतेक शहरवासी लोकांना हात घालतां येत नसे. म्युनिसिपाल कमिट्यांत बहुतकरून सभासदच आपल्याला निवडून आपली नेमणूक करून घेत असत, आणि सभासद हुद्यावर ताहयात रहात असत. प्लिमथ शहरची लोकसंख्या ७६,००० होती. पण यामध्यें स्वतंत्र लोक ४३७, आणि त्यां पैकीं १४९ शहरांत न रहाणारे. इप्सिच शहरांत संभूयकारी मंडळीचे हक्क शेंकडा दोन मनुष्यांला देखील नव्हते. आणि ज्यांनां ते हक्क होते त्यांपैकीं बरेच दीनजन मंडळीपैकीं होते. पोर्टस्मौथ शहरीं लोक संख्या ४९००० असून ही स्वतंत्र मनुष्यें फक्त १०२. पुष्कळ शहरांतल्या स्वतंत्र मनुष्यांना अनन्योपभोग्य असे व्यापार संबंधी हक्क असत, आणि शहरांतील दस्तुरी, बाजारपट्टी यांपासून ते मुक्त असत. न्युकासल शहरांत एका व्यापाऱ्याला ह्या बाबी द्याव्या लागत असत, त्यापासून त्याला ४९० पौंड दरसाल अधिक खर्च पडे. लिवरपूल शहरांत दस्तुरी या पेक्षां जरब असे. ह्या नागरिक संभूयकारी मंडळ्यांचा पैसा राजकारणी असद्व्यवहारास जर न लागला तर क्षुल्लक कामदारांच्या पगाराकरितां, आणि खाना देण्याच्या कामांत उडविला जात असे. संभूयकारी मंडळ्यांच्या खात्यांत चांगल्या पगाराच्या अनेक हुद्यांवर एक एकच मनुष्य हा प्रकार नेहमीचा असे. संभूयकारी मंडळ्याचे मक्ते व त्यांच्या जमिनी मंडळ्यांच्या सभासदांस फार फायदेशीर अशा शर्तींवर दिलेल्या असत. कांहीं शहरांत अपमृत्युप्रेक्षक लहानसा व्यापारी असे. रिकार्डराला दिवाणी फौजदारी अंमल बराच असतांही पुष्कळ शहरांत मुळींच कायद्याचा अभ्यास न केलेला मनुष्य त्या हुद्यावर असे. बहुतेक सर्व शहरांत आल्डर्मन लोक हुद्यांच्या नात्यानें फौजदारी न्यायाधीश असत. ज्युरीचे सभासद फक्त स्वतंत्र मनुष्यांमधून घेतले जात आणि न्यायाचे कामांत राजकारणी पक्षपाताचा दोष नेहमी आढळत असे. हावर्फोर्डवेस्ट येथें असा अभिप्राय देण्यांत आला होता कीं, एखाद्या स्वतंत्र मनुष्यावर गुन्हा शाबीत झाल्याचा निवाडा मिळविणें

सर्वथा अशक्य. राजकारणी पक्षपाताची गोष्ट एकीकडे टेविली तरी शहराचे फौजदारी न्यायाधीश न्यायाच्या कामास सर्वथा नालायक असत. मास्बरी शहरांत कांहीं फौजदारी न्यायाधिशांनां लिहितां वाचतां येत नसे. बेन्लाक शहरीं आरोपिताचें नांव न भरितां वारंटावर सही करण्याची न्यायाधीशांची नेहमीची वहिवाटच असे. ईस्टरेटफर्ड येथें एका न्यायाधीशानें कर्मणुकीकरितां एका प्रसंगी आरोपिताशीं कुस्ती मारली. या प्रकारची पुष्कळ माहिती कमिशनच्या रपोटांत आली आहे. तो अवघा रपोट वाचल्यापासून बोध बराच होणार आहे. आणि त्यांत कमिशनर लोकांनीं केलेल्या सिद्धांताला सबल आधार सांपडतात. तो सिद्धांत असा कीं, " संभूयकारी मंडळ्या जेथें आहेत अशा शहरांपैकीं बहुतेकांतील रहिवाशांच्या मनांत आपल्या शहरांच्या व्यवस्थेबद्दल सर्वसाधारण आणि आमच्या मतें वाजवी अशा प्रकारचें वितुष्ट उत्पन्न झालें आहे. आणि आपणाच निवडून घेतलेलीं अशीं जीं शहरांतील कौन्सलें आहेत, त्यांच्या अधिकारांवर लोकांचें कांहीं नियमन नसल्यामुळें, आणि त्यांच्या गुप्त रीतीनें चालविलेल्या कारभारावर व कृतीवर लोकाभिप्रायाचा दाब नसल्यामुळें त्यांच्यावर बेभरंवसा झाला आहे." कमिशनरांचा रपोट १८३९ सालीं दाखल झाला. आणि त्याच सालीं त्या रपोटावरून कार्यसाधक असा कायदा करण्यांत आला. १८३९ सालच्या म्युनिसिपालकमिटयाच्या कायद्यानें रपोटांत उघडकीस आणिलेले असद्व्यवहार चट सारे झाडून टाकिले आणि त्या वेळेस ज्या कमिटयांचे कारभार उत्तम रीतीनें चालत होते त्यांच्या नमुन्यावर नवीन अधिकाररचनेचा प्रकार स्थापन करून ज्या शहरांस तो कायदा लागू होता त्यांत ती रचना सुरू करून दिली. प्रथमारंभीं कायद्यांत असा उपक्रम केला आहे कीं " इंग्लंड आणि वेल्स या देशांतील नगरें, शहरें व गांव यांत व्यवस्था चांगल्या व सुयंत्र रीतीनें चालावी या हेतूनें त्या त्या स्थलीं अनेक प्रसंगीं संभूयकारी मंडळ्या स्थापन झाल्या आहेत. आणि ज्या सनदां अन्वयें सदर्हू मंडळ्या स्थापन झाल्या त्यांत आतां पुढें दर्शविलेले फेरफार करणें इष्ट आहे." असा उपक्रम करून पुढें ठराव केला आहे कीं, ह्या कायद्यास विरोधी

अशा सर्व वहिवाटी व सनदा रद्द असत. आणि ज्या शहरांस हा कायदा लागू आहे, किंवा पुढें लागू करण्यांत येईल, त्यांत जरूर पडतील तितक्या फेरफारांसह या कायद्यांत कायम केलेली नमुन्याची व्यवस्था अमलांत आणावी. या कायद्यापासून सुधारणा ज्या झाल्या त्यांचे दिक्प्रदर्शन येथें करतों. ह्यामुळें आल्डर्मन लोकांचा फौजदारी अंमल गेला. रिकार्डर कायदे पढलेला मनुष्य असावा असें ठरलें. व्यापारांत सर्व अनन्योपभोग्य हक्क सुटी आणि प्रतिबंध नाहींसे झाले. निवडलेल्या अंमलदारांच्या अंमलाच्या मुदती कमी झाल्या. सभासद निवडण्याचा हक्क सर्व कर भरणाऱ्या रहिवाशांस मिळाला. आणि संभूयकारी मंडळीच्या पैक्याची प्रामाणिकपणानें विल्हेवाट व्हावी, आणि मंडळीचीं कर्तव्यें पूर्णपणें बजाविलीं जावीं, याविषयीं तजवीज झाली. आरंभीं लंडन शहरांतही कायदा अंमलांत आणण्याचा इरादा होता; पण तो इरादा त्या वेळेपुरता रहित केला. आणि आज मितीपर्यंत लंडन शहराची संभूयकारी मंडळी पुरातन व्यवस्थेखालींच आहे. १८३५ सालचा कायदा ह्मणजे शहरांच्या स्वातंत्र्याची मोठी सनदच आहे. तो दुरुस्त करण्याकरितां आजपर्यंत बेचाळीस कायदे झाले आहेत. पण आतां १८८२ सालचा म्युनिसिपल कमिट्यांचा जो कायदा झाला त्यांत सर्वांचा एके ठिकाणीं समावेश झाला आहे, आणि त्या कायद्यापेक्षां भाषाशैलीच्या संबंधानें चांगला असा आमच्या सर्व कायद्यांच्या समुदायांत दुसरा बहुधा नाहींच ह्मटलें तरी चालेल. तेव्हां आतां समग्र म्युनिसिपालिटीचें शास्त्र आह्मांला उपलभ्य आहे. आणि म्युनिसिपालिट्यांच्या स्थितीच्या पुढील निरूपणांत या कायद्याचाच आधार घेतला आहे.

शहरच्या योग्यतेस न पोहोंचलेल्या गांवांत जर म्युनिसिपाल कमिट्यांसंबंधीं कायदा अमलांत आलेला असला तर तेथील संभूयकारी मंडळी मेयर, आल्डर्मन, आणि बर्जेस असे मिळून होते. आणि त्याप्रमाणें तिचें नांव पडतें. उदाहरण, केंब्रिज संभूयकारी मंडळीचें वास्तविक नामाभिधान ह्मणजे केंब्रिजचे मेयर, आल्डर्मन, आणि बर्जेस असें आहे. जर एखाद्या ठिकाणीं अशी मंडळी असून मोठें देवालय आणि महोपाध्यायही असले, तर त्याला नगर हें अधिक दर्जाचें

नांव मिळतें, आणि त्या शहरच्या रहिवाशांना नगरवासी ह्मणतात आणि यामुळें आक्सफर्ड संभूयकारी मंडळीचें वास्तविक नामाभिधान आक्सफर्डचे मेयर, आल्डर्मन, आणि नगरवासी असें आहे पण स्थानिक व्यवस्थेच्या संबंधानें हा भेद केवळ नांवाचा आहे. म्युनिसिपालिट्यांचा एक साधारण शिक्का असतो. त्यांना निरंतर स्वत्वानुवृत्ति आणि अन्यादेयभूमिभोग असे हक्क असतात. त्यांना आपल्या संभूयकारी मंडळीच्या नावानें कारभार चालवितां येतात, व करार व फिर्यादी करितां येतात, आणि फिर्यादींत जबाब देतां येतो. म्युनिसिपालिटीच्या शहरांच्या हद्दी एखाद्या ठरीव नेमाअन्वयें कायम केलेल्या नाहींत, आणि पार्लमेंटाकडून विशेष कायदा घेतल्याविना त्या हद्दी फिरवून बसविण्याचा कोणाला ही अधिकार नाहीं. पारिश, यूनियनें, आणि कौंटी यांच्या हद्दींत त्या गुरफटून गेल्या आहेत. अनेकप्रसंगीं असें होतें कीं म्युनिसिपालिटीचें शहर, आणि त्याच नांवाचे पार्लमेंट सभेचे सभासद निवडण्याच्या संबंधाचें शहर, यांच्या हद्दी भिन्न असतात. बहुतकरून शहराच्या हद्दी, आणि तेथील सार्वजानिकारोग्य संबंधीं देशविभाग, आणि शालाधिकारी मंडळाच्या अमलांतील देशविभाग यांच्या हद्दी जुळतात. परंतु जुळल्याच पाहिजेत असा कांहीं नेम नाहीं. सारांश स्थानिक व्यवस्थेच्या संबंधानें केलेल्या इतर देशविभागाप्रमाणेंच शहरें देखील कशीं तरी दैवयोगानें कायम झालीं आहेत.

स्वतंत्र मनुष्यांनां शहरवासीपणाचे हक्क स्वतंत्र मनुष्य या नात्यानें प्राप्त होत नाहींत. पार्लमेंट सभेचे सभासद निवडण्याचा हक्क त्यांना आहेच. आणि १८३५सालीं जी संभूयकारी मंडळीची मिळकत होती, आणि ज्या धर्मादायाच्या मिळकती त्यांच्याकडे होत्या, त्या संबंधानें त्यांचे हक्क कायम ठेविले आहेत. पण शहरांतील दस्तुरी अथवा इतर बाबींपासून सूट मागण्याचा हक्क आतां ऐकला जाणार नाहीं. आणि आतां बक्षिस अथवा खरेदीच्या व्यवहारानें स्वतंत्रत्व मिळण्याचा मार्ग बंद झाला आहे.

म्युनिसिपालिटीच्या सभासदांच्या निवडणुकेसंबंधी जो हक्क तो दोन गोष्टींवर अवलंबून आहे—एक कर भरणें, आणि दुसरी शहरांत राहणें. हरएक मनुष्य जो शहरांमध्यें, घर, दुकान, वखार किंवा दुसऱ्या इमारतींची

वहिवाट करितो, आणि त्या संबंधी कर भरतो, व जो शहरापासून सात मैलांच्या आंत राहतो, त्याला आपलें नांव बर्जेसांच्या यादींत नोंदवून घेण्याचा, हक्क आहे. बर्जेसांच्या यादींत आपलें नाव नोंदवून घेण्याचा, आणि त्या नात्यानें संमति देण्याचा, स्त्रियांचा हक्क कायद्यांत स्पष्टपणें कबूल केला आहे. पण संभूयकारीमंडळीच्या खात्यांतल्या नोकरीवर त्यांना राहतां येतें असें दिसत नाहीं. बर्जेसांचे मुख्य हक्क आणि त्यांची मुख्य कर्तव्यें येणेंप्रमाणें:—(१) त्यांना कौन्सलदार, निवडक हिशेबतपासनीस, आणि आकारणीतपासनीस, यांच्या निवडणुकींत संमति देण्याचा हक्क आहे. (२) त्यांना संभूयकारीमंडळीच्या खात्यांतील कोणत्याही हुद्यांवर नेमितां येतें, आणि नेमणूक होऊन ते कामावर रुजू न झाल्यास दंडास पात्र होतात. (३) शहरांतील जुरींत बसण्याचा त्यांना हक्क आहे, आणि त्यासंबंधीं त्यांच्यावर बंधनही आहे. शहरांतल्या दरएक पारिशांतील बर्जेस लोकांची याद प्रेक्षक तयार करितात, आणि तपासणाऱ्या कोर्टापुढें गुदरतात. म्युनिसिपालिटीचें शहर आणि पार्लमेंटसभेंतील सभासद निवडणुकींचें शहर एकच असलें ह्मणजे तपासणारा बारिस्टर दोन्ही यादी एकाच वेळीं तपासतो. इतर ठिकाणीं तपासणारें कोर्ट मेयर आणि दोन तपासनीस मिळून होतें. तपासनीस हे बर्जेस असून कौन्सलदार होण्यास लायक असले पाहिजेत; पण कौन्सलदारीच्या हुद्यावर नेमिलेले नसले पाहिजेत. शहराची सर्व व्यवस्था कौन्सलदाराच्या हातीं आहे. कायद्यांत एक असें कलम आहे कीं संभूयकारीमंडळीच्या तर्फेनें कौन्सलाला कारभार करितां येतो, आणि सदर मंडळीस दिलेले सर्व अधिकार कौन्सलाला चालवितां येतात. कौन्सल हें मेयर, आल्डर्मन, आणि कौन्सलदार मिळून होतें. ह्या कौन्सलदारांची संख्या कायद्याअन्वयें शहरची संभूयकारीमंडळी स्थापिली ह्मणजे ठरविण्यांत येते. कौन्सलदाराच्या हुद्यास लायक व्हावयास, त्यांच्या निवडणुकींत संमति देण्याचा हक्क मिळण्यास ज्या गोष्टी लागतात त्याच आवश्यक आहेत. ह्मणजे बर्जेस लोकांच्या यादींत नांव दाखल झालें पाहिजे, किंवा राहण्याच्या बद्दलची अट खेरीज करून बाकी सर्व

गोष्टी अनुकूल असून, शहरापासून पंधरा मैलांच्या आंत राहणें असलें पाहिजे. आणि या शिवाय मिळकती संबंधी लायकीचें मान अंमळ जास्त आहे. कौन्सलाशीं केलेल्या कोणत्याही करारांत ज्याचा अर्थसंबंध असेल, किंवा ज्यानें धर्मोपाध्याय मंडळींत प्रवेश केला असेल, किंवा जो पंथांतर केलेल्या लोकांच्या मंडळीचा कायमचा उपाध्याय असेल, तो कौन्सलदाराच्या हुद्यास नालायक ठरविला आहे. कौन्सलदारांची निवडणूक दर वर्षी नोवेंबरच्या १ ल्या तारखेस होत असते. कौन्सलदार हुद्यावर ३ वर्षेपर्यंत राहतात. आणि दर वर्षास त्यांच्या पैकीं एक तृतीयांश हुद्यावरून पाळी पाळीनें निघून जातात. अशा हुद्दा सोडणाऱ्या कौन्सलदाराला पुनः नेमतां येतें.

कौन्सलदारांची निवडणूक पार्लमेंटसभासदांच्या निवडणुकींच्या नमुन्याप्रमाणेंच असते. शहराचे पोटभाग केलेले नसल्यास मेयर मतग्राहकांचें काम करतो. जर पोटभाग केलेले असले, तर निवडणूक सर्व पोटभागांत एकाच वेळीं होते; आणि दरएक पोटभागास वाटून दिलेला एक आल्डर्मन तेथें मतग्राहकांचें काम करतो. रिकाम्या जागांच्या संख्येपेक्षां जास्त उमेदावारांच्या नांवांची सूचना झाली असली, आणि मत परिसंख्यान व्हावें ह्मणून जर कोणी अर्ज केला, तर निवडणूक गुप्तरितीनें होते, आणि होईल तितकें करून १८७२ सालच्या कायद्यांतील ठरावांस अनुसरून होते. बहुतेक शहरांत निवडणूक राजकारणी पक्षांच्या तंत्रानें होते; आणि म्युनिसिपालिटीची निवडणूक ह्मणजे राजकारणाविषयीं लोकमतांच्या दिग्दर्शनाचें एक साधन असें मानतात. निवडणुकींच्या निकालाशीं केवळ स्थानिक गोष्टींचा फारच थोडा संबंध असतो असें दिसतें. म्युनिसिपालिटीच्या निवडणुकींत लांचलुचपत वगैरे असद्व्यवहाराचा गुन्हा ज्यांचे हातून होतो, ते पार्लमेंटसभासदांच्या निवडणुकींत तो गुन्हा केल्याप्रमाणेंच शिक्षेस पात्र होतात. एखाद्या निवडणुकींत असद्व्यवहार झाला आहे ह्मणून हरकत निघाली, तर त्याविषयीं हायकोर्टास अर्ज करण्याची वहिवाट आहे. अर्जाची चौकशी हायकोर्टाकडून पाठविलेल्या कमिशनरापुढें होते. तो कमिशनर निदान १२

वर्षे काम पाहिलेला बारिस्टर असला पाहिजे. पार्लमेंटसभासदांच्या निवडणुकींबद्दल अर्ज तपासतांनां जी कामाची रीति तीच रीति बहुधा या कामांत ही असते.

शहराच्या लहानमोठेपणाच्या मानानें कौन्सलदारांची संख्या कमी जास्त असते हें वर सांगितलेंच आहे. या संख्येच्या एक तृतीयांश मानानें आल्डर्मनांची संख्या असते. कोणीही मनुष्य कौन्सलदार असला, किंवा कौन्सलदार होण्यास लायक असला, तर त्याला आल्डर्मनच्या हुद्यावर नेमतां येतें. आल्डर्मनांची निवडणूक तारीख ९ नोवेंबर रोजीं कौन्सलाची साधारण तिमाही सभा भरत असते, त्या सभेंत होते. दोन पक्षांच्या संमतींची संख्या सारखीच पडल्यास अध्यक्षाला निर्णायक मत देण्याचा अधिकार आहे. जर एखाद्या कौन्सलदाराची आल्डर्मनच्या हुद्यावर नेमणूक झाली तर त्याची कौन्सलदाराची जागा खालीं पडते. आल्डर्मन हुद्यावर सहा वर्षे राहतात. त्यांपैकीं निंमेंजण दर तीन वर्षांस जागा खालीं करितात. यांची हुद्यावर राहण्याची मुदत इतर अंमलदारांपेक्षां जास्त आहे, ती कौन्सलाच्या कारभार रीतींत कांहीं कायमपणा व अविच्छिन्नता राहावी ह्मणून ठरविली आहे. मेयर चार दिवस काम करण्यास अशक्त झाल्यास त्याचें काम आल्डर्मनला चालवितां येतें. आणि पूर्वी सांगितल्याप्रमाणें शहराचे जेथें पोटविभाग केले असतात, तेथें आल्डर्मन मतग्राहकाचें काम करितात. पण या खेरीज आल्डर्मनला साधारण कौन्सलदारांपेक्षां जास्त मुखत्यारी किंवा कामगिरी कांहींच नसते.

मेयर हा संभूयकारी मंडळीचा मुख्य अंमलदार असतो. शहरांतील सर्व लोकांत पहिला मान त्यालाच आहे. मेयर यांची निवडणूक, आल्डर्मन, अथवा कौन्सलदार लोक किंवा त्या हुद्यास लायक असे लोक, यांमधून कौन्सलदार करितात. आल्डर्मनच्या हुद्याची ज्याची मुदत भरली असा गृहस्थ मेयर नेमितां येतो. आणि वस्तुतः त्या हुद्यावर बहुधा आल्डर्मनचीच नेमणूक होत असते. समारंभाच्या प्रसंगीं, आणि विशेषेंकरून कोणाचेंहीं आदरातिथ्य करणें असलें, ह्मणजे शहराचे प्रतिनिधि मेयरच असतात. तेव्हां

त्यांना पगार असावा हें न्याय्यच आहे. पगार कौन्सलांत ठरतो. निवडणूक कौन्सलाच्या साधारण तिमाही सभेंत, नोवेंबर महिन्याच्या ९ व्या तारखेस, होत असते. त्या सभेंत हेंच काम पहिल्यानें झालें पाहिजे, असा कायद्यांत विशेष नियम आहे. मेयर हा हुद्याच्या नात्यानें शहरांत फौजदारी न्यायाधीश, आणि कौन्सलाच्या सर्व सभांत अध्यक्ष असतो. मेयर आणि माजी मेयर खेरीज करून बाकी सर्व शहरांतील फौजदारी न्यायाधीश आतां हुजुराकडूनच नेमण्यांत येतात. पार्लमेंट सभासदांच्या निवडणुकींत, आणि शहराचे पोटभाग केलेले नसल्यास कौन्सलदारांच्या ही निवडणुकींत, मेयरच मतग्राहक असतो. शहरांत पार्लमेंट सभासदांच्या निवडणुकेचा संबंध नसला तर दोन मदतनिसांसह तोच तपासणाऱ्या कोर्टाचें काम करितो. रखवालदारीच्या कमिटींत ही तो हुद्याच्या नात्यानें सभासद असतो. तो हुद्यावर असतांनाच जर मेला, किंवा नादार झाला, तर नगर कारकुनानें त्याच्या जागेवर नेमणूक करण्याकरितां कौन्सलाची सभा भरविली पाहिजे. जर दुखण्यामुळें अथवा दुसऱ्या कारणानें फक्त कांहीं दिवसच काम चालविण्यास असमर्थ झाला, तर त्याला दुय्यम नेमतां येतो.

याप्रमाणें कौन्सलाचे तीन घटकावयव, ह्मणजे मेयर, आल्डर्मन, आणि कौन्सलदार, यांच्या विषयीं निरूपण झालें. ते नगरवासी मंडळीपैकींच असून साक्षात् अथवा परंपरया त्यांनींच निवडले जातात, हें पूर्वी दाखविलें आहे. त्यांच्या निवडणुकींत हुजुराचा कांहीं अर्थाअर्थी संबंध नाहीं. फ्रान्स देशांत, मेयर आणि त्याचा दुय्यम, हे सरकारांतून नेमिले जातात. आणि बहुत करून शहरांतील कौन्सलाच्या कामांत ते प्रतिबंधकाचें काम बरेंच बजावितात. १८६९ सालापासून स्पेन देशांतील म्युनिसिपाल कमिटयांना आपआपले अध्यक्ष नेमण्याचा हक्क मिळाला आहे. पण जरी या रीतीनें प्रथम दर्शनीं निवडणूक निष्प्रतिबंध दिसते, तरी अध्यक्षाला लिहितां वाचतां आलें पाहिजे, या अटीमुळें प्रतिबंध आहेच. जर्मनी देशांत बर्गोमास्तराची निवडणूक सरकारला नामंजूर करण्याचा अधिकार आहे, आणि त्यामुळें त्याच्या नेमणुकीला राजाची संमति लागते. इंग्लंड देशांत

अशा अटींची जरूर नाहीं ही एक आनंदाची गोष्ट आहे. आमच्या शहरांना आपआपल्या व्यवस्थापकांच्या नेमणुकी विषयीं संपूर्ण मुखत्यारी आहे.

आतां कौन्सलाच्या नोकरांविषयीं चार शद्ब लिहिले पाहिजेत. ते नोकर ह्मणजे एक नगर कारकून, एक खजाननीस, आणि जे दुसरे नोकर शहरांत नेमण्याची वहिवाट असेल किंवा कौन्सलाला आवश्यक दिसतील ते. नगर कारकून कौन्सलाच्या मर्जीनुरूप हुद्यावर राहतो. आणि त्याचा पगारही कौन्सलच ठरवितें शहराच्या सनदा, खतें, दप्तरें, व दस्ताऐवज, हे सर्व त्याच्या स्वाधीन राहतात. आणि कौन्सल सभेचीं आमंत्रणपत्रे पाठविणें आणि त्यांच्या सभेंत व इतर प्रसंगीं त्याच्या चिटनिसादाखल कारभार करणें हें त्याचें काम आहे. खजाननीसही कौन्सलाच्या मर्जीनुरूप हुद्यावर रहातो. आणि त्याचा पगारही कौन्सलच ठरवितें. संभूयकारी मंडळीच्या तर्फेनें सर्व देवघेवीचें काम त्याच्या कडेस असते. कौन्सलानें नेमलेल्या सर्व नोकरांना आपली कामगिरी नीट बजावण्याबद्दल जामीन द्यावे लागतात. आणि त्याच्याकडून हिशेब घेण्याविषयीं कडक नियम आहेत. वर लिहिलेले नोकर हे सर्व शहराचें नेहमीचेंच नोकर आहेत. पण कांहीं शहरांत आपल्या नियमित कामां शिवाय कोंटीसारखी व्यवस्था आसल्यामुळें स्वस्थता राखणारे अंमलदार आणि क्वार्टर सेशन नामक कोर्ट हीं असतात. यामुळें तेथें जास्त नोकर ठेवणें भाग पडतें.

जर एखाद्या शहरांत स्वतंत्र क्वार्टर सेशनाचें कोर्ट नसलें तर कौन्सलाला तें मिळण्याविषयीं राणीसरकाराकडे अर्ज करितां येतो. अर्जांत आधार दाखविले पाहिजेत. आणि न्यायाधिशास किती पगार देण्याची तयारी आहे.तें दर्शविलें पाहिजे. पगार बहुतकरून नांवाचाच असतो. ह्मणजे सुमारें दर वर्षास ४०।९० पौंड. शहरच्या क्वार्टर सेशनांत जस्टिस लोक न्यायाधीश असत नाहींत; तर न्यायाधीशाच्या जागीं निदान पांच वर्षे काम पाहिलेला बारिस्टर असला पाहिजे. त्याला रिकार्डर ह्मणतात. होम सेक्रेटरीनें फर्माविल्यावरून हुजुराकडून रिकार्डराची नेमणूक होत असते. तो वर्तन नीट असे तों पर्यंत हुद्यावर राहतो. हुद्याच्या

नात्यानें तो शहरचा जस्टिस असतो. आणि त्याची माना संबंधानें जागा मेयरानंतर. एकच बारिस्टर दोन किंवा अधिक शहरांचा रिकार्डर असूं शकतो. रिकार्डराला शहरचा मेयर अथवा आल्डर्मन अथवा कौन्सलदार होतां येत नाहीं; आणि त्याला पार्लमेंटाचाही सभासद होतां येत नाहीं. जर एखादा प्रसंगीं त्याला कामावर हजर राहतांच येत नसलें, तर निरुपायास्तव पुढें येणाऱ्या सेशनांत आपलें काम पाहण्यासाठीं त्याला लायकीचा बारिस्टर नेमतां येतो.

जर एखादा शहरांत दिवाणी कोर्टें भरण्याची वहिवाट असली, तर, स्थानिक कायद्यांत निराळ्या प्रकारचा नियम नसल्यास, तेथील न्यायाधीश सामान्यतः रिकार्डर हाच असतो. अठरा शहरांत अशी दिवाणी कोर्टें निरानिराळया अमलाचीं आहेत. पण यांपैकीं पुष्कळ शहरांत हीं कोर्टें केवळ नामधारी आहेत, कारण कौंटी कोर्टांचा आणि त्यांचा अंमल समानविषयक आहे, आणि पक्षकार लोकांना तींच कोर्टें आवडतात.

रिकार्डराचा फौजदारी अंमल कौंटींतील क्वार्टर सेशन कोर्टासारखा आहे. आणि कामचालविण्याची रीत ही तशीच असते. मोठ्यांत मोठी ह्मणजे सात वर्षें सक्त मजुरीची शिक्षा देण्याचा त्याला अधिकार आहे. त्याचा दिवाणी अंमल फार कोता आहे, आणि शहरांत कर बसविणें अथवा कमी करणें आणि लैसेन्स देणें ह्या कामांत हात घालणें त्यांना कायद्यानें निषिद्ध आहेत. क्वार्टर सेशन कोर्टाच्या संबंधाचे दोन दुसरे हुद्दे आहेत. एक स्वस्थतेच्या कमिशनाचा कारकून, आणि एक अपमृत्युपरीक्षक. कारकुनाची नेमणूक कौन्सल करतें, आणि त्याचें वेतन ह्मणजे त्याला दस्तुरी मिळते तीतकेंच. अपमृत्युपरीक्षकाची नेमणूक कौन्सलच करतें. आल्डर्मन आणि कौन्सलदार ह्यांखेरीज कोणताही "योग्य" मनुष्य ह्या हुद्याला लायक आहे. पण निरुपायास्तव गैरहजीर असतांनां अपमृत्युपरीक्षक जर एखादा दुय्यम नेमील तर तो दुय्यम मात्र बारिस्टर किंवा सॉलिसिटर असला पाहिजे. अपमृत्यु परीक्षक वर्तन नीट असे तोंपर्यंत हुद्यावर राहतो, आणि त्याचें वेतन ह्मणजे दस्तुरी; तिच्या बद्दल रिकार्डराचा दाखला लागतो. अपमृत्यु

षरक्षिकाचीं कर्तव्यें आणि त्याची तपास करण्याची रीत हीं कौंटीं-तल्या सारखींच असतात. जर फौजदारी न्यायाधीश पगारी असावा अ-शी कौन्सलाची इच्छा असली, तर त्यांनीं होम सेक्रेटरी यांस नेमणूक करण्याविषयीं अर्ज करावा. जर नेमणूक झाली, तर तो न्यायाधीश रा-णी सरकारच्या मर्जीनुरूप हुद्यावर राहतो. तो निदान सात वर्षे काम पाहिलेला बारिस्टर असला पाहिजे. आणि त्याला दरसालचा पगार ठरविलेला असतो. दोन जस्टिसांनां एकत्र बसले असतां जितका अधिकार असतो. तितका त्याला अधिकार मिळतो. पगारी फौजदारी न्यायाधीश काय ते सोळा शहरांत आहेत.

ज्या शहरांत कौंटीं अधिकाऱ्यांचा अंमल चालत नाहीं, आणि ज्यां-नां शहराचे अथवा गांवाचे कौंटी असें नांव आहे, तेथें शेरिफही कौन्सलच नेमितें. नोवेंबरच्या ९ व्या तारिखेस मेयरच्या नेमणुकी नंतर तिमाहीं सभेंतच ही नेमणूक झाली पाहिजे. १८७९ सालच्या अन्न व-नस्पति विक्रीविषयींच्या कायद्या अन्वयें स्थानिकव्यवस्थामंडळाला सार्वजनिक पृथक्करणकरणारा नेमण्याबद्दल कौन्सलास हुकूम देतां येतो.

याप्रमाणें कौन्सलाची घटना व त्यांचे अंमलदार यांच्या विषयीं मा-हिती थोडक्यांत झाली. आतां त्यांचीं कर्तव्यें व त्यांचे अधिकार यांचा विचार केला पाहिजे. साधारण काम करण्यासाठीं कौन्सलाच्या चार तिमाही सभा भरल्या पाहिजेत. शिवाय मेयराला केव्हांही सभा भर-विण्याचा अधिकार आहे. मेयरानें सभा भरण्याचें नाकबूल केल्यास पांच सभासदांस भरविण्याचा अधिकार आहे. साधारणसभा खेरीज करून बाकींच्या सभा होण्याचे पूर्वीं तीन दिवस सभेच्या कार्याची याद नगरकारकुनानें फिरविली पाहिजे. अध्यक्षस्थानीं मेयर असावयाचे ते नसल्यास दुय्यम मेयर अथवा एखादा आल्डर्मन. अध्यक्षास काय काय काम होईल त्याचें टांचण ठेवावें लागतें. व तें पुढील सभेच्या अध्यक्षांच्या सहीनें मंजूर झालें पाहिजे. कोणत्याही नगरच्या रहिवाशानें एक शिलिंग दिला ह्मणजे त्याला सर्व टाचणें पाहतां येतात. किंवा त्याच्या नकला घेतां येतात. कोणचेंही काम कमिटीच्या हातानें चांगलें सिद्धीस जाईल असा कौन्सलाचा अभिप्राय असला तर त्यानां कमिट्या नेमतां

येतात. पण कमिट्यांचें काम सर्व कौन्सलापुढें पसंत करण्या करितां आणिलें पाहिजे.

कौन्सलाचें काम केवळ व्यवस्था करण्याचेंच नाहीं; कायदेकानू करण्याचें ही आहे. "शहराची व्यवस्था व बेतबात नीट राखण्या करितां, आणि अवघ्या शहरभर अमलांत असलेल्या कायद्यानें ज्या परोपद्रवा बद्दल संक्षिप्त रीतीनें शिक्षा होण्याचा मार्ग नाहीं, असे परोपद्रव बंद-करण्या करितां, व टाळण्या करितां, त्यांस उचित दिसतील तसे कानू करण्याचा" अधिकार त्यांनां कायद्यानें दिला आहे. कानू अमलांत आणण्या करितां त्यांच्या भंगा बद्दल ५ पौंड दंड करतां येतो. एखादा कानू कांहीं अंशीं अथवा सर्वांशीं नामंजूर करण्याचा अधिकार राणी साहेबांच्या प्रिवी कौन्सलाला आहे. पार्लमेंटानें केलेला कायदा सर्व प्रजाजनांला माहित असला पाहिजे; आणि तो छापून प्रजेस उपलभ्य होण्याच्या पूर्वीं अंमलांत आला तरी त्याप्रमाणें प्रजेनें वर्तन ठेविलें पाहिजे, असें त्यांच्यावर कायद्याचें बंधन आहे. पण शहराच्या कानूं विषयीं मनुष्यदौर्बल्याचा कांहीं विचार करावा लागतो. ह्मणून त्या विषयीं नियम असा आहे कीं कानू जाहीर झाल्यापासून चाळीस दिवस होऊन गेल्या शिवाय तो अमलांत येत नाहीं. कौन्सलाचीं कारभार संबंधीं कामें दोन प्रकारचीं आहेत:—एक साधारण आणि एक नैमित्तिक. पुष्कळ शहरांना विशेष कायद्या अन्वयें स्थानिकोपयोगाचीं कामें, ह्मणजे पाण्याचा किंवा दिव्याकरितां ग्यासाचा पुरवठा करणें ह्या प्रकारचीं कामें, करण्या करितां विशेष अधिकार दिलेले आहेत. याशीं आपल्याला येथें संबंध नाहीं. पण या शिवाय पार्लमेंटाचे साधरण कायदेही पुष्कळ आहेत, त्या अन्वयें त्यांतील नियम बजावण्याचें काम निरनिराळ्या स्थानिक अधिकाऱ्यांकडे सोंपविलें आहे. म्युनिसिपालिटीचे शहरांत हें काम बहुधा कौन्सलाकडे लावून दिलेलें असतें. उदाहरण. एखाद्या स्थानिकमंडलाच्या हद्दींत जर सबंध शहर येऊन गेलेलें नसलें तर सार्वजनिकारोग्यसंबंधी मुखत्यारी कौन्सलाकडे येते. आणि मग १८७५ पासून १८७९ पर्यंत सार्वजनिकारोग्यासंबंधीं जे कायदे झाले आहेत त्यांत ठरविलेलीं नगरांतील सार्वजनिकारोग्याधिकाऱ्याचीं कर्तव्यें व त्यांचे अधिकार हे त्या नात्यानें कौन्सला-

ला प्राप्त होतात. याच प्रमाणें शालामंडळ जेथें नसतें, त्या शहरांत कनिष्ट प्रतीच्या शिक्षणा बद्दलचा कायदा अंमलांत आणण्याकरितां, मुलें शाळेंत हजर ठेवणारी कमिटी कौन्सलाला आपल्याच सभासदांमधून नेमावी लागते. आणखी शिल्पकारवासगृहें, प्रेतनिधानस्थलें, अन्नमिश्रण, सर्वप्रवेश्य पुस्तकालयें, कौतुकालयें, व कलापाठशाळा, यांबद्दलचे कायदे अमलांत आणण्या करितां स्थानिक अधिकारी कौन्सलेंच होत.

कौन्सलाचीं साधारण कर्तव्यें ह्मटलीं ह्मणजे, संभूयकारी मंडळीच्या मिळकतीची वहिवाट चालवावी, पोलीस शिपाई यथायोग्य ठेवावे, बाजार व प्रेतनिधानस्थलें यांची व्यवस्था नीट ठेवावी, कर वसूल करावे, आणि जरूर पडेल तेव्हां उसनवार पैसे काढावे, हीं होत. विशेष स्थानिक कायदे नसले, तर शहरांत सडकांची फरसबंदी, दिवे बत्ती, झाडलोट, आणि पाणि व ग्यास यांचा पुरवठा, ठीक राखण्याची कौन्सलानें तजवीज ठेविली पाहिजे; आणि ज्या ठिकाणीं एखाद्या स्थानिक कायद्यानें हीं कामें विशेष कमिशनर अथवा दिंमतदार यांजकडे सोंपलेलीं असतात, त्या ठिकाणीं त्यांनां आपलीं कामें कौन्सलाकडे वर्ग करण्याचा अधिकार दिलेला असतो. कौंटींतल्या पुलांबद्दल जस्टिस लोकांची जीं कर्तव्यें व जे अधिकार आहेत, तींच कर्तव्यें व तेच अधिकार शहरच्या पुलांबद्दल कौन्सलाकडे आहेत. शहरसंबंधी कचेऱ्याकरितां पांच एकरांच्या आंत जमीन कौन्सलास विकत घेतां येते. आणि सार्वजनिक दिवाणखाना, कौन्सल सभागृह, जस्टिस लोकांची कचेरी, ( मर्जी असल्यास पोलिस ठाणें व कोंडण्याच्या खोल्या यांसहित ) क्वार्टरसेशन आणि पेटीसेशन यांची कचेरी, वरिष्ठ न्यायाधिशांची सभा, ( मर्जी असल्यास न्यायाधिशास राहण्याची जागा धरून ), संमतिपरिसंख्यानगृह, आणि शहरच्या कामाकरितां आवश्यक दुसऱ्या इमारती, बांधण्याला कौन्सल मुखत्यार आहे. हुजूर जामदारखान्याच्या अंमलदारांकडून मंजुरी घेतल्याविना शहराच्या जमिनी कौन्सलाला विकतां येत नाहींत, गहाण ठेवितां येत नाहींत, व लांब मुदतीच्या पट्यानें देतां येत नाहींत. याला अपवाद एक आहे तो असा कीं, विशेष नियमांप्रमाणें कामकरी लोकांच्या राहत्या घरांकरितां लांब मुदतीचे पट्टे देता येतात. संभूय-

कारी मंडळीच्या मिळकतीचा गैर रीतीनें, आणि विशेषें करून पार्लमेंट-सभेच्या सभासदांच्या निवडणुकींच्या संबंधानें, जर विनियोग झाला, तर त्याबद्दल शिक्षा कडक होते. पोलीस फौजेची तर्तुद, गस्त कमिटी ह्मणून एक कौन्सलाची कमिटी असते तिच्या हातीं आहे. त्या गस्त कमिटींत मेयर आणि शिवाय कौन्सलाच्या एक तृतीयांशापर्यंत जितके सभासद त्या कमिटींत नेमिले असतील तितके, असे असले पाहिजेत. गस्त कमिटीचें काम हें कीं शहरांत कनिष्टेबलांच्या हुद्यावर पुरतील इतके योग्य मनुष्य नेमावे, आणि त्यांच्या बंदोबस्ताकरितां, व त्यांना आपल्या कामासंबंधीं मार्ग दाखविण्याकरितां, नियम घालून द्यावे. त्यांना बरतर्फ करण्याचा अधिकारही गस्त कमिटीकडेच आहे. जर एखाद्या प्रसंगीं शहरची पोलीस फौज पुरे इतकी नसली, तर त्या शहरांतील सत्ताधारी जस्टिस लोकांना मदत करण्या साठीं विशेष कनिष्टेबल नेमतां येतात.

आतां शहराच्या जमाखर्चाविषयीं चार शब्द लिहिले पाहिजेत. त्यांत तीन प्रकरणें तपासण्याजोगीं आहेत. एक खर्च, एक उसने काढलेले पैसे, आणि एक हिशेब. संभूयकारी मंडळीच्या मिळकतीपासून प्राप्त होणारें भाडेंतोडें, फायदा, आणि उत्पन्न, हें सर्व एक शहरपुंजी ह्मणून आहे त्या पुंजींत जमा होतें. संभूयकारी मंडळीचा सर्व खर्चवेंच प्रथमतः या पुंजींतून होत असतो. सर्व खर्चवेंच पुरून उरण्यापुरती ही पुंजी कधींही झाली नाहीं असें वाटतें. पण तसें झाल्यास उरलेली रकम कौन्सलाच्या हुकुमानें शहर सुधारणुकेस आणि रहिवाशांच्या सार्वजनिक हितासाठीं कोणत्यातरी कामास लाविली पाहिजे. उत्पन्न कमी पडल्यास खूट भरण्यासाठीं शहरकर ह्मणून एक कर कौन्सलाला बसविला पाहिजे. दर एक पारिशाकडून किती रकम यावी त्याचा ठराव कौन्सल करितें. आकारणी बहुधा दीनार्थकराकरितां ठरविलेल्या मिळकतीच्या किंमतीवरूनच होते. पण जरूर पडल्यास निराळी किंमत बसवितां येते. प्रेक्षक हेच कर गोळा करणारे होत; ह्मणजे कर गोळाकरण्याची जबाबदारी त्यांच्यावर आहे. शहरांतील आरोपी कोर्टाकडे इनसाफाकरितां पाठविण्यांत आले, ह्मणजे त्यासंबं-

धानें शहरें आणि कौंटी यांच्या दरम्यान हिशेबाच्या तडजोडीबद्दल नियम केलेले आहेत. पोलीस फौजेचा खर्च कांहीं प्रसंगीं शहरकरांतून न देतां गस्तसंबंधी कर ह्मणून एक नैमित्तिक कर बसवून त्यांतून देण्यांत येतो. जर तपासाअंतीं फौज कामांत दक्ष आहे ह्मणून दाखला मिळाला, तर फौजेंतील मनुष्यांच्या पगाराच्या निम्मे हिशा पर्यंत हुजूर जामदारखान्यांतून मदत मिळते. फौजदारी फिर्यादींच्या खर्चांतलाही कांहीं अंश हुजूर जामदारखान्यांतून मिळत असतो.

कांहीं अंशीं चिरस्थायी अशा उपयोगी कामांवर जो पैसा खर्च होतो तो बहुधा उसनवारी काढलेला असतो. तो पैसा हप्त्या हप्त्यानें फेडावा, आणि त्याबद्दल कराचें उत्पन्न गाहाण समजावें असा ठराव असतो. जर शहरांतील सुधारणुकेचा उपयोग फार वर्षे चालण्या सारखा असला, तर तितक्या मुद्दतींत खर्चाची फेड व्हावी हें योग्य आहे, कारण तेणेंकरून ज्यांनां ज्यांनां फळ मिळेल त्यांनां त्यांनां त्या बद्दलचा बोजा घ्यावा लागेल. मि. बर्न्स साहेबांनीं जो नगरव्यवस्थेवर निबंध लिहिला आहे, त्यांत उसने पैशाबद्दल जीं अनेक व भानगडीचीं कायद्यांत कलमें आहेत त्यांचा गोषवारा चांगल्या रीतीनें दिला आहे. ते ह्मणतात कीं "१८३९ सालच्या कायद्याचा इरादा असा होता कीं शहराच्या सामान्य कामांकरितांच काय ते पैसे उसनवार घेण्यांत यावे; पण पुढें म्युनिसिपालिट्यांवर जसजशीं जास्तीं कामें लादण्यांत येऊं लागलीं, त्या त्या मानानें संभूयकारी मंडळ्यांना पैसे उसने काढण्याचे जे अधिकार दिले होते, त्यांच्या इयत्ता व प्रकारही पुष्कळ वाढविण्यांत आले आहेत. उदाहरण, आतां पार्लमेंट सभेच्या साधारण कायद्याअन्वयें शहराच्या सामान्य कामांकरितां, प्रेतनिधानस्थळांकरितां, उन्मत्ताश्रमांकरितां, महोपवनांकरितां, हमामखान्याकरितां, हिस्पितळांकरितां, नळ व इतर आरोग्य संबंधी कामांकरितां, उद्योगशाला व बालगुन्हेगारांच्या सुधारणे साठीं स्थापिलेल्या शाला यांकरितां, पुस्तकालयांकरितां, सार्वजनिक इमारतींकरितां, व वसतिगृहसुधारणुकेच्या तजविजींकरितां, निरनिराळीं कर्जें काढतां येतात. आणि स्थानिक कायद्याअन्वयें तर पार्लेमेंट सभेची मंजुरी ज्या कोणत्याही कामाकरितां मिळविण्याची तजवीज

होईल त्या करितां कर्ज काढितां येतें. वर दर्शविलेलें साधारण कर्ज फेडण्याचे दोन प्रकार. एक, व्याज मुद्दला बद्दल दरसाल अमुक ह्मणून ठरविलेल्या समसमान हप्त्यांनीं; अथवा ठरविलेल्या मुदतींत कर्ज फेडण्याकरितां स्थापिलेल्या पुंजीच्या योगानें. दुसऱ्या पक्षीं, ज्या कायद्यावरून पैसे उसने घेण्यास अधिकार मिळतो त्यांतच मुदत ठरविलेली असते, किंवा कर्ज काढण्या पूर्वीं हुजुराकडून अनुमति घ्यावी लागते, आणि तेथूनच मुदतही कायम करण्यांत येते. ही अनुमति देण्याचा अधिकार हुजुराकडील निरनिराळ्या खात्यांतल्या अंमलदारांना आहे. ह्मणजे, कांहीं कामांत जामदारखान्याकडील, कांहींकांत होम आफिसाकडील, कांहींकांत ( उदाहरणार्थ बंदरांच्या अथवा धक्याच्या कामीं ) व्यापार मंडळाकडील, पण बहुधा, आणि विशेषें करून आरोग्य संबंधीं कामांत आणि सुधारणुकेच्या तजतजाविजीसंबंधीं कामांत, स्थानिक व्यवस्था मंडलाकडील अंमलदारांना तो अधिकार आहे. दरएक बाबतींत शहरच्या संभूयकारी मंडळीला कर्जाऊ पैसे पाहिजे असले ह्मणजे वरिष्ट सत्ताधारी अंमलदारांची अनुमति मागावी लागते. मागणी आल्यावर योग्य सूचना देतात व नंतर स्थानिक चौकशी होते. आणि कर्ज मंजूर केल्यास किती मुदतींत फेड करावी ती मुदत हुजुराकडून कायम केली जाते. या शिवाय अव्यवस्थित खर्चाला एक दुसरा प्रतिबंध असा आहे कीं, पार्लमेंट सभेपुढें कायद्याचा मसुदा आणण्याच्या कामांत, कौन्सलांत तो बहुमतें पसंत झाल्या शिवाय, आणि कर भरणाऱ्यांच्या जाहीर सभेंत मंजूर झाल्याशिवाय, आणि याही उपर हुजुराकडील अनुमति मिळाल्याशिवाय, संभूयकारी मंडळीला हात घालतांच येत नाहीं." याप्रमाणें कर्ज काढण्याचा प्रकार पुष्कळ एक म्युनिसिपालिट्यांनीं केला आहे. १८८२ सालच्या स्थानिक करांच्या पत्रकावरून असें दिसून येतें कीं मांचेस्टर आणि ब्राडफर्ड या दोन शहरांचें कर्ज जवळ जवळ दहा लक्ष पौंड आहे; बर्मिंघमचे पांच लक्ष पौंड आहे; पण लिवर्पूलचें फक्त एक हजार पौंड आहे.

बहुतेक स्थानिक अधिकाऱ्यांच्या हिशेबांचा तपास स्थानिकव्यवस्था मंडळाकडूनच होत असतो. पण त्यांच्या अंमलाखालीं शहरें येत नाहींत.

शहरच्या हिशेबांचा तपास शहरांतल्या तपासनिसांकडून होतो. त्यांत दोन निवडक तपासनीस ह्मणून असतात, ते रहिवाशांनीं निवडलेले, आणि एक मेयराचा तपासनीस ह्मणून मेयरानें नेमलेला असतो. निवडक तपासनीस कौन्सलदार होण्यास लायक असला पाहिजे, आणि कौन्सलाचा सभासद नसला पाहिजे. मेयराचा तपासनीस हा कौन्सलाचा सभासद असला पाहिजे. खजानानिसानें आपले हिशेब सहा सहा महिन्यांनीं तयार केले पाहिजेत. आणि तयार केल्यानंतर एका महिन्याचे आंत, इतर आवश्यक कागदपत्रें पावत्या वगैरे सुद्धां तपासनिसांचे स्वाधीन केले पाहिजेत. वर्षाची दुसरी तपासणी झाली ह्मणजे नगरकारकुनानें सालाच्या आयव्ययाचें पत्रक तयार करून स्थानिकव्यवस्थामंडळाकडे पाठविलें पाहिजे. तपासणी आटपल्यानंतर एक महिन्याचे आंत हें पत्रक गेलें पाहिजे. या सर्व पत्रकांचा गोषवारा दरसाल तयार करून पार्लमेंटसभेकडे सादर करण्याकरितां तयार करण्याचें काम स्थानिकव्यवस्थामंडळाकडे आहे. शहरच्या पैक्याचा अनुचित अथवा अननुमत कामांवर खर्च न होण्याकरितां एक अंमळ चमत्कारिक प्रतिबंध योजिला आहे. कायद्यांत असें एक कलम आहे कीं, शहरच्या पुंजींतून पैसा देण्याकरितां जें आज्ञापत्र असेल त्यावर कौन्सलाच्या तीन सभासदांच्या सह्या पाहिजेत, आणि त्यावर नगरकारकुनाची रुजू ह्मणून सही पाहिजे. असें आज्ञापत्र सर्शियोरेराई हुकूम काढून वरिष्ठ न्यायाधिकारी कोर्टांच्या क्वीन्सबेंच नामक शाखेसमोर आणितां येतें. आणि तेथील न्यायाधिशास रास्त वाटेल त्याप्रमाणें त्यांनीं तें आज्ञापत्र कांहीं अंशीं अथवा सर्वांशीं रद्द अथवा मंजूर करावें, आणि खर्चाचा निकाल करावा. या रीतीनें, नेहमीची तपासणी निरुपयोगी झाल्यास, वरिष्ठ कोर्टाला प्रासंगिक तपासनिसाचें काम सोपल्यासारखें झालें आहे, पण कोर्टांच्या रपोटांवरून या उपायाचा फारसा उपयोग झाला आहे असें दिसत नाहीं. असो.

आमच्या म्युनिसिपालिट्यांच्या व्यवस्थेंत एक व्यंग आहे तें हें कीं त्यांच्या आयव्ययाच्या अजमासाचें पत्रक ह्मणून साल सुरुवातीला कांहींच करण्यांत येत नाहीं. फ्रान्स देशांत दरएक काम्युन आणि अरॉंडिस्मेंट आणि

डिपार्टमेंट यांत असें अजमासाचें पत्रक दरसाल तयार करतात. त्यांत त्यांची द्रव्यासंबंधी सालमजकूरची स्थिति दाखविली असते. आणि पेस्तरसालीं काय लागेल याचा अजमास केलेला असतो. अशी कांहीं व्यवस्था इंग्लंड देशांत सुरू केली तर बहुतकरून स्थानिक उधळेपणास प्रतिबंध बराच होईल.

एक मुद्दा उरला आहे, तो हा कीं शहरांच्या आणि हुजूराकडील अधिकाऱ्यांचा संबंध काय ? इतकें तर पूर्वी सांगण्यांत आलें आहे कीं हुजूर अधिकाऱ्यांचे नियमन ह्मणजे फक्त प्रतिषेधरूपी आहे. कांहीं कामें, ह्मणजे उदाहरणार्थ संभूयकारी मंडळीच्या मिळकती वरचें पूर्ण स्वत्व सोडणें, किंवा कर गाहाण ठेवून कर्ज काढणें, यांत नामंजूर करण्यापुरता त्यांचा अधिकार, या उपर कांहीं नाहीं. इतर सर्व गोष्टींमध्यें आपल्या कर्तव्यांत म्युनिसिपालिटयांचें स्वातंत्र्य अगदीं परिपूर्ण आहे.

## भाग. ६

कांहीं कारभाराच्या संबंधानें इंग्लंड देशाचे कौंटीनामक भाग केलेले आहेत. साक्सन लोक ज्याला शायर ह्मणत त्यालाच कौंटी हें नांव नार्मन लोकांनीं दिलें. या शिवाय बेलिवुईक ह्मणून एक तिसरें धेडगुजरी नांव आहे, त्याचा अद्यापि कायद्याच्या संबंधानें प्रयोग आढळतो. खुद्द इंग्लंड देशांत चाळीस कौंटी आहेत. आणि वेल्स देशांत बारा आहेत. या देशभागांना कौंटी हें पद मुख्यार्थी लागतें. याशिवाय पूर्वी सांगितल्या प्रमाणें अठरा शहरांनां नगराचे कौंटी आणि शहराचे कौंटी अशा संज्ञा आहेत. तीं शहरें ज्या कौंटींच्या हद्दींत आहेत तेथील अंमलाखालीं येत नाहींत आणि पुष्कळ गोष्टींसंबंधानें, व विशेषें करून न्यायाधिकाराच्या संबंधानें त्यांत कौंटीची व्यवस्था चालत आली आहे. पार्लमेंटसभेच्या सभासदांच्या निवडणुकींकारितां बहुतेक कौंटीचे दोन विभाग झाले आहेत आणि त्या निवडणुकीच्या संबंधानें पाहूं गेलें तर ते विभाग स्वतंत्र कौंटीच आहेत असें ह्मटल्यास चालेल. जुने लोप पावलेले हंड्रेड खेरीज करून दुसऱ्या कोणत्याही स्थानिक व्यवस्थे संबंधी केलेल्या

देशविभागांचा कौंटी या देशविभागाशीं मुळींच संबंध नाहीं. शहरें, आरोग्य संबंधी देशविभाग, राजमार्ग संबंधी देशविभाग, यूनियनें, पारिश, शालामंडलप्रदेश, आणि प्रेतनिधानमंडलप्रदेश, यांच्या हद्दींची आणि कौंटीच्या हद्दींची मिसळ होऊन गेलेली आहे. कौंटी कौंटींत क्षेत्रफळ आणि लोकसंख्या या बाबतींत फार अंतर असतें. रटलंडचें क्षेत्रफळ ९४,८८९ एकर, आणि तेथें २१,००० लोक आहेत; आणि यार्कशायराचें ३८,८२,८५१ एकर आणि तेथें २,८८,६०० लोक आहेत. मागें कौंटीच्या अमला बाहेरलीं अशीं पुष्कळ स्थानें होतीं. पण १८५० सालच्या एका कायद्या अन्वयें तीं बहुतकरून सर्व नाहींशी होऊन ज्या कौंटीच्या हद्दींत होतीं त्यांतच त्यांचा समावेश झाला आहे. तरी कांहीं कामां पुरती ईली आणि सिंकपोर्ट यांची स्वतंत्रता अजूनही शाबूत आहे.

उत्तरेकडील कौंटीच्या हद्दींत नार्मन विजया नंतर कांहीं फेरफार झाले असावे, असें दिसतें खरें; तथापि शायर हे विभाग निदान एड्गर राजाच्या कारकीर्दी इतकेतरी पुरातन आहेतच. साक्सन कारकीर्दींत शायरांची व्यवस्था प्रातिनिधिसत्ताकच असे. त्यांच्या व्यवस्थापक सभेंत सर्व जमीनदार लोक आणि दरएक टौनशिपांतला रीव नामक अंमलदार, आणि दुसरे निवडलेले चौघेजण; असे सभासद असत. मुख्य अधिकारी ह्मणजे एक एल्डरमन, तो राजानें नेमलेला, आणि एक शेरीफ तो निवडलेला, आणि हुद्यावर ताहयात राहणारा; असा असे. शायर सभेचें काम सर्वप्रकारचें असे—कारभार चालविण्याचें, कायदे ठरविण्याचें, आणि न्याय करण्याचें. जे सभासद हजर असत ते सर्व न्यायाधीश. हुजुराकडील अंमल फारसा चालत नसे. आणि निरनिराळे शायर ह्मणजे जवळ जवळ अमेरिकेंतील संयुक्तराष्ट्रा ( युनैटेड स्टेटस ) सारखेच परस्पर स्वतंत्र असत. नार्मन कारकीर्दीच्या सुरवाती पर्यंत हें स्वातंत्र्य बऱ्याच अंशीं राहिलें होतें. शायर व्यवस्थापक सभा हीच, कौंटी न्यायसभा बनून राहिली होती. पण राजाकडील अंमलाचा प्रवेश जास्त होऊं लागला होता. राजनियुक्त जे प्रवासी न्यायाधीश असत, ते देशभर प्रवास करून ठळक ठळक दिवाणी व फौजदारी मोकदम्यांची चौकशी

करीत; इतकेंच मात्र कीं ती चौकशी कौंटी सभेंत होत असे. एल्डर्मन-चा हुद्दा नाहींसा होत आला होता. शेरीफ हाच मुख्य अंमलदार होऊन बसला होता, आणि तो निवडलेला नसून राजनियुक्तच असे, राजकरांचा इजारदारही असे, आणि हुद्यावर फक्त एक वर्षभर राहात असे. तेराव्या शतकांतल्या कौंटी कोर्टाचें वर्णन प्रोफेसर स्टब्स साहेबांनीं दिलें आहे तें येणेंप्रमाणें " संपूर्ण मजलस भरलेली असतांना ( ह्मणजे राजनियुक्त प्रवासी न्यायाधीश प्रवास करीत त्या प्रसंगीं ) त्यांच्या खिद-मतीस हजर असतानां,या कोर्टांत मुख्य महोपाध्याय, महोपाध्याय,आबट, प्रायर, अर्ल, बारन, नाइट, आणि जमिनदार, शिवायदरएक टौनशिपाक-डला रीव नामक अंमलदार, आणि चार निवडकगृहस्थ, आणि दरएक शहरांतले बारा नगरवासी, असे मिळून हजर असत. तेव्हां ती एक लोकांची साधारण सभाच ह्मणायची, आणि त्यांत स्थानिक पार्लमेंटाचे सर्व घटकावयव असत. पार्लमेंट सभेमध्यें पुढें जसे राष्ट्रांतील तीन वर्गांचे प्रतिनिधि असत, त्याचमानानें या कोर्टांत राष्ट्रीय मंडळीत-ल्या सर्वलोकांचे प्रतिनिधि असत. हें कौंटीकोर्ट महिन्यांत एकवेळ भरत असे. पण या मासिक सभेंत ज्यांनां विशेष काम असे तेच हजर रा-हात असत. विशेष कामाकरितां संपूर्ण मजलसीची जरूर असली ह्म-णजे विशेष आमंत्रण नेहमी जात असे. याकौंटी कोर्टांत शेरीफ अध्यक्ष असून सर्व शायराचा कारभार चालत असे. आणि कोर्टानें जें केलें तें शायरानें केलें असेंच गणलें जात असे. मग ते फौजे संबंधी, न्यायसंबंधी, वसुलासंबंधी, पोलीस बंदोबस्तासंबंधी, अथवा कौंटी-च्या साधारण व्यवस्थेचा विचार निघून त्यासंबंधी कांहीं केलेलें असो, सर्व सारखेंच." यानंतर मात्र कौंटी कोर्टाला उतरती कळाच लागली. त्यां-च्या फौजदारी अंमल त्यांचेकडून काढून राजनियुक्त अधिकारी ह्मणजे एक प्रवासी न्यायाधीश, अथवा हुजुराकडूनच नेमलेले कौंटी जस्टीस, यांचेकडे देण्यांत आला. शायर मंडळीच्या सभासदांचे न्याय संबंधी काम आतां जुरीकडे आलें आहे. तें हळूहळू वाढून हल्लींच्या द-शेस येऊन पोंचलें आहे. आणि ग्रांडजुरीला स्थानिक महत्वाच्या किंवा उपयोगाच्या गोष्टींसंबंधीं विज्ञाप्ति करण्याचा जो हक्क आहे,

तोही, कौंटीला संभूयकारीमंडळी या नात्यानें हुजुरास अर्ज करण्याचा जो पुर्वीं हक्क असे, त्याचेंच रूपांतरानें राहिलेलें शेष कदाचित् असेल. कौंटी-कोर्टाचा दिवाणी अंमल वरिष्ट कोर्टाकडे, किंवा पार्लमेंटसभेच्या कायद्यानें १८४६ सालीं स्थापिलेल्या कौंटीकोर्टाकडे, गेला आहे. या नवीन कौंटीकोर्टाच्या हद्दींचा आणि कौंटीच्या हद्दींचा संबंध नाहीं. आणि त्यांतील न्यायाधीश हुजुराकडूनच नेमलेले बारिस्टर असतात. पूर्वींचें जें कौंटीकोर्ट असे, आणि ज्यांत शेरीफअध्यक्ष असे, त्याच्याकडे काम ह्मणून आतां फारच थोडें राहिलें आहे. पार्लमेंटसभेच्या सभासदांच्या निवडणुकी-संबंधानें कौंटीचे पोटविभाग केले आहेत, ते त्या निवडणुकींच्या संबंधानें निरनिराळे कौंटीच खरोखर आहेत. आणि त्यांतले मिरासदार लोक जे पूर्वीं मतें देणारे असत, त्यांच्या मंडळींत बारा पौंड आकारणीच्या व-हिवाटकरणारांना घुसडून दिल्यामुळें मुळची मंडळी फारच लहान होऊन राहिली आहे. कौंटीचा अपमृत्युपरीक्षक अजून कौंटी कौंटांतच निवडला-जातो. आणि कोणाला जर न्यायरक्षणबहिष्कृत ह्मणून ठरविण्यांत आलें, तर कौंटीकोर्टांत त्या विषयीं जाहीरनामा लागला पाहिजे.

शास्त्रीय नियम ह्मटला ह्मणजे अजून असाच आहे कीं, कायदे करणाऱ्या सभेनें केलेले सर्व नवीन कायदे शेरीफानें कौंटी कोर्टांत जा-हीर करावे. पण या पलिकडे आतां त्या कोर्टाचें काम राहिलें नाहीं. आतां त्या जुन्या कोर्टाचें केवळ नांवच उरलें आहे, असें ह्मटलें तरी चालेल. शास्त्रीय नियमा प्रमाणें अजून ही, एका एकीं दंगा उ-पस्थित झाल्यास, कौंटीच्या सर्व राहिवाशानां, तो दंगा मोडून टाकण्याक-रितां मदत द्यावी, ह्मणून हुकूम करण्याचा शेरिफाला अधिकार आहे. पण व्यवहारांत सार्वजानिक शांतता राखण्या बद्दलची जबाबदारी लॉर्ड लेफ्टेनंट आणि जस्टिस यांचेवर आहे. पासी कमिटेटस ह्मणून लोकसमूह शेरीफाच्या हाताखालीं असे, तो आतां केवळ नामधारी होऊन राहिला आहे. सतराव्या शतकांत सर्व जाहागीर सरंजामें नाहींशीं झालीं. आणि पूर्वीं सैन्याच्या तयारीबद्दल राजनियोग होऊन, कौंटीचे लोकांचा हत्यार बंद समुदाय जो जमत असे, त्याचा आणि अठराव्या शतकांत स्थापिलेल्या कौंटीशिबंदीचा कांहीं संबंध नाहीं. कौंटीच्या न्याय आणी

पोलीस या संबंधाच्या अंमलांबद्दल या मालिकेंतील दुसऱ्या ग्रंथांत निरूपण केलें आहे. त्यांचे कारभार संबंधाचे अधिकार आणि कर्तव्यें यांबद्दल मात्र येथें उल्लेख केला आहे. कौंटीचीं कारभारसंबंधीं कर्तव्यें ट्यूडरराजांच्या कारकीर्दीपासून आजदिवस तागायत झालेल्या कायद्यांत दाखल झालेलीं आहेत. हीं कर्तव्यें बजावण्याचें काम जुन्या कौंटीकोर्टाकडे सोंपलेलें नाहीं. कौंटींतील जस्टिसांच्या तिमाही अथवा विशेष सभेकडे आहे. कौंटीचे पेटीसेशन संबंधी विभाग केलेले आहेत. आणि विशेष सभा ह्मणजे केवळ विशेष कामाकरितां भरलेली पेटीसेशन सभाच ह्मणावयाची. हल्लीं कौंटीचे दिवाणी कामाकरितां अंमलदार आहेत ते येणेंप्रमाणें:—लॉर्ड लेफ्टेनंट आणि दप्तर राखणारा, जस्टिस आणि त्यांचा कारकून, शेरीफ, अपमृत्युपरीक्षक, कौंटीचा पृथक्कृति करणारा, कौंटीचा सर्वेयर, आणि कौंटीचे पोलीस.

लॉर्ड लेफ्टेनंटाचा हुद्दा आठव्या हेन्रीच्या कारकीर्दींत उत्पन्न झाला. त्याची नेमणूक हुजुराकडून विशेष सनदे अन्वयें होत असते, आणि तो बहुत करून बडे लोकांपैकीं किंवा दुसऱ्या मोठ्या जमिनदारांपैकींच एकजण असतो. हालमसाहेब ह्मणतात कीं "ह्याचा हुद्दा ह्मणजे जुन्याकाळीं जो स्थानिक अर्ल असे, त्याचाच हुद्दा पुनरुज्जीवित केल्यासारखा समजावा. आणि इतकें खचित आहे कीं, तो अर्लाचा हुद्दा नाहींसा झाल्यापासून शेरीफाचा दर्जा आणि मोठेपणा जो वृद्धिंगत झाला होता, तो हा हुद्दा पुनरुज्जीवित झाल्यापासून बराच कमी झाला. तरी लॉर्ड लेफ्टेनंटाचें काम लष्करी संबंधाचेंच फार आहे, आणि कायद्याचे हुकूम बजाविणारा या नात्यानें जो शेरीफाचा दिवाणी अंमल आहे, त्याला लॉर्ड लेफ्टेनंटाच्या अधिकारापासून कांहीं बाध येत नाहीं." १८७१ सालच्या एका कायद्या अन्वयें लॉर्ड लेफ्टेनंटाचा शिबंदी फौजेवरचा अंमल काढून घेऊन पुनः हुजुराकडेच देण्यांत आला आहे. असो. बहुत करून लॉर्ड लेफ्टेनंटच दप्तर राखणाऱ्याच्या हुद्यावरही असतो. या नात्यानें तो कौंटींतील जस्टिसांचा अध्यक्ष असतो. आणि जस्टिस लोकांचा कारकून, जो सेशनांचाही कारकून असतो, त्याची नेमणूक लॉर्ड लेफ्टेनंट करीत असतो. कौंटी कारभाराच्या संबंधानें त्याचें मुख्य काम जस्टिस ऑव्ह धी पीसच्या हुद्यावर नेम-

ण्यासाठीं लायक लोकांची शिफारस करणें हें होय. असें ह्मणतात कीं, या हुद्यावर आपली नेमणूक करून घेण्याची ज्यांना इच्छा असते, त्यांच्या लायकीचा विचार करतांना, राजकारणीं पक्षपाताचा प्रादुर्भाव मुळींच होत नाहीं असें नाहीं.

शेरीफाचा हुद्दा मुळच्या शायरस्थापनेपासून चालत आला आहे. पूर्वी सांगितलें आहेच कीं, शेरीफ हा निवडलेल्या अधिकाऱ्यांपैकीं असे. पण तिसऱ्या एडवर्डाच्या कारकीर्दींतील एका कायद्यांत असें कलम आहेकीं " कोणत्याही शेरीफानें आपल्या हुद्यावर एक वर्षापेक्षां अधिक मुदत पर्यंत राहूं नये. आणि वर्षाच्या अखेरीस चान्सलर, खजाननीस, आणि एक्सचेकर कोर्टाचे मुख्य न्यायाधीश, यांनीं, क्वीन्सबेंच आणि कामनबेंच कोर्टांचे मुख्य न्यायाधीश हजर असल्यास त्यांच्या साह्यानें, दुसरा मनुष्य त्या हुद्यावर नेमावा, तो त्या बेलिवुइकांतील बऱ्याच जमिनीचा मालक मात्र असला पाहिजे. आणि ही नेमणूक आल्सोल्स दिवसाच्या दुसऱ्या दिवशीं एक्सचेकरकोर्टांत झाली पाहिजे." या कायद्याअन्वयें वरिष्ट कोर्टाचे न्यायाधीश आणि जामदारखान्याचे अधिकारी अजून दरसाल शेरीफ नेमण्यास एकत्र जमत असतात. त्या नेमणुकीचा जो विधि आहे त्याला प्रिकिंग अथवा टोंचणें ह्मणतात. कारण न्यायाधीश मंडळीसमोर लायक लोकांच्या नांवांची यादी ठेविलेली असते, त्या यादींत जे निवडले जातात त्यांच्या नांवावर टांचणीं टोंचून खूण करण्याचा प्रघात आहे. शेरीफ हा बिनपगारी अंमलदार आहे, आणि काम करण्याचें नाकबूल केल्यास तो मोठ्या दंडास पात्र होतो. शेरीफाचा आणि जुन्या कौंटीकोर्टाचा संबंध काय आहे, हें पूर्वींच सांगितलें आहे पार्लमेंटसभेच्या सभासदांच्या निवडणुकींत मतग्राहक तोच असतो; पण त्या कामाविषयीं या ग्रंथांत कांहीं निरूपण कर्तव्य नाहीं. मागें सर्व कैदी लोक त्याच्या स्वाधीन असें समजत असत. पण १८७७ सालीं सर्व तुरुंगाची व्यवस्था ज्या कायद्यानें हुजुराकडे गेली, त्याच कायद्यानें तो अंमल शेरीफाकडून निघाला. प्रवासी न्यायाधीश खेरीज करून, बाकी कौंटींतील रहिवाशांमध्यें याला मुख्य मान आहे. त्याचीं मुख्य कामें ह्मणजे, न्यायाधिशाच्या तैनातीस असणें, जुरीच्या

लोकांस आमंत्रण देणें व हजीर राखणें, आणि वरिष्टकोर्टाचा बजावणीचा अंमलदार या नात्यानें कारभार करणें हीं होत. वरिष्टकोर्टाचे सर्व हुकूमनामे बजाविण्याचें काम शेरीफाकडे आहे. त्याचीं कार्यसाधक या नात्याचीं कामें दुय्यम शेरीफ करीत असतो. पण तीं नीट करण्या बद्दलची जबाबदारी शेरीफावर आहे. ज्या वर्षीं शेरीफ हुद्यावर असतो, त्यावर्षीं त्याला जस्टिस या नात्यानें काम करितां येत नाहीं, यामुळें कौंटी व्यवस्थेच्या संबंधानें त्या हुद्याचें महत्व आतां तादृश राहिलें नाहीं. त्याबद्दलची हकीकत इतिहासदृष्ट्या तपासण्यालायक आहे खरी, पण व्यवहारदृष्ट्या त्यांत आतां कांहीं हाशील नाहीं.

अपमृत्युपरीक्षकाचा हुद्दा फार पुरातन आहे, ह्मणजे प्राचीन काळीं निदान अलफ्रेड राजाच्या कारकीर्दीपर्यंत तर तो आढळतो. त्या हुद्याचे नियम कांहीं अंशीं साधारण कायद्यावरून दिसतात, आणि कांहीं अंशीं १२७९ पासून १८८२ सालापर्यंत एकूणपन्नास कायदे झाले आहेत त्यांवरून कळतात. त्याचें इंग्रजी नांव कॉरोनर, हें कॉरोना ह्मणजे मुकुट यावरून निघालें असावें असें ह्मणतात, कारण तो मुळचा राजनियुक्त अंमलदार असे. पण आलिकडे शेंकडो वर्षें झालीं, कौंटींतले अपमृत्यु परीक्षक निवडलेलेच असतात. आपआपले अपमृत्युपरीक्षक निवडण्याचा जो कौंटींचा हक्क आहे, तो पहिल्या एडवर्डाच्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षांतील कायद्यानें कायम झालेला आहे. ज्या ज्या म्युनिसिपालिट्यांच्या शहरांत क्वार्टरसेशन भरतात, तेथें तेथें तीं शहरेंच आपआपले अपमृत्युपरीक्षक नेमितात हें पूर्वीं सांगितलें आहे. यांशिवाय कांहीं स्वतंत्र देशविभाग आहेत, त्यांतही त्यांचे स्वतंत्र अपमृत्युपरीक्षक असतात. आणि त्यांच्या हद्दींत कौंटींतल्या अपमृत्युपरीक्षकांचा अंमल चालत नाहीं. अशा स्थलीं त्यांची नेमणूक बहुधा मानराच्या मालकाकडून होत असते. पण चेशायरांत एक स्वतंत्र भाग आहे, त्यांत असें ह्मणतात कीं, वंशपरंपरेनें चालत आलेलें एक शिंग आहे, त्याचा जो मालक तोच अपमृत्युपरीक्षक होत असतो. एसेक्समधल्या एका मानरांत कुळेंच अपमृत्युपरीक्षक नेमतात. दुसऱ्या एका स्थळीं धर्माधिकारि मंडळाकडून नेमणूक होत असते. या स्वतंत्र प्रदेशांतील अपमृत्यु

परीक्षकांची संख्या पंचावन्न आहे. कौंटींत अथवा कौंटीच्या पोटविभागांत काम करणारे पाउणे दोनशें अपमृत्युपरीक्षक आहेत. त्यांची सर्व देशभर अगदीं अव्यवस्थित रीतीनें वांटणी झालेली आहे. मिडलसेक्सांत पांचजण आहेत. हंटिंगडनच्या लहानशा कौंटीमध्येंही पांच आहेत. आणि डॉरसेटशायरांत अकरा आहेत. कौंटींतील अपमृत्युपरीक्षकांची जागा खालीं पडली, ह्मणजे कौंटी कोर्टाची भरमजलस भरवून जागेवर नेमणूक करण्याविषयीं पेटीबाग हपीस नांवाच्या सरकारी कचेरींतून शेरीफाकडे हुकूम फर्माविला जातो. त्या निवडणुकींत ज्या कौंटीकरितां अथवा कौंटीच्या पोटविभागाकरितां नेमणूक करावयाची असेल, तेथील दरएक जमिनीच्या मालकाला मत देण्याचा हक्क आहे. कोणीही मत देण्याचा हक्क आहे ह्मणून ह्मटल्यास, त्याला हक्काच्या आधाराबद्दल प्रतिज्ञा घेण्यास सांगतां येतें. हुद्याचें काम जरी न्यायाधिकार संबंधाचें आहे, तथापि कायद्याच्या अभ्यासाच्या संबंधी लायकी असली पाहिजे अशी जरूर नाहीं. इतकेंच अवश्य आहे कीं, दरएक उमेदवाराची कौंटींत मालकीची जमीन असली पाहिजे. भिरासी थडग्यांत हिस्सा असला तरी बस आहे, अशा प्रकारचा ठराव झाला आहे. शेक्सपीयर कवीच्या काळापासून अपमृत्युपरीक्षकांनीं घालून दिलेल्या कायद्याच्या नियमांविषयीं ग्रह रास्त असो अगर नसो, चांगल्या प्रकारचा खचित नाहीं. निवडणुकींत अनेक प्रसंगीं चढाओढ बरीच होते, आणि असें ह्मणतात कीं एखाद्या निवडणुकींत दहादहा बाराबारा हजार पौंड खर्च होतात. एका नवीन कायद्याअन्वयें असें ठरलें आहे कीं, संमतिपरिसंख्यान एका दिवसापेक्षां जास्त वेळपर्यंत चालू राहूं नये. अपमृत्युपरीक्षक हुद्यावर ताहयात राहत असतो. पण दुर्वर्तन अथवा नालायकी करितां लार्ड चान्सलर त्याला बरतर्फ करूं शकतो. एका कौंटीचा अपमृत्यु परीक्षक दुसऱ्या कौंटींत कैदेंत होता, इतकेंच कारण त्याला बरतर्फ करण्यास बस आहे, असा ठराव झाला आहे. कौंटीच्या अपमृत्यु परीक्षकाला पगार असतो. तो पगार त्याच्या आणि जस्टिस यांच्या दरम्यान करारानें ठरतो. दर पांच पांच वर्षांनीं पगारांत फेरबदल करितां येते असें दिसतें. दुखण्यांत, अथवा निरूपायानें गैर हजर

असतांना, दुय्यम नेमण्याविषयीं आतां तजवीज झाली आहे. दुय्यम हा बारिस्टर सालिसिटर अथवा वैद्य असला पाहिजे. अपमृत्युपरीक्षक ह्याच्या नात्यानें जस्टिस असतो. आणि मनुष्यवधाचा ज्याच्याविषयीं संशय असेल, त्याला जुरीनें निकाल सांगायच्या पूर्वीच पकडण्याचा हुकूम देण्या इतका त्याला अधिकार आहे.

पूर्वीं फुटलेल्या गलबतांबद्दल, भूमिनिक्षेपाबद्दल, आणि देवदंडाबद्दल, चौकशी करण्याचें काम अपमृत्युपरीक्षकाकडेच असे. पण हा अंमल हल्लीं प्रचारांत नाहीं. अगदीं अलीकडे असा ठराव झाला आहे कीं, आगलाव्यानें लाविलेल्या आगीबद्दल चौकशी करण्याचा त्याला आतां अधिकार नाहीं. आलिकडे लागलेल्या आगींचा विचार करतां, हा पुरातन अंमल कोणच्या तरी रूपानें पुनः प्रचारांत आणीत नाहींत, ही दिलगिरीची गोष्ट ह्मटली पाहिजे. अपमृत्युपरीक्षकाचें काम हेंच कीं, मरणाचें कारण न कळतां कोणी एकाएकीं मेला असला, किंवा कोणाची हत्या झालेली असली, किंवा कोणी तुरुंगांत मेला असला, तर त्याबद्दल जुरी भरवून प्रेत पाहून चौकशी करावी. चौकशी करतांना अपमृत्युपरीक्षक आणि जुरी या उभयतांनीं प्रेत स्वतः पाहिलें पाहिजे. जुरींत निदान बारा माणसें असलीं पाहिजेत. त्यांनां प्रतिज्ञा देऊन मयताचें मरण कशानें झालें याविषयीं चौकशी करण्यास सांगतात; साक्षीदारांच्या शपथेवर जबान्या होतात; आणि अपमृत्युपरीक्षक शवाची मरणोत्तर परीक्षा करण्याबद्दलचा हुकूम देण्यास, व वैद्यांना साक्षीकरितां बोलावण्यास, मुखत्यार आहे. जुरीचा निर्णय चर्मपटावर लिहून, त्यावर जुरी आणि अपमृत्युपरीक्षक ह्यांच्या सह्या व शिक्के होत असतात. अशा निर्णयावरून कोणा मनुष्यावर मनुष्यवध अथवा खुनाचा गुन्हा ठरल्यास, अपमृत्युपरीक्षक खटला कमिट करतो. आणि ग्रांड जुरीकडून विज्ञप्ति न होतांच, त्या चौकशीवरून त्याचावर चार्ज ठेवितां येतो. पण वस्तुतः सामान्य रीतीप्रमाणें जस्टिस लोकांपुढें स्वतंत्र चौकशी नेहमीं होतच असते. आणि त्या चौकशींत झालेल्या जबान्या, अपमृत्यु परीक्षकाची चौकशी झाली नसल्याप्रमाणेंच, पाठविण्यांत येतात, व

त्यांचा उपयोगही त्याचप्रमाणें होतो. ही दुबार चौकशी झाल्यापासून व्यर्थ मेहनत आणि खर्च फार पडतात हें उघड आहे.

जस्टिस ऑव्ह धी पीस हा हुद्दा तिसऱ्या एडवर्डाच्या कारकीर्दीच्या चवतिसाव्या वर्षांतील कायद्यापासून सुरू झाला. एखाद्या कौंटींत जस्टिस इतके असावे अशी कांहीं इयत्ता ठरविलेली नाहीं. त्यांची नेमणूक सर्व कौंटी करितां ह्मणून असते. पण वस्तुतः, क्वार्टरसेशन सभेचें काम खेरीज करून, ज्या पेटीसेशनाच्या हद्दींत ते राहत असतील तेथेंच ते काम करीत असतात. त्याच्या न्यायाधिकाराची मर्यादा जरी कायद्यानेंच घालून दिलेली आहे, तरी अखेरीस ती सनदेवर अवलंबून असते. आणि इलिझाबेथ राणीच्या वेळीं जी सनद न्यायाधिशांनीं कायम केली, तशीच वास्तविक पाहातां अजूनही चालविली आहे असें ह्मणण्यास चिंता नाहीं. जस्टिस लोकांच्या कारभारासंबंधी अधिकारांचाच काय तो या ग्रंथांत विचार कर्तव्य आहे. ते अधिकार त्यांना अनेक कायद्याअन्वयें प्राप्त झाले आहेत. जस्टिस यांची नेमणूक लॉर्ड लेफटेनंटाच्या शिफारशीवरून हुजुराकडून होत असते. ते ताह्यात हुद्यावर राहतात. पण दुर्वर्तनानिमित्त लॉर्ड चान्सलर त्यांना बरतर्फ करूं शकतो. लायक असण्याला, सालीना शंभर पौंड उत्पन्नाच्या मिळकतीवर कबजासहित मालकीस्वत्व असलें पाहिजे, अथवा निदान दरसाल तीनशें पौंड उत्पन्नाच्या मिळकतीवर सप्रतिबंधस्वत्व असलें पाहिजे, किंवा निदान दरसाल शंभर पौंड वसतिगृहपट्टीची आकारणी असली पाहिजे. कौंटी कोर्टाच्या न्यायाधिशांना मिळकतीसंबंधी लायकीची जरूर नाहीं. जस्टिस लोकांना पगार मिळत नाहीं, आणि ते आपापला अध्यक्ष नेमीत असतात.

जस्टिसांचें मोठें कर्तव्य ह्मटलें ह्मणजे कौंटी पोलिसाचा बंदोबस्त राखणें हें होय. शिपाई किती व अंमलदार किती असावे, या बद्दल ठराव क्वार्टर सेशनांत होतो; मात्र त्याला होम सेक्रेटरीची मंजुरी लागते. हंड्रेडांत मार्गें मोठे कनिष्टेबल ह्मणून असत, त्यांचेच अधिकार चालविणारा जो चीफ कनिष्टेबल त्याची नेमणूक जस्टिस करितात. चीफ कनिष्टेबल, हा सुपरिंटेंडेंट, सार्जंट, आणि शिपाई, यांची नेमणूक करीत असतो. पोलीस फौजेच्या पगाराचा आणि पोषाक खर्चाचा निम्मे हिस्सा हुजूर जाम-

दारखान्यांतून मिळतो. १८८० सालीं कौंटी पोलिसाचा खर्च दहा लक्ष पौंड झाला. खर्च फेडण्याला विशेष पोलीस कर ह्मणून घेत असतात. तो बहुधा कौंटी कराप्रमाणेंच आकारतात व वसूल करितात. कांहीं शहरांकडून, व स्वतंत्र देश विभागांकडून, वर्गणी येत असते. त्यांच्या करितां, व ज्या प्रदेशविशेषीं जास्त पोलिसाची जरूर असेल त्यांच्या करितां, तजवीज केली जाते. क्वार्टर सेशन सभेंत जमलेल्या जस्टिस लोकांनां राजमार्गसंबंधी देशविभाग करण्याचा अधिकार आहे हें सांगितलेंच आहे. १८७८ सालच्या कायद्या अन्वयें आपल्या सडकांची दुरुस्ती ज्यांनीं नीट रीतीनें ठेविली नसेल, अशा राजमार्ग मंडलांस आपलें काम बजावण्याला लावण्याकरितां जस्टिस लोकांना अधिकार मिळाला आहे. यूनियनांतील आकारणी कमिश्यांच्या ठरावांवर अपिलाचा निकालही तेच करितात. कौंटीपुलाची व शायराच्या दिवाणखान्यांची मरामत ठेवणें हें एक विशेष करून त्यांचें कर्तव्य आहे. तुरुंग स्थानिक अधिकाऱ्यांच्या अंमलांतून काढून घेतले आहेत; तरी जस्टिस लोकांच्या कमिटयांना अजून तेथें तपासणी करितां जावें लागतें. दीनोन्मत्ताश्रम चालू राखून त्यांची व्यवस्था ठेवण्याचें कामही जस्टिस लोकांकडेच आहे. तेथील काम पाहणारे ह्मणजे क्वार्टर सेशन सभेनें दरसाल आपल्या मंडळींतील नेमलेले सभासद हेच असतात. तसेंच जनावरांच्या स्पर्शजन्य रोगांबद्दलचे कायदे बजाविण्याच्या कामांत स्थानिक अधिकारी जस्टिसांची कमिटीच असते. या कायद्यांच्या बजावणीवर सामान्य देखरेख राणीसाहेबांचें प्रिवी कौन्सल चालवितें. तसेंच अन्न वनस्पति विक्रीच्या कायद्या अन्वयें पृथक्कृति करणारा, आणि १८३९ सालाच्या एका कायद्या अन्वयें मापवजनांचे पगारी तपासनीस, हेही क्वार्टर सेशन सभाच नेमीत असते. पेटीसेशन सभेंत जस्टिस प्रेक्षकांच्या नेमणुकी करतात, आणि परवाने (लेसन्स) देण्याचें काम करितात. मद्यविक्रीच्या संबंधाचे कायदे फारच भानगडीचे आहेत, आणि तो विषय सर्व रीतीनें अतिशय त्रासदायक आहे. गाण्या नाचण्याबद्दलचे परवानें, आणि नाटकगृहें, हीं ही जस्टिस लोकांच्याच देखरेखी खालीं असतात.

कौंटीचा साधारण खर्च कौंटी करांतून देतात. मि. आर एस. राइटसाहेब ह्मणतात कीं "कौंटीकर हा कांहीं प्रत्येक मिळकतीवर बसवि-

लेला कर नाहीं, तर कौंटींतल्या सर्व पारिशांवर बसविलेला आहे. कार्टरसेशनाची एक कमिटी दरएक पारिशांची कराच्या संबंधानें निवळ आकारणी चौकशी अंतीं कायम करते, आणि मग जी रकम पाहिजे आहे तिची त्या मानानें वांटणी करते. ज्या यूनियनांत एक एक पारिश असतो, तेथील गार्डियनांकडे त्या त्या पारिशाबद्दलची मागणी जाते. गार्डियन कौंटीच्या खजानानिसाकडे ती रकम भरतात, आणि मग पारिशांच्या प्रेक्षकांकडून वसूल करितात. प्रेक्षक तितकी रकम दीनार्थ कर-बसवून पारिशांतून जमा करितात." १८८० सालांत एकंदर कौंटीचा खर्च साडेसत्तावीस लक्ष पौंडांपेक्षां किंचित् जास्त होता, ह्मणजे एकंदर स्थानिक खर्चांत शेंकडा पांच असें प्रमाण झालें. हुजूर जामदारखान्याकडील वर्गणी एकंदर पांच लक्ष पौंडांपेक्षां कांहीं जास्त होती, तेव्हां सुमारें वीस लक्ष पौंड कौंटी कराच्या योगानें वसूल करावे लागले.

## भाग ७ वा.

सार्वजनिकारोग्य या शब्दाचा व्यापक अर्थ घेतला, तर त्या संबंधानें, राजधानी खेरीज करून, बाकी सर्व इंग्लंड देशाचे आरोग्यसंबंधी देशाविभाग नामक प्रदेश ठरविलेले आहेत. आरोग्यसंबंधी देशविभाग, जानपद अथवा पौर असे असतात. दीनार्थकायद्यासंबंधी जीं यूनियनें आहेत, त्यांच्या ज्या हद्दी त्याच जानपद देशविभागांच्या हद्दी, आणि गार्डियन हेच त्या विभागांतले अधिकारी. आरोग्यसंबंधी पौर विभाग हे त्याच जानपद विभागांतून लोकसंख्येच्या मानानें निराळे काढिलेले असतात. पौरदेशविभागांतील आरोग्यसंबंधी अधिकारी ह्मणजे म्युनिसिपालिटीच्या शहरांतील टौन कौन्सल, किंवा सुधारणुकेसंबंधी प्रदेशांतील सुधारणाधिकारी, किंवा स्थानिक अधिकारिमंडल, हे असतात. उदाहरणार्थ किंगस्टन यूनियन घ्या. त्यांत एक म्युनिसिपालिटीचें शहर आहे, एक सुधारणुकेसंबंधी देशविभाग, आणि सहा स्थानिक अधिकारि मंडलाचे देशविभाग; आणि हीं सर्व यूनियनांत निरनिराळ्या ठिकाणीं पसरलेलीं आहेत. वर सांगितलेल्या आरोग्यसंबंधी पौर देशविभागांत ज्या ज्या यूनियनांतल्या प्रदेशाचा समावेश होत नाहीं तो प्रदेश गार्डियनांच्या आरोग्यसंबंधी अंमलांत येतो. येणेंकरून दरएक घर दोहोंपैकीं

एका प्रकारच्या आरोग्यसंबंधी अधिकाऱ्यांच्या अंमलाखालीं असतें. आरोग्य-संबंधी पौर देशविभागाच्या हद्दीचा आणि पारिशाच्या अथवा दुसऱ्या कोणत्याही स्थानिक व्यवस्थेसंबंधी देशविभागाच्या हद्दींचा मुळीच संबंध नाहीं. एकंदर आरोग्यसंबंधी पौर देशविभाग एकहजार सहा आहेत. आणि सर्व शहरवासी लोकांची संख्या साडेसतरा कोटि आहे.

हे इंग्लंड देशाचे विभाग १८७२ सालीं झाले. व्यवस्थित रीतीनें आरोग्य संबंधी कायदे करण्याचें काम इंग्लंड देशांत फार दिवस प्रचारांत आहे असें नाहीं. किंबहुना १८४८ सालच्या सार्वजनिकारोग्य संबंधी कायद्यापासून त्याची सुरुवात झाली, असें ह्मटलें तरी चालेल. याचें कारण शोधायाला फार दूर जावयास नको. एक तरी, लोकसंख्येचा प्रसार फार झाल्यानें, आणि मोठमोठीं शहरें फार जलदीनें वाढल्यामुळें, आलिकडेच काय ती आरोग्य संबंधीं कायद्याची जरूर फार दिसूं लागली. दुसरें हें कीं, सार्वजनिकारोग्यशास्त्र अजूनही बाल्यावस्थेंतच आहे. त्यांतील नियम अद्यापि ठोकताळ्याचेच आहेत. आणि ते नियम खरे आहेत, हें देखील लोक जें कबूल करूं लागले आहेत, तें अगदीं आलिकडे. आतां मात्र रोगांची सांथ आली, तर एखाद्या कोपलेल्या देवानें सोडलेल्या बाणांचा वर्षाव होत आहे असें कोणी समजत नाहीं. कांहीं आरोग्य संबंधीं तजविजी विषयीं हयगय केल्यापासून, किंवा आरोग्य संबंधी नियमाचा भंग केल्यापासून, ती उत्पन्न झाली इतकें आतां समजतात. तरी स्पर्श-जन्य किंवा सांक्रामिक रोगांच्या स्वरूपाविषयीं आणि कारणाविषयीं आपल्याला अजून खचित ह्मणून कांहींच माहित नाहीं. कांहीं लोकांच्यामतें सर्व संक्रमणशील रोग सजीव अंकूर, अथवा कांटेजियम् व्हैव्हम्, यापासून उद्भवतात. कांहीं डाक्तर रिचर्डसन साहेबा सारिखे आहेत, त्यांचें ह्मणणें कीं असे रोग निर्जीव पदार्थांपासूनच उत्पन्न होतात. तें कसेंही असो. इतकें खचित आहे कीं, दुखणाईत मनुष्याच्या शरीरापासून सूक्ष्म परमाणु निघून धडधाकट मनुष्याच्या देहास लागतात, आणि त्या योगें तेथें तशाच प्रकारच्या रोगाचें बीजारोपण होऊन, तो रोग पुढें त्या रीतीनें आणखी पसरत जाऊं शकतो. आपल्याला अनुभवावरून असें ही दिसून येतें कीं, दुखणाईत लोकांना अलग ठेवून त्यांच्या वस्त्रांतील रोगबीज

नष्ट केलें असतां रोग प्रसार पुरतेपणी बंद करितां येतो. साधारण स्पर्शजन्य आणि सांक्रामिक रोग (ह्मणजे कांहीं प्रकारचे ज्वर, व गळ्या कडील व्यथा वगैरे) हे आपोआप कधींतरी नवीन उत्पन्न होतात, कीं साक्षात् अथवा परंपरया रोग्याकडून आरोग्यवंताकडे संक्रमण पावल्यावांचून कधींच उत्पन्न होत नाहींत, या मुद्याविषयीं शास्त्रज्ञ मंडळींत वाद आहे. पण इतकें आपणाला खचित ठाऊक आहे कीं, अशा रोगाचें बहुतकरून संक्रमण हेंच कारण आहे; आणि तें न होण्याविषयीं योग्य बंदोबस्त केला, तर तुरळक तुरळक रोगाच्या प्रादुर्भावापासून फारशी धास्ती बाळगण्यास नको. शिवाय आपल्याला हेंही माहित आहेच कीं, स्वच्छ हवा आणि पाणी हीं आरोग्याचीं आवश्यक कारणें आहेत; आणि दूषित हवा आणि पाणि यांच्या मागून सांसर्गिक रोग नेमानें ठेविलेलेच आहेत. नळांतील वायु हा टैफाइड ज्वरास कारणीभूत असो किंवा नसो, पण जरी तो स्वतःच कारणीभूत नसला, तरी त्या रोगाचें जें विष आहे तें बरोबर वाहून नेण्याला हा वायु फारच साधनीभूत असतो हें उघड आहे. तेव्हां नळांतील वायु आपल्या घरांतून न येऊं देण्याविषयीं तजवीज करणें फार जरूरीचें काम आहे. टैफाइडज्वराच्या विषाचा पाण्यांत प्रसार कोठपर्यंत होईल याची मुळींच मर्यादा नाहीं असें दिसतें. एक दोन वर्षांवर काटर्हम येथें एकाप्रकारच्या ज्वराची सांथ आली होती, त्यांत शेकडों माणसें सांपडलीं, आणि अनेक मरून गेलीं. याविषयीं स्थानिक व्यवस्था मंडलाच्या हुकुमावरून स्थानिक चौकशी झाली, तेव्हां डाक्तर थार्न थार्न यांनीं उत्कृष्ठ रीतीनें जी तपासणी केली, तीवरून समर्पक रीतीनें असें दिसून आलें कीं, पाण्याचा पुरवठा एका मनुष्याच्या ज्वरापासून नजरचुकीनें दूषित झाल्यामुळें ती सांथ उद्भवली. कांहीं प्रकारचे ज्वर व गळव्यथा यांच्या विषांचें संक्रमण करण्याची दुधामध्यें विलक्षण शक्ति आहे असें सिद्ध झालें आहे. सजीव पदार्थ अथवा वनस्पति कुजत असणें, किंवा मनुष्यांची अतिशय गर्दी होणें, हीं रोग पसरण्याचीं फारच मोठीं साधनें आहेत. या रीतीनें जरी वास्तविक कारणांविषयीं आपलें ज्ञान फारच अपूर्ण आहे, तरी आतां आपल्याला आरोग्य आणि रोग यांच्या कारणांबद्दलची माहिती कामा पुरती आहे,

ह्मणजे तिच्यावरून कायदे व इतर तजविजी करण्यास बस होतील असे तांत्रिक सिद्धांत करितां येतात. आलिकडील सार्वजनिकारोग्यसंबंधी कायद्यांनीं काळज्वराचा तर समूळ नाश केल्यासारखा आहे. आणि त्या ज्वरापासून दरसाल हजारो लोक मागें मरून जात असत. देवी काढण्याची जबरी होऊं लागल्या पासून देवीच्या रोगाचा, समूळ नाश जरी नाहीं तरी, बऱ्याचअंशीं कमी प्रसार झाला आहे. आणि आलिकडील आरोग्यसंबंधी कायद्यांच्या योगानें,लोकांची साधारण आरोग्यसंबंधी स्थिति बरीच सुधारत असून, आयुष्यमर्यादेविषयीं आशा वाढण्यास कारण झालें आहे. १८४१ पासून१८९१ सालापर्यंत हजारांत २२.२३ लोक मरत असत. पण १८७१ पासून १८८१ पर्यंत हजारा मागें २१.२७ मात्र मरण पावले. ह्या रीतीनें मृत्युमान कमी झालें. हें लहानसान काम नव्हे. याचा अर्थ असा आहे कीं, पूर्वींच्या मानाप्रमाणें जे तीन लक्ष लोक जास्त मेले असते ते हल्लीं जिवंत राहिले आहेत. असें जरी आहे, तरी अद्यापि कर्तव्य ह्मणून पुष्कळच उरलें आहे. प्रत्येक व्यक्तीच्यानें कर्तव्याच्या मानानें कांहीं होऊं शकत नाहीं. सार्वजनिकारोग्याच्या बाबतींत, संपानें केलेलें काम आणि कायद्याची जबरदस्ती, यांच्या योगानेंच काय तो हेतु सिद्धीस जाणार आहे. १८८१सालीं स्कार्लेट फीवर नामक रोगापासून सव्वीस हजार मनुष्यें, आणि एंटेरिक फीवर पासून आठ हजार मेलीं. देवीनें पांच हजार बळी घेतले. ही मेलेल्यांची संख्या झाली. शिवाय ज्यांना फक्त दुखापती झाल्या, व जे लुले पडले, त्यांची याद आपल्याकडे नाहीं. तरी फक्त या संख्यांचा अंमळ विचार केला असतां देखील मानुषयातना आणि द्रव्यहानि यांत किती होऊन गेली हें दिसून येईल. आणि या यातना आणि हानींचा बराच अंश, सार्वजनिकारोग्यासंबंधी योग्य तजविजी केल्या असतां, टळला असता असा विचार मनांत आला ह्मणजे फारच वाईट वाटतें. रोगग्रस्त आणि दाट भरलेलीं घरें, आणि गुन्हे, यांचा कार्यकारण संबंध पुष्कळांनीं दाखवून दिला आहे; त्यांत लार्ड शाफ्टसबरी हे अग्रगण्य आहेत. देहास अपायकारक गोष्टींचा सभोंवती गराडा असल्यामुळें शक्तिहानि किती होते, आणि काम करण्याची ताकद किती कमी होते, हें जरी आपल्याला हल्लीं कळलेलें नाहीं, तरी पुष्कळ होते

या विषयीं शंका घेण्याला जागा नाहीं. तेव्हां आरोग्य संबंधी अमंलदारांकडील कामगिरीचें महत्व दाखविण्यास या उपर कांहीं लिहिणें नलगे. पण त्यांचे हल्लींचे अधिकार व कारभार करण्याची रीति यांचें विवेचन करण्यापूर्वी, या संबंधाच्या कायद्यांचा संक्षिप्त इतिहास येथें दिला पाहिजे.

आरोग्यापायकारक परसंपीडनाबद्दल साधारण इंग्रजी कायद्याप्रमाणें फौजदारी फिर्याद चालते. उदाहरण, जर कोणी शेजाऱ्यापाजाऱ्यांनां उपद्रव होईल अशा रीतीनें आपल्या जमिनीवर घाण जमा होऊं देईल, तर त्याच्यावर फौजदारी फिर्याद चालते. सांप्रतकाळीं प्रचारांतून गेलेलीं कोर्ट-लीट नामें जीं कोर्टें असत, तीं या आरोग्यसंबंधी कामांत नियमन करीत असत असें दिसतें. एक गोष्ट येथें सांगण्यासारखी आहे ती ही कीं, शेक्सपीयरच्या बापाला १५५२सालीं मानराच्या कायदे कानूंचा भंग करून राजरस्त्यावर घाण टाकल्याबद्दल, आणि १५५८ सालीं नळ साफ न ठेविल्याबद्दल, दंड झाला होता असें स्ट्राटफर्डच्या दफ्तरांत आढळतें. असो. साधारण इंग्रजी कायद्याप्रमाणें व्यक्तिव्यक्तीला शिक्षा करण्याखेरीज दुसरा इलाज नाहीं. उपद्रव टाळणें किंवा निरसन करणें या कामांत त्याचा कांहीं संबंध नाहीं. नगरें आणि शहरें यांत मनुष्यें फार एकत्र जमा झाल्यापासून ज्या आरोग्यापायकारक गोष्टी नेमानें उत्पन्न होतात, आणि ज्यां पुढें व्यक्तिव्यक्तींचा उपाय खुंटतो, त्याबद्दल इंग्रजी साधारण कायद्याप्रमाणें तजवीज व बंदोबस्त करतां येत नाहीं. त्यांत कायदे करणाऱ्या मंडळीची मदत आवश्यक आहे. आणि या आरोग्यशास्त्राच्या संबंधाचे जे भानगडीचे विषय आहेत, त्यांत मोठ्या कर्तबगारीचा विनियोग करण्यास स्थलें हावीं तितकीं आहेत यांत कांहीं संशय नाहीं.

१८६९सालीं आरोग्यसंबंधी एक राजनियुक्त कमिशन नेमिलें होतें, त्यांनीं सार्वजनिकारोग्यासंबंधी कायद्यांचा अथपासून इतिपर्यंत वृत्तांत दिलेला आहे. पहिला कायदा १३८८ सालचा आहे, आणि त्यांत जो कोणी जनावरांचा मल अथवा हेंदर खाड्यांत किंवा नद्यांत टाकील त्याला वीस पौंड दंड होईल असें ठरविलें आहे. आठव्या हेन्रीच्या कारकीर्दींत नळासंबंधी कायदा झाला, त्यांत लार्ड चान्सलर आणि लार्ड ट्रेझ्यरर या अमंलदारांच्या मर्जीस येईल तेव्हां नळ तपासनीस नेमण्याचा त्यांना अधिकार दिला आहे. त्या

तपासनिसांचीं कामें कायद्यांत लिहिलीं आहेत, त्यांत नद्या व सार्वजानिक ओढे आणि खड्डे साफ करणें हें येतें. सतराव्या शतकांत मरीसंबंधी विशेष कायदे करण्यांत आले होते. दुसऱ्या जार्ज राजाच्या कारकीर्दींत मोठीं आणि सधन शहरें, आपआपल्या हितासाठीं योजना करण्याकरितां, पार्लमेंट सभेला विशेष कायदे करण्यास्तव अर्ज करूं लागलीं. आणि तेव्हांपासून आजपर्यंत दाट वस्तीच्या शहरांनां स्थानिक व्यवस्थेचा अधिकार द्यावा ह्मणून पुष्कळ कायदे करण्यांत आले आहेत. पहिल्या पहिल्यानें त्या त्या प्रदेशांत रस्त्यांची फरसबंदी, दिवेबत्ती, झाडलोट वगैरे सुधारणा करणें, यांवर कायद्यांची विशेष दृष्टि असे. पण पुढें पुढें आरोग्यसंबंधी नियमांचें महत्व मान्य होऊन त्या बद्दल कलमें कायद्यांत येऊं लागलीं.

१८३२ सालीं गस्त व दिवेबत्तीबद्दल जो कायदा मंजूर झाला, त्यांत अधिक व्यापक कायदे करण्याच्या कामांत एक पाउल पुढें पडलें. पारिशांमधील गस्त व दिवेबत्तीबद्दल त्या कायद्यांत कलमें होतीं. व मक्त्यानें कामें करविण्यास मुखत्यार असे चौकसनीस कर भरणारांनीं नेमावे, व पाणी ग्यासवाल्यूंनीं दूषित करण्याबद्दल दंड करावा, असें त्यांत ठराव होते. तो कायदा फक्त अनुज्ञापक होता. तो लागू करण्याकरितां वेस्ट्री मंडळीची योग्य रीतीनें सभा भरून ठराव झाला, ह्मणजे तो अंमलांत येई. हल्लीं आरोग्य संबंधी पौर देशविभागांत न येणारे असे १०४ पारिश त्या कायद्याच्या अंमलाखालीं कांहीं अंशीं आहेत. १८४७ सालीं निरनिराळ्या सार्वजनिक कार्यांकरितां केलेल्या स्थानिक कायद्यांत जीं कलमें हमेष घालावीं लागत, तीं सर्व व्यापक करावीं व एकत्र गोळा करावी ह्या हेतूनें शहर सुधारणा, शहरपोलीस, पाण्याच्या पुरवठ्याचे कारखाने, दिव्याच्या ग्यासाचे कारखाने, यासंबंधी कलमांचे, व तसेच दुसरे, कायदे करण्यांत आले. त्यांचा इरादा हा कीं, या विषयांबद्दल एकदा नमुन्याची कलमें तयार करून ठेवावीं, ह्मणजे तीं दरएक स्थानिक कायद्यांत हवाला देऊन सामील करण्यास ठीक पडावें. कांहीं थोडी खेरीज करून, बाकीचीं त्यांतील सर्व कलमें त्यानंतर झालेल्या स्थानिक कायद्यांत सामील केली आहेत.

अजूनही सुधारणार्थ कायद्यासंबंधी देशविभाग सुमारें पन्नास राहिलेले आहेत.

१८४८ सालीं मोठा आणि व्यापक असा पहिला कायदा करण्यांत आला, तो आमची सार्वजनिकारोग्यसंबंधी कायदेरूपी जी इमारत तिचा पायाच ह्मटला असतां चालेल. त्या कायद्याचें नांव सार्वजनिकारोग्यसंबंधी कायदा. तो लंडन राजधानीस लागू केला नव्हता. पण त्याचा अंमल मुख्यत्वेंकरून दुसऱ्या दाट वस्तीच्या मोठ्या शहरांत व्हावा असा मुळचा इरादा होता. त्या कायद्याअन्वयें एक साधारण आरोग्याधिकारी मंडल स्थापन करण्यांत आलें, त्याचे सभासद हुजूराकडूनच नेमीत असत. त्या मंडलास कायदा चोहोंकडे अंमलांत आणण्याकरितां प्रेक्षक नेमण्याचा अधिकार दिला होता. साधारण आरोग्याधिकारी मंडलाला राणी साहेबांच्या प्रिवी कौन्सलाकडील हुकुमाच्या योगानें स्थानिक आरोग्याधिकारी मंडलें स्थापण्याचा अधिकार होता. ज्या स्थलीं मृत्यूचें मान अतिशयच वाढलें असेल, तेथें आरोग्याधिकारी मंडलाला आपणच होऊन तजवीज करण्याची मोकळीक होती. पण सामान्य प्रसंगीं तसें करण्यास कर भरणारांकडून अर्ज येणें आवश्यक होतें. म्युनिसिपालिटीच्या शहरांत टौन कौन्सलच स्थानिक मंडलाचें काम चालवीत असे. इतर ठिकाणीं अधिकारी मंडल कर भरणारे लोकांकडून निवडलें जातअसे; कांहीं निर्दिष्ट अधिकार सर्व स्थानिक मंडलाला दिले होते. आणि साधारण आरोग्याधिकारी मंडलाला स्थानिक कायद्यांत प्रसंगोपात्त हुकूम करून फेरफार करण्याचाही अधिकार होता. नळ, गटर, व विहीरी, पाणि आणि ग्यास यांचे कारखाने, केरकचरा ठेवण्याच्या जागा, शौचकूप, आणि कसाईखाने, बांधणें व त्यांची व्यवस्था राखणें; पीडाकारक धंद्याचें नियमन करणें, परपीडन काढून टाकणें, पाण्याच्या पुरवठ्याचे कारखानें दूषित न होऊं देणें, गल्ल्यांत फरसबंदी करून यांचा बंदोबस्त ठेवणें, वसतिगृहें व साधारण बिऱ्हाडाच्या चाळी यांची व्यवस्था ठेवणें, प्रेतनिधानाच्या आणि कर्मणुकेच्या स्थलांची योजना करणें, आणि सार्वजनिक हमामखान्यांस पाण्याचा पुरवठा करणें, इतक्या कामांबद्दल स्थानिक मंडलांनां विशेषेकरून अधिकार

दिले होते. १८४८ आणि १८७५ या वर्षांच्या दरम्यान सुमारें तीस कायदे १८४८ सालचा कायदा दुरुस्त करण्यासाठीं आणि अधिक व्यापक करण्यासाठीं मंजूर झाले, पण त्यांपैकीं तीन कायद्यांबद्दल विशेष उल्लेख बस आहे. १८५८ सालच्या स्थानिक व्यवस्थेच्या कायद्यावरून कोणत्याही स्थलाच्या हद्दी कायम असल्या, तर तेथील कर भरणारांनांच ठराव करून, आरोग्याधिकारी मंडलाच्या मध्यस्थी वांचून, स्थानिक मंडल स्थापण्याचा अधिकार दिला आहे. तें मंडल पुढें नाहींसेंच झालें, आणि त्यांचे अधिकार होम सेक्रेटरीच्या खात्याला आणि प्रिवीकौन्सलाला वाटून दिले. १८७१ सालीं त्या दोन खात्यांचे सार्वजानिक आरोग्य संबंधी अधिकार तेव्हां नवीन स्थापिलेल्या स्थानिक व्यवस्था मंडलाकडे गेले. १८७२ सालच्या सार्वजानिक आरोग्य संबंधी कायद्यानें, सर्व देशाचे पौर आणि जानपद असे सार्वजानिक आरोग्याच्या संबंधानें दोन प्रकारचे विभाग केले. आणि जानपद विभागांत सार्वजानिक आरोग्या संबंधी अधिकार गार्डियन यांस दिले. त्या वेळेपर्यंत परसंपीडन काढून टाकण्याबद्दलचे निरनिराळ्या कायद्या अन्वयें दिलेले अधिकार खेड्या पाड्यांत गार्डियनच चालवीत असत. पण तेथील नळ वगैरेचा तपास वेस्ट्री मंडळ्या राखीत असत. आणि त्या नात्यानें दुसरे ही कांहीं आरोग्य संबंधी अधिकार वेस्ट्रीमंडळ्यांसच दिले होते.

१८७५ सालच्या सार्वजानिक आरोग्य संबंधी कायद्यांत, १८४८ सालचा कायदा, आणि तो दुरुस्त करण्याकरितां मंजूर झालेले दुसरे एकुण तीस कायदे, असे सर्व रद्द करून त्यांतील नियम समजण्यास सुलभ अशा रूपानें पुनः ठरविण्यांत आले. तो कायदा राजधानींत लागू नाहीं, पण इंग्लंड देशांतल्या इतर भागांतील आरोग्य संबंधी सर्व नियमसमूह त्यांत येऊन गेला आहे. तो दुरुस्त करण्याकरितां दोन लहानसे कायदे झाले आहेत. एक १८७८ सालीं खेड्यापाड्यांतील पाण्याच्या पुरवठ्या बद्दल, आणि एक १८७९ सालीं प्रेतानिधानस्थलां बद्दल. पण ह्या खेरीज सार्वजानिक आरोग्या संबंधी कायद्याचे साधारण नियम सर्व १८७५ सालच्या कायद्यांत आलेले आहेत.

आतां १८७५ सालच्या कायद्यांत ठरविलेली आरोग्य संबंधी अ-

धिकारी मंडलाची घटना, त्यांचीं कर्तव्यकर्मैं, आणि त्यांचा अंमल, यांचें निरूपण केलें पाहिजे. शहरांतील टौनकौन्सल, किंवा सुधारणेच्या कायद्या संबंधी केलेल्या देशविभागांतील सुधारणाधिकारी, हेच कांहीं ठिकाणीं आरोग्य संबंधी कामही पाहत असतात. त्यांचे विषयीं येथें कांहीं लिहिण्याची जरूर नाहीं. टौनकौन्सलाची घटना १८८२ सालच्या म्युनिसिपालिट्यांच्या कायद्यांत, आणि सुधारणाधिकारी मंडलाची त्यांच्या त्यांच्या विशेष कायद्यांत,कायम केलेली आहे. आणि जे अंमल व जीं कर्तव्यें हुद्याच्या नात्यानें त्यांच्याकडे आहेत,त्यांशिवाय सामान्य स्थानिक मंडलाचे अंमल आणि त्यांचीं कर्तव्यें ही त्यांना प्राप्त होतात. इतका उपोद्घात करून, स्थानिकमंडलांत सर्व आरोग्य संबंधी पौरविभागाधिकाऱ्यांचें साधारण स्वरूप दिसून येतें ह्मणून आतां त्याच्याविषयीं विवेचन करूं.

स्थानिक मंडलाची स्थापना झाली, ह्मणजे तें संभूयकारी मंडल होऊन त्याला समुदायवाचक नांव प्राप्त होतें; आणि त्या नांवानें त्याला फिर्याद करितां येते, व त्याच्यावर फिर्यादी होतात. शिवाय, त्याला निरंतर स्वत्वानुवृत्तीचा हक्क, आणि जमिनी अन्यादेयभोगाच्या अटीनें घेण्याचा हक्क मिळतो. त्यांचा एक साधारण शिक्का असतो. कांहीं प्रसंगीं स्थानिकव्यवस्थामंडलाला प्रासंगिक हुकुमानें तें मंडल मोडण्याचा अधिकार आहे. तसेंच प्रासंगिक हुकुमानें स्थानिकव्यवस्थामंडलाला स्थानिक मंडलाच्या अंमलांतील प्रदेशाच्या हद्दीही फिरवितां येतात.

स्थानिक मंडल दोन रीतीनें स्थापितां येतें. एक रीति अशी कीं, एखादा जानपद देशविभाग अथवा त्यांतील अंश स्थानिक व्यवस्थे करितां केलेला देशविभाग असावा, असें स्थानिक व्यवस्थामंडलाला प्रासंगिक हुकुमानें ठरवितां येतें; आणि असें झालें, ह्मणजे कायद्याप्रमाणें निवडलेल्या स्थानिक मंडलाच्या अंमलांत तो प्रदेश येतो. दुसरी रीत अशी कीं, एखाद्या ठिकाणच्या हद्दी कायम असून, तेथील जमीनदार व कर भरणारे यांनीं त्या ठिकाणीं स्थानिक मंडल असावें हें इष्ट आहे असा ठराव नियमित विधीप्रमाणें करावा, ह्मणजे स्थानिकव्यवस्थामंडलाला दफ्तरी हुकुमानें तें ठिकाण आरोग्य संबंधी पौर देशविभाग ह्मणून स्थापून, मग स्थानिक मंडल निवडण्याविषयीं हुकूम देतां येतो. या प्रमाणें नवीन

आरोग्य संबंधी देशविभागाची स्थापना झाली, ह्मणजे स्थानिक व्यवस्था मंडल त्याच्या हद्दी कायम करितें; त्यांत पोटविभाग असावे किंवा नसावे याचा निर्णय करितें; स्थानिक मंडल किती सभासद मिळून व्हावें याबद्दल ठराव करितें; आणि पहिल्या निवडणुकींबद्दल नियम घालून देतें. या रीतीनें हुजुराकडून एकदां व्यवस्था सुरू झाली, ह्मणजे मग निवडणूक कायद्यांतील नियमांस अनुसरून होते. संमति देण्याचा हक्क जमीनदार व कर भरणारे यांस आहे. शहरांत न राहणाऱ्या जमीनदारांच्या मिळकतीला स्थानिक मंडलाच्या कारभारामुळें अपाय होण्याचा संभव आहे, हें उघडच आहे. तेव्हां तशा लोकांनां देखील आपला अभिप्राय देण्यास सवड मिळावी, ह्मणून त्यांना दुसऱ्याच्या मार्फत आपलें मत देण्याची मोकळीक ठेविली आहे. कोणी जमीनदारास मत द्यावयाचें असलें, अथवा आपल्या तर्फेचा मनुष्य नेमावयाचा असला, तर त्यानें त्याबद्दल मंजुरी मिळविण्याकरितां मागणें केलें पाहिजे. मालक व प्रतिनिधि यांची याद ठेवण्याविषयीं हुकूम आहे. मालक रहिवासी असल्यास त्याला मालक आणि वहिवाटदार कर भरणारा अशा दोन्हीं नात्यांनीं मत देण्याचा अधिकार आहे. अनेक संमतींचा शिरस्ता आहे. मिळकतीची करा बद्दलची आकारणी असेल त्याप्रमानानें एक पासून सहा पर्यंत संमति देण्याचा दरएक मालकास व कर भरणारास हक्क आहे. यामुळें, व दोन नात्यांनीं वर लिहिल्याप्रमाणें मतें देतां येतात ह्मणून, एकाच मनुष्याला, पुरे इतकी मिळकत असली तर, बारा संमति देण्याचा हक्क पोंहोंचूं शकतो. संभूयकारी मंडळ्या जरी कर भरतात तरी त्यांना संमति देण्याचा अधिकार नाहीं.

स्थानिक मंडलाचा सभासद होण्यास, कोणताहि मनुष्य मंडलाच्या देशविभागांत अथवा विभागापासून सात मैलांच्या आंत राहणारा असला पाहिजे. शिवाय मिळकतीसंबंधी देखील लायकी असली पाहिजे. या लायकीबद्दल त्या त्या देशविभागांतील लोकसंख्येप्रमाणें नियम निरनिराळे असतात. एखाद्या देशविभागांत २०,००० पेक्षां लोकसंख्या कमी असली, तर लायक होण्यास पांचशें पौंडाची मिळकत असणें, अथवा पंधरा पौंड कर भरणें, हीं जरूर आहेत. २०,००० पेक्षां जास्त लोकसंख्या

असली, तर एक हजार पौंडांची मिळकत, अथवा तीस पौंड कर भरले पाहिजेत. कोणी मनुष्य नादार झालेला असला, तर तो नालायक होतो. स्थानिक मंडलाचे सभासद तीन वर्षेंपर्यंत कामावर राहतात. पैकीं एक तृतीयांश पाळी पाळीनें काम सोडतात, पण काम सोडणाऱ्या सभासदांस पुन: नेमितां येतें. सभासदांकडूनच अध्यक्षाची नेमणूक होते, आणि त्यांनां पगारबिगार कांहीं मिळत नाहीं. मंडलाचा अध्यक्ष निवडणुकींत संमतिग्राहक असतो. दर वर्षांत १९ एप्रिलच्या पूर्वी सर्व निवडणूक आटपेल अशी त्याला तजवीज करावी लागते. त्याचप्रमाणें मालक व प्रतिनिधि यांच्या नांवनिशीचा तपास करण्याचा अधिकारही त्याच्याकडे आहे.

उमेदवारांच्या नांवांची सूचना लेखी झाली पाहिजे. जागा जितक्या असतील त्यांपेक्षां उमेदवारांची संख्या जर जास्त असली, तर संमति पत्रिकांचा उपयोग करण्यांत येतो. सर्व प्रदेशांतील ज्या ज्या मनुष्यांनां संमति देण्याचा हक्क असेल, त्यांच्या पत्त्यावर संमतिपत्रिका पाठविल्या जातात. त्यानंतर तीन दिवसांनीं, नेमलेले अंमलदार त्या पत्रिका मागून घेऊन संमतिग्राहकांकडे देतात, आणि तो त्यांची गणती करून निकाल जाहीर करितो. गणती होत असतांनां उमेदवारांनां हजर असण्याची मोकळीक आहे. वाद उत्पन्न झाल्यास त्याचा निर्णय करण्याकरितां विशेष तजवीज केलेली नाहीं; तेव्हां निकालाबद्दल हरकत घेणें असेल तर न्यायाच्या कोर्टांकडेच गेले पाहिजे. संमति ग्राहकाला आपला खर्च मिळतो, आणि त्याला मेहनतीबद्दल नेमस्त रकम देतां येते. मंडलांत मध्यंतरींच एखादी जागा रिकामी पडल्यास, बाकींच्या सभासदांनां ती जागा सहकार्यामंत्रणाच्या रीतीनें भरतां येते. मंडलाला आपल्या करितां कचेऱ्या विषयीं तजवीज करितां येते, आणि कारकून वगैरे नोकर नेमून त्यांना पगार देतां येतो. त्यांनां एक कारकून, एक सर्वेयर, आणि एक खजिनदार, इतके नोकर ठेविलेच पाहिजेत.

मंडलाचे आरोग्यसंबंधी अंमलदार दोन, ह्मणजे एक आरोग्यसंबंधाचा वैद्य (हेल्थ आफिसर) आणि एक उपद्रवपरीक्षक. आरोग्यसंबंधी वैद्य हा लायकीचा दाखला मिळविलेला वैद्य असला पाहिजे. तो मंडलास आरोग्य

संबंधी कामांत सल्ला देत असतो. जरूर पडली ह्मणजे त्यांच्या सभेंत हजर असणें, आरोग्य संबंधी कायदे कानूंबद्दल त्यांनां सल्ला देणें, त्यांच्या प्रदेशांतील आरोग्यस्थितीबद्दल नेहमी त्यांस माहिती देणें, आणि त्यांच्या व्यवस्थेमध्यें कांहीं व्यंगें असतील त्यांविषयीं त्यांस सूचना करणें, किंवा रोगाची सांथ येण्याचा संभव दिसला तर त्याबद्दल त्यांनां सावध करणें, हें त्याचें कर्तव्य आहे. उपद्रवपरीक्षक एक किंवा जास्त जितके असतील तितक्यांवर त्यालाच देखरेख ठेवावी लागते, आणि उपद्रवपरीक्षकाचा अंमल स्वतः चालविण्याचीही त्याला मोकळीक आहे. खेरीज आपल्या हद्दींतील प्रदेशाच्या आरोग्य संबंधी स्थितीबद्दल स्थानिकव्यवस्था मंडलाकडे त्याला वार्षिक हकीकत कळवावी लागते, आणि एखादी सांथ आली असतां, त्याविषयीं विशेष हकीकत जाहीर केली पाहिजे. याबद्दलचे रपोर्ट यथार्थ रीतीनें सादर केले, तर पार्लमेंट सभेनें मंजूर केलेल्या रकमेंतून स्थानिक मंडलाला त्याच्या पगाराचा कांहीं हिस्सा मिळूं शकतो.

उपद्रवपरीक्षकाची नेमणूक स्थानिक मंडलाकडून होत असते, आणि त्याचा पगारही तेच देतात. आपल्या हुकुमतींत आरोग्यास अपायकारक अशा सर्व उपद्रवांचा शोध लावून त्यांची हकीकत कळविणें, आणि हुकूम होईल त्याप्रमाणें त्या उपद्रवांच्या निरसनार्थ काम चालविणें, हें त्याचें कर्तव्य आहे. त्याचप्रमाणें आरोग्यसंबंधी जो वैद्य असेल त्याचेकडे ही हकीकत कळविण्याचें काम त्याचें आहे. याशिवाय एक नवीन आणि महत्वाचें कार्य त्याच्याकडे सोंपलें आहे. तें हें कीं त्यानें सार्वजनिक पृथक्कृतिकाराकडे अन्नाच्या पदार्थांचे नमुने मिळवून पृथक्कृतीसाठीं पाठवावे. येथें हें सांगणें इष्ट आहे कीं, कोणत्याही औषधाचें अथवा अन्नाच्या पदार्थांचें पृथक्करण खासगी मनुष्यास करून घेणें असेल, तर तेंही थोडीशी फी घेऊन या सार्वजनिक पृथक्कृतिकारानें करून दिलें पाहिजे.

स्थानिक मंडलाच्या कामाचे दोन वर्ग होतात. (अ) कायदे करण्यासंबंधी काम, आणि (ब) कारभारासंबंधी काम. कायदे कानू करण्याचा अधिकार स्थानिक मंडलाला राज्यकर्त्री संभूयकारिमंडळी या नात्यानें बहुतकरून मिळाला असताच, पण आक्टांत त्याविषयीं विशेष कलम स्पष्ट घातलें

आहे. सार्वजनिक आरोग्य आणि उपद्रवनिरसन यांबद्दलचा कायदा अंमलांत आणण्याकरितां कानू करण्याचा अधिकार स्थानिक मंडलांस आहे. आणि अशा कानूंच्या भंगांबद्दल पांच पौंडपर्यंत दंड त्या कानूंअन्वयेंच ठरवितां येतो. कानूंचा भंग अनेक दिवसपर्यंत चालणारा असला तर या उपर दररोज चाळीस शिलिंगपर्यंत दंड करितां येतो. सर्व कानू मंडलाच्या मोर्तबानिशीं झाल्या पाहिजेत, आणि त्याबद्दल ठरविल्या रीतीप्रमाणें जाहीरखबरी दिल्या पाहिजेत. तसेंच अंमलांत येण्यापूर्वी स्थानिक व्यवस्था मंडलाकडे त्या मंजूर होण्याकारितां सादर केल्या पाहिजेत, आणि त्या मंडलाला त्या मंजूर किंवा नामंजूर करण्याचा अधिकार आहे.

कारभारासंबंधी कर्तव्यें दोन प्रकारचीं ह्मणजे एक आरोग्यसंबंधी आणि एक साधारण. आरोग्यसंबंधी अधिकारांत नळ बांधण्याचा अथवा विकत घेण्याचा, आणि सर्व नळांचा नकाशा काढविण्याचा, हक्क येतो. दरएक प्रदेशांतील नळ तेथील मंडलाच्या मालकीचे असतात. हे नळ लोकांनां उपद्रवकारक न होतील अशा रीतीनें साफ ठेविणें, व त्यांत वायूचें गमनागमन मोकळें ठेवणें, हें मंडलाचें कर्तव्य आहे. नळापासून शंभर फुटींपेक्षां कमी अंतरावर जीं घरें असतील त्या सर्व घरांच्या मालकांकडून आपापल्या घरांतलें सर्व पाणी नळांत लावविण्याची त्यांनां सत्ता आहे. आणि सर्वेयराच्या पसंतीस येईल अशा रीतीनें जलनिष्क्रमणाची तजवीज केल्याशिवाय नवीन घर मंडलाच्या हद्दींत बांधतां येत नाहीं. शंभर फुटींपेक्षां जास्त अंतरावरील घराचें पाणि टांक्यांत टाकतां येतें. मलाचा दुर्गंध घालविण्याकरितां, किंवा उपद्रव न होई अशा रीतीनें त्याचा दुसरा कांहीं उपयोग करण्याकरितां, कारखाने सुरु करण्याचे विशेष अधिकार मंडलांनां दिले आहेत. स्थानिक व्यवस्था मंडलाच्या परवानगीनें जवळ जवळच्या पौर प्रदेशांनां मलसंबंधी कारखान्यांचा समाईक खर्च व वहिवाट ठेवितां येते. आपल्या हद्दींतील घरें व रस्ते साफ ठेविणें, व तेथील मल नेणें, हीं कामें स्थानिक मंडलाला स्वतः करितां येतात, किंवा मक्त्यानें देतां येतात. एखाद्या घरांत संसर्गजन्यरोग झाला असला, किंवा घाण फार असली, तर आपल्या हेल्थ आफिसर किंवा आरोग्य संबंधी वैद्याचा दाखला मिळवून, त्या घरास सफेदी

द्यावी व इतर रीतीनें तें साफसुफ करावें, असा हुकूम स्थानिक मंडलाला करितां येतो. पौर प्रदेशामध्यें राहत्या घरांत डुकरें किंवा डुकरगोठा ठेवण्याविषयीं स्पष्ट निषेध सांगितला आहे. तेव्हां थोडक्यांत या आक्टाचा सारांश ह्मटला ह्मणजे हा कीं, मालकाचें कर्तव्य आपलें घर परसूं वगैरे आरोग्यास अनपायकारक आणि साफ असें ठेवावें, आणि स्थानिक मंडलाचें कर्तव्य मालक आपलें काम न चुकवितील अशी तजवीज ठेवावी.

जर एखाद्या प्रदेशांत आक्टा अन्वयें स्थापिलेल्या खासगी मंडळीकडून पाण्याचा पुरवठा होत नसला, तर तो पुरवठा करण्याचें काम स्थानिकमंडलाला आपल्या हातीं घेतां येतें. तसें केलें ह्मणजे मंडलानें मापानें पाणी पुरवून त्या मापाप्रमाणें पैसा घ्यावा, किंवा झालेल्या खर्चाच्या फेडी करितां जलपट्टी बसवावी असे दोन मार्ग आहेत. सर्वेयराच्या रपोटा वरून एखाद्या घरास पाण्याचा पुरवठा बरोबर नाहीं असें दिसून आलें, तर मालकानें आपल्याकडून पाणी घ्यावें असा मंडलाला हुकुम करितां येतो. शिवाय पूर्वी स्थापित झालेल्या पाणी पुरविणाऱ्या मंडळ्यांचे कारखाने विकत किंवा भाड्यानें घेण्याची ही मोकळीक मंडलांनां ठेविली आहे. याच संबंधाचा मंडलावर दुसरा एक बोजा आहे, तो असा कीं, आगी करितां पाणी काढण्याचा यंत्र त्यांनीं पुरविला पाहिजे.

भुयार घरें आणि सामान्य चाळी यांच्या व्यवस्थेबद्दल स्थानिक मंडलांनां पूर्ण मुखत्यारी आहे. आणि ज्या कांहीं इमारती सामान्य चाळी नसतानां ही बिऱ्हाडांकरितां भाड्यांनें दिल्या जातात त्यांच्या व्यवस्थेबद्दल कानू करण्याचा हक्क स्थानिक व्यवस्थामंडल स्थानिक मंडलास देऊं शकतें. तसेंच उपद्रव टाळण्याच्या व काढून टाकण्याच्या बाबतींत मंडलाचा अंमल बराच आहे. आणि साबणाचे किंवा चर्बी वितळण्याचे व त्याप्रकारचे दुसरे उपद्रवकारक व अपायकारक कारखाने आपल्या मंजुरी वांचून स्थापण्याला प्रतिबंध करणें, आणि स्थापिले ह्मणजे त्यांचे नियमन करणें, हें ही त्यांच्या अधिकारांच्या आंत आहे.

सांसर्गिक रोगांच्या तजविजीविषयीं आरोग्यसंबंधी अंमलदारांस असावे तितके अधिकार दिले नाहींत. आणि जे दिले आहेत ते पूर्णपणें

अंमलांत आणिले जात नाहींत. जर कोणी सांसर्गिकरोगग्रस्त मनुष्य रस्त्यांत अथवा इतर सार्वजनिक स्थलांत समजून उमजून आला, किंवा भाड्याच्या गाडींत गाडीवाल्याला सूचना न करितां बसला, तर तो पांच पौंडापर्यंत दंडास पात्र होतो. व्यवहारांत हा नियम अंमलांत येत नाहीं; पण कोणी डोळे झांकून रस्त्यांत बंदूक मारूं लागला तर त्याच्या पासून, व या रोगग्रस्त मनुष्यापासून, शेजारी पाजाऱ्यांनां अपाय होण्याचा संभव बहुत करून सारिखाच आहे, असें ह्मणण्याला कांहीं चिंता नाहीं. हल्लीं लोकांच्या मनाचा कल त्या रोग्याला ठपका लावण्याकडे नसतो, त्याची कींव येते. पण त्याच्या देहापासून अपायकारक जे परमाणु पसरतात ते जर दृष्टिगोचर अथवा कर्णगोचर असते, तर मात्र त्याच्याबद्दल लोकांचा अभिप्राय कांहीं निराळ्या प्रकारचा झाला असता. स्थानिक मंडलाला मृत्युगृहें स्थापण्याचा अधिकार आहे. पण सांसर्गिक रोगापासून मेलेल्या मनुष्याचें प्रेत तेथें नेण्याविषयीं हुकूम त्यांनां कांहीं प्रसंगींच करितां येतो; ह्मणजे मयत ज्या खोलींत असे त्याच खोलींत दुसरे कोणी लोक राहत अथवा निजत असले तरच तसा हुकूम चालतो. आणि तो मिळविण्याला देखील भानगड फार असते. एखाद्या जस्टिस आफ धी पीसाची नेहमीं जरूर लागते. आतां इतकें खचित आहे कीं, सांसर्गिक रोगानें मेलेल्या मनुष्याचें प्रेत राहत्या घरांत दोन चार तासांपेक्षां जास्त वेळ कधींही राहूं देऊं नये. पण हल्लीं स्थिति अशी आहे कीं, असा प्रसंग आला ह्मणजे पडदे पाडतात, व खिडक्या बंद करतात, आणि त्यामुळें सर्व सभोंवतालची व्यवस्था रोगप्रसारास अनुकूल अशी होऊन जाते. असो. सांसर्गिक रोगाचा स्पर्श झालेलीं वस्त्रें प्रावरणें जाळून टाकण्याचा अधिकार स्थानिक मंडलाकडे आहे; त्या बद्दलची मालकाची नुकसानी मात्र त्यांनां भरून द्यावी लागते. तसेंच एखाद्या घरांत सांसर्गिक रोगाचा बीजनाश करण्याचाही अधिकार त्यांना आहे. पण स्थानिक मंडलाला असे रोग उत्पन्न झाल्याबद्दल माहिती मिळण्याची व्यवस्था नीट झाल्याशिवाय या अधिकारांपासून तादृश फायदा होऊं शकत नाहीं. तेवीस शहरांच्या कायद्यांत अशी माहिती देण्याची कामगिरी रोग्यास औषध देणाऱ्या वैद्याकडे सोंपण्याकरितां कलमें

घातलीं आहेत. ही तजवीज ठीक झाली आहे असें दिसतें. पण जेथें असा प्रकार सुरू नाहीं, तेथें ही कामगिरी वैद्याकडे देऊं नये असा वैद्य लोकांचा अभिप्राय आहे ह्मणून ह्मणतात. त्यांचें ह्मणणें असें आहे कीं, ही माहिती देण्याची जबाबदारी प्रत्येक घराच्या मालकाकडे असावी. पण वैद्यव्यतिरिक्त लोकांच्या दृष्टीनें असें दिसतें कीं, ज्या अर्थीं रोग्याला सांसर्गिक अथवा इतर प्रकारचा रोग झाला आहे या गोष्टीचा निकाल वैद्यच करूं शकतो, त्या अर्थीं वैद्यानेंच त्या बद्दल माहिती द्यावी हें योग्य आहे. इतकें मात्र कीं, छापिल पत्रकें त्यांना द्यावीं, आणि टपाल हंशील व मेहनतीबद्दल कांहींतरी, इतक्या पुरती त्यांनां फी मिळावी, हें रास्त आहे. तसेंच सर्व लोकांस येण्या जाण्याची मोकळीक असलेल्या एखाद्या घरांत जर सांसर्गिकरोगग्रस्त असा कोणी मनुष्य असला, तर तेथें सर्व लोकांस या गोष्टीची सूचना दिलीच पाहिजे असा नियम असावा. उदाहरणार्थ एखादें दुकान घ्या. जर त्या दुकानास लागून असलेल्या घरांत सांसर्गिकरोगग्रस्त, ह्मणजे समजा एखादा देवी आलेला, मनुष्य असला, तर त्या दुकानदारानें सर्वांस सूचना अवश्य द्यावी हें रास्त नाहीं काय? तसें केलें ह्मणजे सवदा करणाऱ्या लोकांनां दुकानांत जावें न जावें याचा विचार सर्व माहिती असून करायाला सांपडतो. आतां ज्या घरांत सर्वांनां येण्याजाण्याची मोकळीक आहे असें घर, आणि खासगी घर, यांत अंतर अलबत आहे. पण जर एखाद्या गवळ्याच्या घरांत स्कार्लेट फीवर नामक ज्वरानें पीडित माणूस असलें, तर त्याला कांहीं दिवसपर्यंत दूध विकण्याची मनाई असावी हें योग्य नाहीं काय? कारण त्या ज्वरापासून दूध दूषित होतें ही गोष्ट प्रसिद्ध आहे; आणि तशी मनाई न झाल्यास त्या गवळ्याकडील दुधापासून तो रोग चहूंकडे पसरण्याचा संभव उघड आहे. असो. स्थानिक मंडलाला हिस्पितळ बांधण्याचा व चालविण्याचा अधिकार आहे. आणि दोन किंवा अधिक मंडलांनां एकच समाईक हिस्पितळ ठेवितां येतें. या शिवाय रोगी दीनजन मंडळींतला नसला, तर त्याचे कडून खर्च वसूल करण्याचाही अधिकार आहे. पण हा अधिकार कधींच अंमलांत आणिला नाहीं असें दिसतें. कनिष्ठेतर वर्गांतील लोकांना सांसर्गिक रोग झाले असतां हिस्पितळांती-

ल सोईचा उपयोग करून घेण्यास उत्तेजन द्यावें हें बरें दिसतें; कारण खाऊन पिऊन सुखी असणाऱ्या मनुष्याचा आणि अगदीं दीन मनुष्याचा संसर्ग अपायकारक सारिखाच असतो. आणि संसर्गप्रसार होणें अशक्य करण्याकरितां ज्या तजविजी आवश्यक आहेत, त्या करण्याची ऐपत केवळ अत्यंत सधन मनुष्यासच असते. या बाबतींत कर्तव्य काय तें इतकेंच आहे कीं, लंडन शहरांतील ज्वराच्या हिस्पितळांत जी व्यवस्था फार सुयंत्र रीतीनें चालू आहे, तीच स्थानिक अधिकाऱ्यांनीं आपाआपल्या हद्दींत सुरू करावी. लंडन हिस्पितळांत साधारण नियम असा आहे कीं, दरएक रोग्यानें आपल्या खर्चापोटीं कांहीं तरी पैसा दिला पाहिजे. पण प्रसंगविशेषीं फीमध्यें कांहीं कमी करण्याचा, किंवा अजिबात माफी करण्याचा, अधिकार हिस्पितळाच्या व्यवस्थापक सभेला आहे. पुष्कळ लोक दुखण्यांत पडले ह्मणजे केवळ दुसऱ्याच्या धर्मावर अवलंबून राहण्यास खुषी नसतात. आपण होऊन कांहीं तरी खर्चाचा अंश द्यावा, व योग्य स्वाभिमान राखावा, अशी त्यांच्या मनाची प्रवृत्ति असते. पण त्यांच्यानें तशा दुखण्याच्या उपायाचा सर्व खर्च भागवत नाहीं. अशा स्थितींतला मनुष्य हिस्पितळांत गेला, तर त्यापासून त्याला स्वतःला आणि जनसमाजाला उभयतांसही फायदा आहे. रोग्याला हिस्पितळांतील सर्व साधनांपासून व तेथील शुश्रूषेपासून होणारा फायदा मिळतो. आणि जनसमाजाला रोगप्रसाराचें जोखीम कमी झाल्याचा फायदा होतो. तेव्हां या कामाच्या खर्चाचा अंश उभयतांनीं भरावा हें रास्त आहे. लंडन हिस्पितळांत कांहीं स्वतंत्र एकांतांतल्या खोल्या आहेत. त्यांत ज्या रोग्यांनां आपल्या दुखण्याचा सर्व खर्च देण्याची खुषी असेल त्यांची सोई करितात. त्या हिस्पितळांत दरसाल एक हजार रोगी जात असतात. पण लंडन शहरांत दर वर्षाला स्कार्लेटफीवर नामकज्वरानेंच पीडिलेले निदान पंचवीस हजार लोक असतात. तेव्हां सांसर्गिक रोगांचा प्रसार बंद करण्याला त्या हिस्पितळांतील व्यवस्थेचा पुष्कळ जास्त प्रसार झाला पाहिजे. अशा कामांत व्यक्तिव्यक्तीच्यानें फारसें होऊं शकत नाहीं. पण स्थानिक अंमलदारांच्या हातीं पुष्कळ आहे. आपलें काम होईल तितकें आपल्याच सामर्थ्यानें करावें, ह्या मूलतत्वाच्या अनुरोधानें

चालणाऱ्या व्यवस्थेला मदत करण्यास परोपकारी गृहस्थाचें मन सहसा घेत नाहीं. त्यांनां फक्त हृदयाल्हादक पण विवेकरहित असें औदार्य जास्त पसंत पडतें.

याप्राणें पौराधिकाऱ्यांची आरोग्य संबंधी कर्तव्यें झालीं. त्यांच्या सामान्य कर्तव्यांमध्यें मुख्य ह्मटलें ह्मणजे आपल्या हद्दींतील सर्व राजमार्ग व बोळ यांची व्यवस्था ठेवणें हें होय. ते हुद्याच्या नात्यानें राजमार्गांचे चौकसनीस असतात, आणि त्यांच्या हद्दींच्या बाहेर जे अधिकार वेस्ट्रीला आहेत, तेच हद्दींच्या आंत त्यांच्याकडे असतात. त्यांनां नवे मार्ग करितां येतात; गांवांतील नवीन रस्ते किती रुंद असावे, त्यांत फरसबंदी कशी असावी, याविषयीं हुकूम करितां येतात; आणि आपल्या हद्दींतील सर्व नवीन घरें व इतर इमारती यांबद्दल नियम करितां येतात. रस्त्यांस नांव देणें, किंवा नांव बदलणें, किंवा रस्त्यांचे नंबर बदलणें; जाहिरस्थळीं घड्याळें लावणें; सार्वजनिक फिरण्याहिंडण्याचा व कर्मणुकेचीं स्थलें स्थापणें; बाजार बसवून तेथें दुकान घालणारांकडून भाडें घेणें; हीं सर्व कामें करण्याची त्यांनां मोकळीक आहे. जर ग्यासचे दिवे पुरविणारी मंडळी त्यांच्या हद्दींत नसली, तर रस्त्यांत व खासगी घरांत ग्यास पुरविण्याचें काम त्यांनां स्वतः पत्करतां येतें, किंवा मक्त्यानें देतां येतें. तसेंच ग्यास पुरविणाऱ्या मंडळयांचा सर्व व्यापार विकत घेण्याचीही त्यांस मोकळीक आहे. आग टाळण्याकरितां व भाड्याच्या गाड्यांबद्दल त्यांना नियम करितां येतात. आणि प्रेतनिधानस्थलें स्थापून त्यांच्या व्यवस्थे विषयीं कायदे कानूही त्यांना करितां येतात.

या नानाविध कामाला खर्च अलबत्ता बराच लागतो. हा खर्च दोन प्रकारचा आहे. ह्मणजे एक कांहीं लोकांच्याच हितासाठीं, आणि दुसरा हद्दींतील सर्व लोकांच्या हिता साठीं. हा दोन प्रकारचा खर्च भागण्याकरितां दोन प्रकारच्या व्यवस्था केल्या आहेत. पहिल्या प्रकारच्या खर्चाचीं उदाहरणें येणेंप्रमाणें, घराचे नळ दुरुस्त करण्याचा खर्च, किंवा पौराधिकाऱ्यांच्या थोरल्या नळांशीं ते मिळवून देण्याचा खर्च, किंवा खासगी रस्त्यास फरसबंदी करण्याचा खर्च. या प्रकारचा खर्च घरवाल्यांवर अथवा मालकांवर पडतो. जर हीं कामें

स्थानिक मंडळाकडून झाली, तर त्यांना घरवाल्यांकडून झालेला खर्च वसूल करून घेतां येतो. खर्च अतिशय झाल्यास तो खासगी सुधारणेचा खर्च झाला ह्मणून शेरा करण्याची मुखत्यारी मंडळाकडे आहे. असा शेरा केला, ह्मणजे घरवाल्यांकडून पैसा वसूल करणें तो हप्तेबंदीनें तीस वर्षांच्या मुदतींत वसूल करितां येतो, आणि ज्या लोकांच्या हिताकरितां तें काम झालें असेल त्यांच्याकडून खासगी सुधारणाकर या नांवाचा कर बसवून त्या रूपानें खर्च वसूल करितां येतो.

सर्व लोकांच्या हिताकरितां केलेल्या खर्चाची फेड देशविभागाच्या साधारण पुंजींतून होते. त्या पुंजींत मार्केट दस्तुरी, उसनें काढलेले पैसे, आणि सामान्य करांचा वसूल, हीं सर्व येतात. सामान्यकर बसविणें तें मंडलाच्या मोहोरबंदी हुकुमानें होतें, व जसजशी जरूर पडेल तसतसा वेळोवेळीं हा हुकूम करितां येतो. पुढें होणाऱ्या खर्चवेचाकरितां हुकूम आधींच करितां येतो, किंवा कर बसविण्या पूर्वीच्या सहा महिन्यांच्या आंत केलेला खर्च फेडण्याकरितां मागाहून करितां येतो. ज्या ज्या मिळकतींवर दीनार्थ कर बसतो, त्या सर्वांवर हा प्रदेशकर ही बसतो, आणि त्या मिळकतीच्या दरसालच्या कमाल उत्पन्नावर आकारला जातो. बहुत करून दीनार्थ कायद्याकरितां केलेली आकारणी आधारभूत ह्मणून घेण्यांत येते. साधारणतः हा कर वहिवाटकरणारांकडून घेण्यांत येतो, मालकांकडून नाहीं. पण जर दरसालचें उत्पन्न दहा पौंडा पेक्षां जास्त नसलें, आणि मिळकतीची वहिवाट महिन्याच्या अथवा आठवड्याच्या करारानें रहाणारे भाडेकऱ्यांकडे असली, तर स्थानिक मंडळाला तो कर वहिवाटदारास सोडून मालकांकडूनच वसूल करितां येतो. कर किती बसविला आहे, त्या विषयीं लाभालाभसंबंध ज्यांचा असेल त्यांनां तपास करण्याचा हक्क आहे, आणि कर बसविण्यापूर्वीं एकंदर रकम पाहिजे किती, करास पात्र अशा मिळकतीची किंमत किती, आणि उत्पन्नाचा केवढा हिस्सा करा बद्दल घ्यावयाचा, याचा अजमास स्थानिक मंडळास काढावा लागतो. चिरस्थायी कार्य नसल्यास त्याचा खर्च चालू वसुलांतून फेडला पाहिजे. चिरस्थायी कार्यांच्या खर्चासाठीं उसनवार पैसे काढतां येतात. उसने काढलेले पैसे साठ वर्षांच्या आंत फेडले पाहिजेत.

उसने पैसे किती काढावयाचे, आणि त्यांच्या बद्दल व्यवस्था काय करायची, या बाबतींत स्थानिक व्यवस्था मंडलाची मंजुरी लागते. उसने काढलेल्या पैशाबद्दल सामान्य प्रदेशकर गहाण पडल्या सारिखा असतो. सावकार लोकांच्या संरक्षणार्थ उसने पैशांच्या फेडीबद्दल व व्याज भरण्याबद्दल विशेष कलमें १८७५ सालच्या स्थानिक ऋणाच्या कायद्यांत घातलीं आहेत. यामुळें स्थानिक अधिकाऱ्यांनां उसने पैसे फार सारिकेवार अटीनें मिळतात. स्थानिक व्यवस्था मंडलाच्या मागल्या रपोटावरून असें कळतें कीं, सन १८७१ आणि १८८१ या वर्षांच्या दरम्यान आरोग्य रक्षणार्थ केलेल्या पौर करांचें उत्पन्न सत्तर लक्ष पौंड वाढलें आहे, ह्मणजे सुमारें शेंकडा शेचाळीस या मानानें वृद्धि झाली.

आतां एक मुद्दा लक्ष देण्याजोगा राहिला, तो हा कीं स्थानिक मंडलावर आपलीं कामें बजावण्या करितां जबरी करण्याचा अधिकार स्थानिक व्यवस्था मंडलास दिला आहे. जर एखादा स्थानिक मंडलानें आपल्या हद्दींतील गटर किंवा पाण्याच्या पुरवठा या बाबतींत कुचराई केली, तर अमुक नियमित मुदतीच्या आंत आवश्यक जीं कामें असतील तीं करावीं, असा हुकूम योग्य तपास करून स्थानिकव्यवस्था मंडल करूं शकतें. हुकुमाप्रमाणें काम झालें नाहीं, तर तो हुकूम न्यायाच्या कोर्टाच्या मांडेमस नामक आज्ञापक निदेशानें अमलांत आणितां येतो; किंवा स्थानिकव्यवस्थामंडलाला तें काम दुसऱ्याकडून करवून स्थानिक अधिकाऱ्यांकडून त्याबद्दलचा खर्च वसूल करितां येतो.

## १. जानपद आरोग्याधिकारी.

वर सांगितलेंच आहे कीं, पौरहद्दींच्या बाहेर यूनियनांत जो प्रदेश येतो तो आरोग्यसंबंधी जानपद देशविभाग ह्मणून समजावा. त्या विभागाच्या आंतील पारिशांचे जे गार्डियन ते जानपद आरोग्याधिकारी होत. जर एखाद्या पारिशाचा कांहीं भाग पौरप्रदेशांत असला, आणि कांहीं भाग जानपद प्रदेशांत असला, तर तेथील गार्डियनांनां जानपद अधिकारी मंडलांत बसण्याचा हक्क आहे किंवा नाहीं, याचा निर्णय स्थानिकव्यवस्थामंडल करितें.

आरोग्य संबंधी जानपद देशविभाग एकंदर पांचशेंसत्तावन्न आहेत; आणि १८८१ सालच्या खानेसुमारीप्रमाणें त्यांतील लोकसंख्या सुमारें पंचायशी लक्ष आहे. बहुतकरून दाटवस्तीच्या शहरापेक्षां खेड्यापाड्यांतून आरोग्य संबंधी व्यवस्थेची पंचाईत फार कमी असते. यामुळें खेड्यापाड्यांतील अंमलदारांनां आरोग्यसंबंधी व्यवस्थे मध्यें अधिकार पौर अधिकाऱ्यापेक्षां बरेच कमी असतात. ठोकळ मानानें पाहिलें तर मल निरसन, नळ, पाण्याचा पुरवठा, आणि परोपद्रवांची देखरेख व निरसन, या बाबतींत, दोन्हीं अंमलदारांनां अधिकार सारिखेच असतात. १८७८ सालच्या सार्वजनिकारोग्यसंबंधी कायद्यांवरून खेड्यापाड्यांतील अंमलदारांचे पाणी पुरविण्याच्या संबंधाचे अधिकार बरेच वाढले आहेत. दिवेबत्ती, राजरस्ते, बोळ, हमामखाने, आणि करमणूकस्थलें, यांसंबंधी पौर अंमलदारांस जे अधिकार आहेत ते त्यांनां नाहींत. पण स्थानिकव्यवस्था मंडळाला, पौर अंमलदारांचे सर्व किंवा कांहीं अधिकार खेड्यापाड्यांतील अंमलदारास देतां येतात. खेड्यापाड्यांत आणि पौर प्रदेशांत आरोग्य संबंधी अंमलदार सारिखेच असतात.

जानपद प्रदेशांतील करांच्या व्यवस्थेचें वर्णन राइट साहेबांनीं दिलें आहे, तें येणेंप्रमाणें. "साधारण नियम असा आहे कीं, आपापल्या विशेष खर्चाचा, ह्मणजे, उदाहरणार्थ, पाण्याचा पुरवठा आणि इतर स्थानिक कार्यांच्या खर्चाचा, बोजा दरएक पारिशावर पडतो. सामान्य खर्च, ह्मणजे, उदाहरणार्थ, आरोग्यसंबंधी अंमलदारांचा खर्च, एका समाईक पुंजींतून फेडला जातो. त्या पुंजींत पारिशांतील आकारणी यादीच्या मानानें दीनार्थ कायद्याअन्वयें जमविलेल्या करांतून पैसा येत असतो. विशेष खर्चाची फेड, ज्या पारिशांकरितां खर्च होत असतो त्यासच करावी लागते, अथवा त्याबद्दल विशेष कर बसवितात. तो कर दीनरक्षणार्थ करच, पण पौर देशविभागांत ज्या रीतीनें तो घेतला जातो, त्याच रीतीनें हा पारिश विशेषीं घेण्यांत येतो. उदाहरणार्थ, शेती जमीन, लोखंडी सडका, वगैरे, यांचेकडून निव्वळ आकारणीच्या चवथाईवरच कर बसवितात. इतकें मात्र आहे कीं, कांहीं विशेष खर्च, ह्मणजे उदाहरणार्थ पाण्याच्या पुरवठ्याचा खर्च, करणें

[illegible], तितक्या कार्याकरितां अनेक पारिश मिळून एक समाईक पारिश समजावा, असा हुकूम स्थानिक व्यवस्था मंडलास करितां येतो.

## ३. बंदरांतील आरोग्याधिकारी.

साधारण जानपद व पौर अंमलदारांखेरीज एकेचाळीस बंदरांत स्वतंत्र आरोग्याधिकारी आहेत. बंदरांच्या हद्दींतील सर्व जलाशयांवर, आणि बंदराचें अधिकारमंडल ज्या हुकुमाअन्वयें स्थापन झालें असेल त्या हुकुमांत जलाशयाच्या सभोंवतालचा जितका जमिनीचा प्रदेश दर्शविला असेल त्या प्रदेशावर, बंदर अधिकाऱ्यांचा अंमल चालतो. जर एखाद्या आरोग्य संबंधीं स्थानिक अंमलदारांच्या हद्दीवर बंदर असलें, तर त्या अंमलदारांनां, किंवा बंदराची स्वच्छता राखण्याकरितां नेमलेल्या हुद्देदारांनां, त्या बंदराचे आरोग्याधिकारी. म्हणून ठरविण्याचा अधिकार स्थानिक व्यवस्थामंडळाला आहे. जर एखाद्या बंदराच्या किनाऱ्यावरील अधिकारी दोन किंवा ज्यास्त असले, तर योग्य वाटल्यास त्यांनां एकत्र मिळून आरोग्यसंबंधी कारभार पाहण्यास हुकूम करण्याचा अधिकार स्थानिक मंडल्यास आहे. अशा प्रसंगीं त्यांनीं एकत्र मिळून कारभार कसा चालवावा, या विषयीं हुकुमांत ठराव झाला पाहिजे, किंवा दोघांचें मिळून एक मंडल स्थापिलें पाहिजे. त्याच हुकुमांत, १८७५ सालच्या सार्वजनिकारोग्याच्या कायद्यांत ठरविलेले हक्क, अंमल, व कर्तव्यें, हीं सर्व किंवा त्यांपैकीं योग्य दिसतील तितकीं, त्या बंदरच्या अंमलदारांस दिलीं पाहिजेत. आणि त्याच हुकुमांत, त्या अधिकाऱ्यांचा खर्च कसा चालवावयाचा या विषयींही कलम घातलें पाहिजे.

## भाग ८ वा.

कनिष्ठ प्रतीच्या शिक्षणाच्या संबंधानें इंग्लंड आणि वेल्स यांचे शाळांचे देश विभाग केले आहेत. हे विभाग, १८७० सालीं कनिष्ठ प्रतीच्या शिक्षणाबद्दल फार्स्टर साहेबांनीं जो कायदा पार्लमेंट सभेकडून मंजूर करून घेतला त्या पासून सुरू झाले. तो कायदा म्हणजे, सार्वजनिक शिक्षणाची एक मोठी सनद, असाच गणिला पाहिजे. त्या

नंतर मंजूर झालेल्या कायद्यांत त्यांतील कलमांची दुरुस्ती झाली आहे. पण ती केवळ मूळचे हेतू सिद्धीस नेण्यास्तव त्या कायद्यांतील उणीवी पुऱ्या करण्याकरितांच झाली. १८७० सालाच्या पूर्वी देखील कनिष्ट प्रतीचें शिक्षण हें एक सार्वजनिक हितार्चे काम ह्मणून मानलें जात असे. अभ्यास वगैरे अमुक एक नेमलेल्या इयत्तेपर्यंत चांगला असला, ह्मणजे इमारती करितां व इतर कार्याकरितां सरकारी पैशांतून खासगी शाळांनां मदत देण्याचा प्रघात असे. पण विद्येचीं जीं प्रधान मूलतत्वें तितकीं सर्व प्रजेस मिळण्याबद्दल तजवीज ठेवण्याचें काम सरकारचें आहे, हा सिद्धांत फार्स्टर साहेबांच्या कायद्यांत पहिल्यानें स्पष्टपणें मान्य करण्यांत आला; आणि तेव्हां पासूनच त्या अनुरोधानें व्यवस्था होऊं लागली. हें सार्वजनिक कर्तव्य बजाविण्याची कामगिरी स्थानिक अधिकाऱ्यांकडे आहे, आणि त्या अधिकाऱ्यांवर राणी साहेबांच्या प्रिवी कौन्सलांतील विद्याखात्याची देखरेख असते. १८७० सालचा कायदा जेव्हां अंमलांत आला, तेव्हां मुख्य वादाचा विषय हा होता कीं, करांची मदत ज्या शाळांनां मिळते त्यांत धर्मसंबंधी शिक्षण असावें किंवा नसावें. हल्लीं जो वाद मुख्यत्वें करून उपस्थित होतो त्यांतला मुद्दा हा कीं, अभ्यास कनिष्ट प्रतीचा ह्मणून लेखण्या लायक असा कोठपर्यंत. पण या विषयाचें विवेचन येथें मुळींच कर्तव्य नाहीं. शिक्षण संबंधी कायदा अंमलांत आल्यापासून फल काय होत आहे, याचा आपल्याला येथें विचार करणें नाहीं, तर अंमलांत आणण्याला साधनें काय काय योजिलीं आहेत हें पाहाणें आहे. आतां या बद्दल पहिली गोष्ट ही आहे कीं, कायद्याचा अंमल ठीक चालावा ह्मणून त्यांत तीन वर्गांच्या लोकांनां कामगिरी लावून दिली आहे; ह्मणजे मुलांचे आईबाप, सरकारी विद्याखातें, स्थानिक अधिकारी. प्रथम, कायद्यानें सिद्धांत केला आहे कीं, दरएक मुलाला लिहिणें, वाचणें, आणि अंकगणित, इतक्या पर्यंत अभ्यास होण्याची तजवीज करणें हा त्या मुलांच्या आईबापांचा धर्म आहे. या सिद्धांतांत आईबाप या शब्दाचा अर्थ व्यापक धरून मातापितृस्थानीय सर्वांचा त्यांत समावेश केला आहे. ह्मणजे मुलांच्या अविवाहित आतेची किंवा मावशीची देखील त्या शब्दाखालीं गणना होते. दुसरें,

विद्याखात्याला अशी कामगिरी लावून दिली आहे कीं, दरएक शालार्थ विभागांत लोकांच्या गरजेप्रमाणें सार्वजानिक शाला उपलभ्य असाव्या, अशी तजवीज त्यांनीं ठेविली पाहिजे. या करितां आवश्यक जी माहिती, ती मिळावी ह्मणून, निरनिराळ्या स्थानिक अधिकाऱ्यांनां विद्याखात्याकडे पत्रकें पाठवावीं ह्मणून हुकूम आहे आणि विद्याखात्याला स्वतंत्र चौकशी करण्याची ही मुखत्यारी दिली आहे. तिसरें, जर विद्याखात्याच्या अभिप्रायाप्रमाणें सार्वजानिक शिक्षणाच्या तजविजी पुरत इतक्या एखाद्या शालार्थ विभागांत नसल्या, तर तशा तजविजी करून देण्याचें काम स्थानिक अधिकाऱ्यांचें आहे.

कनिष्ट प्रतीची शाळा ह्मणजे काय ह्मणून कोणी विचारील तर तिचें लक्षण असें ठराविलें आहे. ज्या शाळेंत कनिष्ट प्रतीचें शिक्षण हेंच शिक्षणाचें मुख्यांग ह्मणून गणिलें जातें, आणि जेथें दर आठवड्याला शिष्यांकडून नऊ पेन्स ( सुमारें ६ आणे ) यापेक्षां जास्त पैसा सामान्यतः घेण्यांत येत नाहीं, ती कनिष्ट प्रतीची शाळा. सार्वजानिक कनिष्ट प्रतीची शाळा ह्मणजे, ज्या कनिष्ट प्रतीच्या शाळेवर सरकारी शाळातपासनिसांची देखरेख असते, जेथें धर्मसंबंधी निःपक्षपाताचा नियम अंमलांत असतो, आणि जेथें इतर प्रकारांनीं ही सरकारी विद्याखात्याच्या हुकुमाप्रमाणें वर्तन होत असतें ती आतां या सर्व कामगिऱ्या बजावण्याचीं साधनें आहेत तीं अशीं पहिल्यानें सगळ्या देशांचे शालार्थ विभाग ह्मणून कांहीं विभाग केले आहेत आणि प्रत्येक विभागांत शालाधिकारी नेमिले आहेत. त्या विभागांची रचना सामान्यतः अशी आहे कीं, म्युनिसिपालिट्यांच्या कायद्या अन्वयें स्थापिलेलें दरएक नगर हें शालार्थ विभाग ह्मणून गणिलें जातें, आणि नगरांत न येणारा दरएक पारिश ही त्याच प्रमाणें. जर एखाद्या पारिशाचा कांहीं भाग नगरांत आणि कांहीं भाग नगराच्या बाहेर पडत असला, तर बाहेरील विभागाला निराळा पारिश गणून निराळा शालार्थ विभाग असें मानितात. सरकारी विद्याखात्याला शालार्थ विभाग एकमेकांला जोडण्याचा अधिकार आहे. आणि तसें त्यांनीं केलें, ह्मणजे जोडलेल्या विभागांनां साधारण विभागाप्रमाणेंच लेखतात. विद्येच्या संबंधी स्थानिक

अंमलदार दोन प्रकारचे असूं शकतात. एक शालाधिकारिमंडल आणि एक शाळांत मुलें आणणारी मंडळी. दरएक शालासंबंधी विभागांत दोहोंपैकीं एक प्रकारचे अंमलदार असले पाहिजेत. शालाधिकारिमंडल दोन रीतीनें स्थापिलें जातें. एक विद्याखात्याच्या हुकुमानें, किंवा एक त्यात्या विभागांतील कर भरणाऱ्यांच्या स्वतंत्र व्यवस्थेनें. जर विशेष चौकशी अंतीं विद्याखात्याच्या नजरेस आलें कीं, सार्वजनिक शालांचा पुरवठा असावा तितका नाहीं, तर त्यांनीं ही गोष्ट स्थानिक अंमलदारांनां जाहीर करून उपाय योजण्या विषयीं हुकूम केला पाहिजे. हुकूम केल्यापासून सहा महिन्यांच्या मुदतींत हुकुमाप्रमाणें योजना स्थानिक अंमलदारांनीं केलेली नसली, तर त्या विभागाकरितां शालाधिकारिमंडल स्थापण्याची तजवीज विद्याखात्यानें केली पाहिजे. शाला मंडल स्थापण्याचा दुसरा प्रकार ह्मणजे, स्थल विशेषांशीं संबंध असणाऱ्या लोकांच्या अर्जावरून स्थापणें हा होय. शहरांत शाळा स्थापणें झाल्यास तेथील टौनकौन्सिलानें अर्ज केला पाहिजे. इतर ठिकाणीं, शालामंडलाचे सभासद निवडण्याची कामगिरी ज्यांच्यावर पडणार, त्यांनीं अर्ज केला पाहिजे. या निवडणार मंडळीचा अभिप्राय कळविण्यास्तव सभा रीतीप्रमाणें भरून, त्यांचें मत तेथें घेतलें पाहिजे. सभा पन्नास कर भरणाऱ्यांच्या सांगण्यावरून गार्डियनांचा कारकून भरवितो. जर शालामंडल स्थापण्या बद्दलची सूचना एकदा नामंजूर झाली, तर एक वर्ष अवधि भरे पर्यंत पुनः ती सूचना मंडळी पुढें आणितां येत नाहीं.

विशेष प्रसंगीं शालामंडलाचे अधिकार बंद करण्यास विद्याखातें मुखत्यार आहे.

शालामंडलाचे सभासद निवडण्याच्या कामांत दरएक कर भरणाराला संमति देण्याचा हक्क आहे. जितके सभासद निवडायाचे असतील, तितक्या संमति एकएकाला देतां येतात, आणि त्या त्याच्या इच्छेस येईल त्या प्रमाणें वाटतां येतात; ह्मणजे एकाच मनुष्या करितां सर्व संमति नोंदतां येतात. निवडणुकीची शिस्त विद्याखात्याकडून ठराविण्यांत येते. त्या खात्यानें केलेल्या नियमांप्रमाणें, सभासदांचीं नांवें लेखी पत्रानें सुचविलीं पाहिजेत, आणि प्रतिस्पर्धेचा प्रसंग असल्यास,

१८७२ सालच्या गुप्तसंमतीच्या कायद्यांतील म्युनासिपालिटी संबंधी निवडणुकीं बद्दलच्या कलमांअन्वयें संमतिपरिसंख्यान झालें पाहिजे. शहरांत मतग्राहक मेयर असतो, आणि शहराचे पोटविभाग केलेले असल्यास पोटविभागाचा आल्डर्मन मतग्राहक असतो. खेड्या पाड्यांत गार्डियनांचा कारकून मतग्राहक असतो.

पहिल्यानें शालामंडल स्थापण्यांत आलें, ह्मणजे त्यांतील सभासदांची संख्या विद्याखात्याकडून ठरविण्यांत येतें, पण पुढें शालामंडलास स्वतः, विद्याखात्याच्या मंजुरीनें, संख्या ठरविण्याचा अधिकार आहे. या मंडलाचा सभासद होण्याला लायकीचीं साधनें अमुक ह्मणून मुकरर केलेलीं नाहींत. मंडलाचे सभासद तीन वर्षें पर्यंत हुद्यावर असतात, आणि मग सर्व एकाच प्रसंगी हुद्दा सोडतात. पण त्यांची पुनः त्याच हुद्यावर नेमणूक करण्याला कांहीं हरकत नाहीं. एखाद्या सभासदाच्या नेमणुकी बद्दल वाद उत्पन्न झाला, तर त्याचा निकाल करण्याचें काम विद्याखात्याकडे आहे. मध्यंतरींच एखादी जागा विशेष कारणामुळें खाली झाल्यास, बाकींच्या सभासदांनां त्या जागेवर नेमणूक करितां येते. शालामंडल ही संभूयकारीमंडळी असते. त्यांचा सामान्य शिक्का असतो. त्यांनां निरंतर स्वत्वानुवृत्तीचा हक्क असतो, आणि अन्यादेय भोगाच्या हक्कानें जमीनीची मालकी मिळवितां येते. सभासदांस आपला अध्यक्ष निवडण्याचा हक्क आहे, आणि त्यांच्या कारभाराचे जें टांचण ठेविलें जातें त्यावर अध्यक्षाची सही असली ह्मणजे तें पुराव्यास ग्राह्य आहे. शालामंडलाला एक कारकून, एक खजिनदार, आणि शिक्षक नेमण्याचा अधिकार आहे. हे मंडलाच्या मर्जीस येईल तों पर्यंत हुद्यावर राहतात, आणि मंडलानें ठरविल्याप्रमाणें त्यांस पगार मिळतो. मुलांना शाळेंत पाठविण्याची सक्ति करण्याकरितां शालामंडलाला नियम करितां येतात, आणि ते नियम अंमलांत आणण्याकरितां एक अधिकारी त्यांनां नेमितां येतो. शाळेंत मुलें पाठविण्याची सक्ति करणाचा दुसरा मार्ग हा आहे कीं, शालामंडलाच्या अर्जावरून जस्टिस नांवाचे जे अधिकारी आहेत त्यानां मुलें शाळेंत पाठविण्याबद्दल हुकूम क-

रितां येतो. हुकुमाप्रमाणें वर्तन न झाल्यास दाखला मिळविलेल्या उद्योगशाळेंत मुलें घालतां येतात.

विद्याखात्याच्या संमतीनें शालामंडलाला आपल्या कारभाराकरितां कचेरी ठेवितां येते. आणि विद्याखात्यानें फर्माविल्या प्रमाणें शाळा पुरविण्याचें काम त्यांचें आहे. तें काम त्यांनीं न बजाविलें, तर योग्य सूचना केल्या नंतर, विद्याखात्याच्या हुकुमाप्रमाणें तजवीज होईपर्यंत, शालामंडलाच्या जागीं नवीन मंडळी नेमण्याचा अधिकार विद्याखात्यास आहे.

शालामंडलाचा सर्व खर्चवेंच शालाफंडांतून होतो. शालामंडलाच्या हातीं आलेला सर्व पैसा शालाफंडांत जातो. त्या फंडांत पैसे येण्याचे मार्ग चार आहेत. ( १ ) मुलांची फी. ( २ ) इमारती अथवा कांहीं कायमच्या सुधारणा करण्याकरितां पार्लमेंट सभेच्या हुकुमाअन्वयें मिळालेला पैसा. ( ३ ) उसना काढलेला पैसा. ( ४ ) शालास्थापनार्थ कर. शाळा बांधण्याकरितां किंवा वाढविण्याकरितां उसने पैसे काढण्याची बरीच मोकळीक शालामंडलास दिली आहे. इतकेंच मात्र कीं, उद्योगशाळे शिवाय दुसऱ्या कामाकरितां पैसा उसना काढणें झाल्यास विद्याखात्याची मंजुरी लागते. आणि उद्योगशाळेकरितां काढणें झाल्यास होम सेक्रेटरी नामक प्रधानाची मंजुरी पाहिजे. उसने काढलेले पैसे फेडण्याला पन्नास वर्षांची मुदत ठरवितां येतें. १८८२ सालच्या रपोटावरून असें दिसून येतें कीं, शालामंडलांनीं उसने काढिलेल्या पैशाची रकम त्या सालापर्यंत जवळ जवळ एक कोटि दहा लक्ष पौंड होती. आणि त्या सालांत त्यांनीं दहा लक्ष पौंडांपेक्षां अंमळ जास्त रकम नवी उसनवार काढिली.

शालामंडळांचें उत्पन्न बहुतेक फी व स्थानिक कर यांपासून प्राप्त होतें. फी विद्याखात्याच्या मंजुरीनें शालामंडल ठरवीत असतें. विशेष कारणास्तव एखाद्या मुलाची फी माफी करण्याचा अधिकार शालामंडलास आहे. आणि मुलाच्या आईबापांस फी देण्याची ऐपत नसल्यास गार्डियनांला त्यांची फी देतां येते. फी उत्पन्नानें खर्च न भागला, ह्मणजे कर बसविला जातो. कर बसविण्याचा अधिकार ज्यांना आहे, त्यांच्याकडे आपल्यास किती रकम पाहिजे तें शालामंडल जाहीर करतें. शहरांत

हा कर शहरकरांतच सामील केला जातो. आणि शहरां बाहेरच्या पारिशांत तो दीनार्थकरांत सामील होतो. १८८१ सालीं करांचें उत्पन्न पंधरा लक्ष पौंड होतें. आणि फीचें उत्पन्न तीन लक्ष सत्तर हजार पौंड होतें. तेव्हां खर्चाचा तीन चतुर्थांशाहून अधिक हिस्सा करांतून वसूल झाला. शालामंडलाचे हिशेब स्थानिक व्यवस्था मंडलाच्या हुकुमानें ठरविलेल्या नमुन्याप्रमाणें तयार केले पाहिजेत. जमाखर्चाचा ताळा दर सहा महिन्यांनीं किंवा वर्षांनीं, हुकूम होईल त्याप्रमाणें, करावा लागतो. आणि जमाखर्चपत्रकावर अध्यक्षाची सही झाली पाहिजे. या हिशेबाची तपासणी स्थानिक व्यवस्था मंडलाच्या खात्यांत जो दीनार्थकरासंबंधी तपासनीस असतो त्याच्याकडून होते. त्याच्या ठरावावर अपील स्थानिक व्यवस्था मंडलाकडे चालतें. तपासणी नंतर जमाखर्चपत्रक विद्याखात्याकडे व कर बसविणाऱ्या अधिकाऱ्यांकडे पाठविलें पाहिजे. सहा पेन्स ( सुमारें चार आणे ) फी देऊन त्या पत्रकाची नक्कल मागण्याचा हक्क दरएक कर भरणारास आहे. या देशांत एकंदर दोन हजार एकावन्न शालामंडलें आहेत.

ज्याठिकाणीं शाला मंडल नाहीं तेथें विद्याधिकारी शालाकमिटी असते. ती कमिटी ह्मणजे वस्तुतः पूर्वीं असणाऱ्या कोणत्या तरी एखाद्या स्थानिक मंडळांतीलच लहानशी निवडक सभासदांची कमिटी असते. शाला कमिटी दरसाल नेमिली जाते,आणि तिचे सभासद पांचापेक्षां अधिक,आणि बाराच्या आंत, इतके असले पाहिजेत. शहरांत कौन्सलाला आपल्या मंडळींतलेच कांहीं लोक कमिटीदार दाखल नेमिले पाहिजेत. आरोग्यसंबंधी पोर देशविभागांतही, पांच हजारांपेक्षां लोकसंख्या कमी नसली तर, आरोग्याधिकाऱ्यांनांच आपल्या मंडळींतून शालाकमिटीदार नेमावे लागतात. सदरहु दर्शविलेल्या विभागाबाहेरील पारिशांत, शालाकमिटी ह्मणजे ज्या गार्डियन मंडलाच्या हद्दींत तो पारिश असेल त्यांच्यामधील कांहीं सभासद मिळूनच होत असते. शालाकमिट्यांनां लागेल ती मदत व माहिती देण्याकरितां स्थानिकमंडळ्या नेमण्याचा अधिकार आहे. आणि शाला मंडलाप्रमाणें, मुलें शाळेंत हजर राहण्याकरितां त्यांनां कानूही करितां येतात. ह्या कानू व शाळेंत हजर राहण्याविषयींचीं कायद्यांतील कलमें

बजाविण्याकरितां अंमलदार नेमण्याविषयीं व त्यांचे पगाराविषयीं तजवीज केली आहे. पण कांहीं खेड्या पाड्यांतील ठिकाणीं, गार्डियन मंडलाच्या अंमलदारानांच ही कामगिरी बजावावी लागते. कायद्यांतील कलमांविषयींची माहिती सर्वांस प्राप्त करून देण्याचें काम शालाकमिट्यांचें आहे; आणि धर्मसंबंधी कलमांचा भंग झाला असतां त्याबद्दल विद्याखात्याकडे रपोट त्यांनींच केला पाहिजे. शालाकमिटीनें आपलें काम बजाविलें नाहीं तर त्यांचें काम चालविण्यासाठीं दोन वर्षेपर्यंत दुसरे गृहस्थ नेमण्याचा अधिकार विद्याखात्याकडे आहे. याप्रकारें नेमिलेल्या गृहस्थांचे पगार आणि इतर सर्व झालेला खर्च ( योग्य असेल त्याप्रमाणें ) टौनकौन्सल किंवा गार्डियन यांचें कडून वसूल करितां येतो.

## भाग ९ वा.

### १. राजमार्ग प्रदेश.

ब्लाक्स्टन यानें राजमार्गाचें लक्षण दिलें आहे ते येणेंप्रमाणें; राजमार्ग ह्मणजे जो सार्वजनिक रस्ता राज्यांतील सर्व लोकांनां वापरण्याचा हक्क आहे तो. राजमार्ग प्रदेश मुख्यत्वें करून तीन आहेत (१) राजमार्ग पारिश (२) राजमार्गदेशविभाग (३) आरोग्यसंबंधी पौरदेशविभाग. पहिले दोन चा अंमल खेडयापाडयांत असतो. हे वर्ग सर्वव्यापक नाहींत. कारण दक्षिण वेल्स मधील सहा कौंटीमध्यें १८४४ आणि १८९० सालच्या कायद्यांअन्वयें राजमार्ग संबंधी विशेष व्यवस्था आहे. वैटच्या बेटांतही विशेष व्यवस्थाच आहे. आणि राजधानींत तर साधारण कायद्यांचा अंमल चालत नाहींच नाहीं. या शिवाय दुसरीं ठिकाणें व शहरें आहेतच, त्यांतही राजमार्गसंबंधी साधारण व्यवस्थेंत कांहीं कमी जास्ती प्रकार दिसून येतो.

राजरस्ते दोन प्रकारचे आहेत. एक साधारण राजरस्ते आणि एक मुख्य सडका. हा भेद पूर्वींही नांवापुरता होताच, पण त्याला दस्तुरीचे कायदे खरोखरी कारण झाले. हे कायदे मागिल शतकांत सुरु होते, पण अलिकडे बंद झाले आहेत. हें उघड आहे कीं, ज्या मोठ्या रस्त्यानें सगळ्या देशाचा व्यापार मुख्यत्वें करून वाहत असतो, आणि ज्या रस्त्यांचा

उपयोग अमुक एक नियमित हद्दीलाच होतो, त्यांत कांहीं तरी भेद ठेविला पाहिजे. दस्तुरीच्या कायद्यांप्रमाणें, ज्या रस्त्यावर त्या कायद्यांचा अंमल चालत असे, ते व्यवस्थापकांच्या स्वाधीन असत, आणि त्या व्यवस्थापकांनां दस्तुरी घेऊन त्या रस्त्यांसंबंधी खर्चवेंच फेडण्याचा अधिकार असे. आतां शास्त्रीय रीतीनें पाहिलें तर जे रस्ता वापरतात त्यांच्या कडून त्यांच्या वापराच्या मानाप्रमाणें दस्तुरी घेऊन रस्त्यासंबंधी खर्च चालविणें या शिस्तींत कांहींच गैर नाहीं. पण व्यवहार दृष्टया पाहतां ती रीति फारच त्रासदायक व खर्चाची आहे. मि. डाडसनसाहेबांनीं असें ह्मटलें आहे कीं, या रीतीपेक्षां "अधिक उधळेपणाची अशी रस्त्याची तर्तुद ठेवण्याची रीत मनुष्याच्या किंवा राक्षसाच्या चतुराईला कधीं सुचणार नाहीं." दस्तुरीच्या व्यवस्थेबद्दल जितके ठराव आहेत, तितक्या सर्वांच्या मुदती आटपत आल्या आहेत. आणि त्या ठरावांची तरफदारी करावयाला हल्लीं कोणी मिळत नाहीं. १८६४ सालीं एक हजार अठ्ठेचाळीस व्यवस्थापक मंडळ्या होत्या आणि त्यांच्या स्वाधीन वीस हजार मैल रस्ता होता. १८८२ सालीं मंडळ्या फक्त एकशें पांच राहिल्या होत्या, आणि त्यांच्या स्वाधीन फक्त तीन हजार मैलच रस्ता राहिला होता. १८९३ सालानंतर दस्तुरी घेण्याचें काम अजीबात बंद होणार आहे. १८७८ सालापर्यंत, व्यवस्था ठरावाची मुदत भरली ह्मणजे रस्ता साधारण राजमार्ग ह्मणून गणला जात असे; पण त्या सालीं झालेल्या कायद्यांत असा नियम आहे कीं, १८७० सालानंतर ज्या रस्त्या बद्दलच्या व्यवस्था ठरावाची मुदत भरली असेल, तो रस्ता मुख्य सडक ह्मणून समजावा. मुख्य सडकांची तर्तुद कौंटींतील सर्वेयराच्या मनास येईल अशा रीतीनें ठेविली असल्यास, त्या सडकांवरील अंमलदारांनां निम्मा खर्च कौंटी कडून मिळत असतो. याशिवाय कायद्यांत असें कलम आहे कीं, कौंटीवरील अंमलदार ( ह्मणजे जस्टिस लोकांची क्वार्टर सेशनसभा ) यांनां कोणताही रस्ता मुख्य सडक आहे ह्मणून जाहिर ठराव करतां येतो; आणि मुख्य सडक साधारण रस्त्यासारखीच गणली जावी असा हुकूम मिळविण्याकरितां स्थानिक व्यवस्था मंडलाकडे अर्ज करितां येतो. १८८१ सालीं कौंटीकडून

रस्त्याच्या तर्तुदीकडे ब्याहत्तर हजार पौंड देण्यांत आले, पण या बद्दलची संपूर्ण माहिती उपलभ्य नाहीं.

१ राजमार्ग पारिशांचे लक्षण असें आहे:– " जर कोणताही पारिश, टौनशिप, अथवा ठिकाण, येथील राजरस्त्यांची तर्तुद त्यांच्या त्यांच्या कडूनच होत असली अथवा तीं राजमार्गदेशविभागांत किंवा आरोग्यसंबंधी पौर देशविभागांत नसल्यास त्यांच्याकडूनच झाली असती, तर त्या पारिशाला टौनशिपाला व ठिकाणाला राजमार्गपारिश ह्मणावें." राजमार्ग पारिशांची एकंदर संख्या सांगतां येत नाहीं, पण आपापल्या रस्त्यांची तर्तुद राखणारे राजमार्ग पारिश पांच हजार आठशें चार आहेत. येथें ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे. राजमार्गसंबंधी पारिश आणि दीनार्थ कायद्यासंबंधी पारिश यांच्या हद्दी अवश्यमेव एकच असतात असें नाहीं;एखादें नगर किंवा गांव दीनार्थकायद्यासंबंधी पारिशामध्यें असतांहीं, वहिवाटीमुळें राजमार्गसंबंधी कार्यास्तव स्वतंत्र पारिशासारिखें गणलें जातें. उदाहरणार्थ, श्रापशायरांत राजमार्ग पारिश सातशें चाळीस आहेत,आणि दीनार्थ कायद्यासंबंधी पारिश अवघे दोनशें चोवीस आहेत.कंबलैंडमधील एका प्रदेशांत सासष्ट राजमार्ग पारिश,आणि सदतीस दीनार्थ कायद्यासंबंधी पारिश आहेत.जुन्या इंग्रजी कायद्याप्रमाणें राजमार्गाची मरामत तर्तुद वगैरे ठेवण्याचा सर्व बोजा पारिशावर असे.जर पारिशाच्या लोकांनीं या कामांत हयगय केली,तर त्यांचेवर फौजदारी गुन्हा केल्याबद्दल काम चालवितां येत असे. या साधारण नियमाला दोन अपवाद होते,ते अजूनही कायम आहेत.एक अपवाद हा कीं, कांहीं ठिकाणीं एखाद्या मनुष्याच्या मिळकतीमधून जाणाऱ्या रस्त्याची तर्तुद करण्याचा बोजा त्या मनुष्यावर मिळकतीचा मालक या नात्यानें असूं शकतो. आणि दुसरा असा कीं, तशाच मालकीच्या नात्यानें, एखादा मनुष्य अथवा एखादा गांव देखील, यांच्यावर तो बोजा पडूं नये असेंही होऊं शकतें. १८३९ सालच्या राजमार्ग संबंधी कायद्यांत जुन्या कायद्यांतील नियम आधारभूत धरिले आहेत, आणि पारिशांवरील असणारी कामगिरी बजावण्याची साधने सामग्री ठरवून दिलीं आहेत. वेस्ट्रीनें एक सर्व्हेयर नेमिला पाहिजे.

तो एक वर्षभर हुद्यावर राहत असतो; आणि त्यानें काम न पत्करिलें तर तो दंडास पात्र होतो. सर्वेयराला एक मनुष्य आपला नायब नेमितां येतो. वेस्ट्रीस योग्य वाटल्यास त्याला पगार द्यावा ह्मणून ठराव करितां येतो. वेस्ट्रीच्या परवानगीनें सर्वेयराला एक मनुष्य वसूलकरणारा ह्मणून नेमतां येतो. रस्त्याची तर्तुद नीट राहावी एतदर्थ तजवीज करण्याचें काम सर्वेयरांचें आहे. आणि वेस्ट्रीच्या संमतीनें त्याला रस्त्यांच्या मरामतीबद्दल कंत्राट देतां येतें. राजमार्गाकरितां आवश्यक जो कर असेल, तो ठरविण्याचें व वसूल करण्याचेंही काम त्यांचेकडेच आहे. वेस्ट्रीनें सर्वेयर न नेमिला, तर जस्टिस लोकांनीं त्या हुद्यावर कोणी तरी नेमिला पाहिजे. पांच हजारापेक्षां लोकसंख्या जास्त असली, तर आपलें राजमार्ग संबंधी काम करण्यासाठीं वेस्ट्रीस अधिकारी मंडल नेमतां येतें. हें मंडल ह्मणजे खरोखर वेस्ट्रीची एक कमिटीच आहे. अशा प्रकारचीं नऊ मंडलें आहेत असें समजतें.

२. १८६२व१८६४ सालच्या कायद्यांअन्वयें अनेक पारिश मिळून एक राजमार्ग प्रदेश करण्याचा अधिकार क्वार्टर सेशन्स सभेस मिळाला. त्या अधिकारावरून आठ हजार राजमार्ग पारिश मिळून सुमारें तीनशें सासष्ट राजमार्ग देशविभाग करण्यांत आले आहेत. या कायद्यांत ठरविलेली व्यवस्था येणेंप्रमाणें. त्या त्या देशविभागांत राहाणारे जस्टिस लोक आणि संयुक्त पारिशांपैकीं दरएकानीं निवडलेले मार्गरक्षक असे मिळून एक प्रत्येक विभागाचें राजमार्गमंडल ह्मणून असतें. या मंडलाचा एक खजाननीस, एक कारकून व एक सर्वेयर असला पाहिजे. आणि या शिवाय एक मदतनीस सर्वेयर त्यांना नेमण्याची मोकळीक आहे. राजमार्ग पारिशांत वेस्ट्री आणि सर्वेयर यांचें जें काम तें या देशविभागांत या मंडलाचें काम. खर्चाचा कांहीं हिस्सा एका समाईक फंडावर पडतो, आणि कांहीं निरनिराळ्या पारिशांवर. मि. राइट साहेब ह्मणतात कीं, "समाईकफंड निरनिराळ्या पारिशांच्या दीनार्थ कायद्यासंबंधीं आकारणीच्या मानानें त्यांनीं दिलेली वर्गणी मिळून बनतें. याप्रमाणें दरएक पारिशाकडून जी वर्गणी येणार ती, व त्या पारिशांकडून खुद्द आपल्या सडकांकरितांच ह्मणून जो पैसा मिळणार तो, हीं दोन्ही हुकुमाअन्वयें वसूल होत असतात. जर तो दीनार्थ कायद्यासंबंधी

पारिश नसला, तर हुकूम मार्गरक्षकांकडे रवाना होतो, आणि ते मग निराळा राजमार्ग कर बसवून लागेल ती रकम वसूल करितात. इतर ठिकाणीं, हुकूम प्रेक्षकांकडे रवाना होतो, आणि ते दीनार्थकरांतून भरणा करितात.

१८७८ सालच्या राजमार्ग कायद्यांत असें ठरविलें आहे कीं, एखाद्या राजमार्गसंबंधी देशविभागाच्या आणि आरोग्यसंबंधी जानपद देशविभागाच्या हद्दी एकच असल्या, तर जानपद आरोग्याधिकाऱ्यानां, ह्मणजे गार्डियनांनीं, राजमार्ग व्यवस्था आपल्या हातीं घेण्याकरितां कौंटी अंमलदारांस अर्ज करतां येतो. जर जस्टिस लोकांनीं तसा हुकूम केला, तर राजमार्ग मंडलाच्या ऐवजीं गार्डियन कामावर येतात, आणि राजमार्गसंबंधी अंमल सर्व त्यांचेकडे जातो. या कलमाप्रमाणें व्यवस्था किती ठिकाणीं झाली आहे तें कळत नाहीं.

वर लिहिलेल्या सर्व हकीकतीचा सारांश हा कीं, खेड्यापाड्यांत राजमार्ग देशविभाग हा राजमार्ग पारिश अथवा राजमार्ग प्रदेश असूं शकतो. आणि पारिश सर्वेयर, पारिशअधिकारि मंडल, अथवा गार्डियन, हे राजमार्गाधिकारी असूं शकतात. खेड्यापाड्यांतील सर्व राजमार्गासंबंधी हिशेबांचे तपासनीस हल्लीं स्थानिक व्यवस्था मंडलच आहे. १८८१ सालीं एकंदर खर्च अठरा लक्ष चौपन्न हजार पौंड झाला.

आरोग्यसंबंधी पौर प्रदेशांत आरोग्याधिकारी आणि राजमार्गाधिकारी हे एकच. पौराधिकारी ह्मटले ह्मणजे टौन कौन्सल, स्थानिकमंडल, अथवा सुधारणाधिकारिमंडल, हीं असूं शकतात, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. रस्ते गल्ल्यांवर त्यांचा अंमल वर दर्शविलाच आहे.

## २. प्रेतनिधान प्रदेश.

प्रेतनिधान स्थलांबद्दलच्या तजविजी संबंधी कायद्यांचा हल्लीं फारच घोंटाळा आहे. साधारण इंग्रजी कायद्याप्रमाणें पारिशांतील देवालयांगनांत प्रेतें गाडण्याचा जो हक्क आहे, त्याविषयीं वर उल्लेख केलाच आहे. लोकसंख्या वाढल्यामुळें हीं देवालयांगनें पारिशांच्या कामाला पुरत नाहीं अशी स्थिति झाली आहे. शिवाय शहरांमध्यें आरोग्यसंबंधी कारणांवरून देवाल-

यांगनांचा या कामाकरितां वापर बंद करावा लागतो. पारिशांतील देवालयांगनांचा वापर बंद करावा लागला, ह्मणजे दुसरी तजवीज तीन प्रकारानें होऊं शकते.

एक प्रकार असा कीं, पार्लमेंटसभेच्या विशेष कायद्याअन्वयें प्रेतनिधानस्थलें व्यापाराच्या रीतीनें चालतात. ह्या प्रकारच्या स्थलांची संख्या १८४७ सालीं देखील इतकी मोठी झाली होती कीं, विशेष कायद्यांत सामिल करण्याकरितां नमुन्याची कलमें तयार करून त्यांचाच एक कायदा करण्यांत आला होता. त्याचें नांव प्रेतनिधान कलमांचा कायदा.

दुसरा प्रकार हा कीं, १८७९ सालच्या एका कायद्या अन्वयें, या १८४७ सालच्या प्रेतनिधान संबंधी कायद्याचीं कलमें सार्वजनिक आरोग्यसंबंधी कायद्यांमध्यें सामील करण्यांत आलीं; तेणेंकरून आरोग्याधिकाऱ्यांना आपआपल्या हद्दींतल्या प्रजेकरितां, आणि त्या हद्दींमध्यें, अथवा कांहीं प्रसंगीं त्यां बाहेर देखील, प्रेतनिधानस्थल स्थापितां येतें, आणि त्याची मरामत करितां येते, व १८४७ सालच्या कायद्यांतलि सर्व अधिकार त्यांस बजावितां येतात. आणि यामुळें आतां एखाद्या बरो करितां, एखाद्या सुधारणासंबंधी देशविभागाकरितां, स्थानिकमंडलदेशविभागाकरितां, अथवा यूनियनांच्या शहरा बाहेरिल भागाकरितां, प्रेतनिधानस्थल स्थापण्याची तजवीज करितां येते.

तिसरा प्रकार असा कीं, १८९२ पासून १८७९ पर्यंत केलेले "प्रेतनिधान संबंधी कायदे" या नांवाची जी एक अकरा कायद्यांची मालिकाच लागून गेली आहे, त्या कायद्यांअन्वयें प्रेतनिधानस्थलें स्थापितां येतात. या कायद्यांतलि कलमें कोणत्याही पारिशाला अथवा टौनशिपाला अंमलांत आणितां येतात, आणि वस्तुतः त्या कलमा अन्वयें पांचशेंबावन्न प्रेतनिधान मंडलें स्थापिलीं गेलीं आहेत. या प्रेतनिधान मंडलांचे सभासद वेस्ट्री मंडळ्या निवडतात. त्यांत तीन पासून नऊ पर्यंत पारिशांतील कर भरणारे लोक असले पाहिजेत. सभासद हुद्यावर तीन वर्षें पर्यंत राहातात, आणि त्यांपैकीं एक तृतीयांश दरसाल हुद्दा सोडतात. जागा खालीं पडल्या, ह्मणजे वेस्ट्रीनें नेमणुका न केल्यास प्रेतनिधान मंडलाला त्या स्वतःभरतां येतात. प्रेतनिधान स्थलाक-

रितां पैसा देण्यास, होम सेक्रेटरी नामक प्रधानाच्या मंजुरीनें करांचें उत्पन्न मंडलाला गहाण ठेवितां येतें. त्या प्रेतनिधान स्थलाची व्यवस्था ठेवणें, व प्रेतें गाडण्याबद्दलची फी ठरविणें, हीं कामें होम सेक्रेटरीनें केलेल्या नियमांप्रमाणें बजाविणें मंडलाकडे आहे. अनेक पारिश मिळून एक गाडण्याचें स्थल स्थापूं शकतात. आणि आपणच नवीन प्रेतनिधान स्थल स्थापण्याऐवजीं, एखाद्या प्रेतनिधान मंडलाला दुसऱ्या कोणत्याही अधिकाऱ्यांचें स्थल वापरण्याबद्दल त्यांच्याकडे करार करून तजवीज करितां येते. टौनकौन्सल, अथवा दुसऱ्या एखाद्या आरोग्यसंबंधी पौर अधिकारि मंडलांनीं, आपल्या हद्दींत प्रेतनिधान मंडलाचे सर्व अंमल मिळविण्याविषयीं कांहीं भानगडीचीं कलमें कायद्यांत आहेत. १८७८ सालीं दीनार्थ कायद्यां संबंधी गार्डियनांविषयीं चौकशी करण्याकरितां नेमिलेल्या कमिटीनें आपला असा स्पष्ट अभिप्राय कळविला आहे कीं "पौर प्रदेशांत स्वतंत्र प्रेतनिधान मंडलें मुळींच असूं देऊं नये, आणि तशा प्रदेशांत कांहीं नवीन कार्यें व्हावीं असा कायदे करणारांनीं ठराव केला, ह्मणजे तीं कार्यें पूर्वीं असलेल्या अधिकाऱ्यांच्याच हातीं व्हावीं."

वर ज्या अधिकाऱ्यांचें वर्णन केलें आहे, त्यां खेरीज दुसरे ही कांहीं इंग्रजी प्रजेवर सत्ता चालविणारे अधिकारी आहेत. उदाहरण, इंग्लंड देशांत नळ बांधण्याकरितां मंडलें स्थापिलीं आहेत; त्याचप्रमाणें जमिनीच्या निथळणुके संबंधी कायदे केलेले आहेत, त्यासंबंधी अधिकारी आहेतच. पण ह्या विशिष्ट अधिकारांविषयीं, व प्रासंगिक अमलांविषयीं, येथें उल्लेख केल्या पासून तादृश व्यवहारोपयोगी फल तर होणार नाहींच, आणि वाचकाला घोंटाळ्यांत पाडल्यासारिखें मात्र होईल.

## भाग १० वा.

इंग्लंडदेशाची लंडन नामक जी राजधानी आहे तिच्या व्यवस्थेचें येथें वर्णन न केलें तर हल्लींचा निबंध अपुरता राहील हें उघड आहे. तरी अशा निबंधांत जितकी जागा त्या विषयास देतां येईल, तितक्या जागेंत लंडन शहरच्या व्यवस्थेचें वर्णन करणें केवळ अशक्य आहे. प्रथमतः तर राजधानीची हद्द ठरीव नाहीं; निदान निरनिराळ्या कार्यांच्या

संबंधानें ती हद्द बदलत असते. उदाहरण, पोलीस खात्याच्या संबंधाची हद्द आहे ती, व टपाल खात्याच्या संबंधाची हद्द, व साधारण व्यवस्थेच्या संबंधाची हद्द, या परस्पर भिन्न आहेत. पण बहुत करून राजधानी ह्मटली ह्मणजे, मेट्रॉपालिटन बोर्ड ऑव्ह वर्क्स ह्मणून जें सुधारणुकेच्या कार्याकरितां स्थापिलेलें व्यवस्थामंडल आहे, त्याच्या हद्दींतील प्रदेश समजतात.या राजधानीच्या व्यवस्थेमध्यें, इंग्लंडदेशांत इतर ठिकाणीं स्थानिक व्यवस्थेच्या संबंधानें जो घोटाळा आहे, त्यापेक्षां अधिक घोटाळा दृष्टीस पडतो. कारभाराची व्यवस्था स्पष्ट रीतीनें कायम केलेली अशी काय ती लंडन शहरांत मात्र दिसून येते. शहराचें क्षेत्रफळ सुमारें सातशें एकर आहे, आणि त्या शहरांत निजणाऱ्या लोकांची संख्या जवळजवळ पन्नास हजार आहे. नोंदणीच्या खात्याच्या संबंधानें लंडन या नांवाखालीं जो प्रांत येतो, तो सुमारें एकशेंवीस चौरस मैल भर अस्ताव्यस्त पसरलेला आहे. त्याची हद्द चार कौंटींत सांपडते, आणि त्यांतील लोकसंख्या अडतीस लक्ष चवदा हजार तीनशें एकाहत्तर आहे. लंडन शहराची व्यवस्था कायम करण्यास एकशेंवीस सनदा झाल्या आहेत; शिवाय पन्नास सामान्य कायदे, आणि विशेष कायद्यांची तर गणतीच नाहीं. शहरा बाहेरील जो राजधानीचा भाग, त्याच्या व्यवस्थेबद्दलही एकशेंवीस सामान्य कायदे झाले आहेत, आणि विशेष कायद्यांची गणती नाहीं. इतकें असूनही, राजधानीची व्यवस्था हल्लीं दिसत आहे इतक्या चांगल्या रीतीनें चालते, यावरून या अवाढव्य शहराच्या व्यवस्थापकांचे व्यवहारचातुर्य आणि सचोटी फार वर्णनीय आहेत. या अकटोविकट यंत्ररचनेमध्यें अडचणी वारंवार उत्पन्न होतात हें खरें आहे. पण वास्तविक पाहूं गेलें, तर तें यंत्र क्षणभर देखील चालूं शकतें, हीच मोठी आश्चर्य मानण्यासारखी गोष्ट आहे. राजधानींतील करांचें उत्पन्न पंचावन्न लक्ष पौंड होय. शिवाय तेथील व्यवस्था मंडलाला दस्तुरी वगैरे मिळून अवांतर उत्पन्न पंधरा लक्ष पौंड मिळतें. कर निरनिराळे प्रकारचे मिळून नऊ आहेत. कर बसविणारे स्वतंत्र अधिकारी किती आहेत, तें कोणत्याही सरकारी पत्रकावरून कळत नाहीं. राजधानीव्यवस्थामंडल, मेट्रॉपालिटन बोर्ड

ऑव्ह वर्क्स, आणि लंडन शालामंडल, यांखेरीज अठ्ठावीस गार्डियन मंडलें, आणि त्रेचाळीस वेंस्ट्री नामक संभूयकारीमंडळ्या व प्रांत व्यवस्थामंडलें आहेत. राजधानीच्या व्यवस्थेंत कांहीं बेतबात नाहीं, आणि त्याबद्दल जे कायदे करण्यांत आले आहेत त्यांत कांहीं ठरीव मूल सिद्धांत नाहींत, असें बहुत वेळां आपल्या कानांवर येतें, पण हे दोन्हीं आरोप सर्वांशी यथार्थ नाहींत. लंडनराजधानींतील व्यवस्थेची स्थिति शास्त्रीयदृष्ट्या आहे ती अशी. राजधानीच्यामध्यभागीं लंडन शहर ह्मणून एक आटोपशीर असा प्रदेश आहे. या शहराच्या भिंतीसभोंवार खेडयापाड्यांची मालिका लागून गेली आहे, आणि त्यांतील व्यवस्था इतर जानपद परिशा प्रमाणेंच बहुतेक असूं शकतें. हें दिसण्याला ठीक आहे, पण दुर्दैवाची गोष्ट ही कीं, या शास्त्रीयरूपाचा, आणि व्यवहारांत जी खरी हकीकत दिसून येते तिचा, बिलकूल मेळ मिळत नाहीं, आणि आजपर्यंत त्या वास्तविक हकीकतीची कोणी परवा ही करीत नसत. एखाद्या वेळेस फार फार गवगवा झालाच, तर कांहीं तरी उपाय योजीत असत, ह्मणजे तात्कालिक प्रसंग टाळण्यासाठीं एखादें नवीन अधिकारि मंडल तयार करीत असत, आणि पुढे कांहीं नाहीं. जुन्या वस्त्राला नवीन कायद्याचें ठिगळ लावण्याचा जो हा प्रकार, तो आजपर्यंत नीट नेमानें चालत आला आहे, आणि त्याचा परिणाम ही नेहमीं प्रमाणेंच झाला आहे. तेव्हां यामुळें लंडन शहरव्यवस्थेचें शिस्तवार वर्णन देणें, ह्मणजे एखाद्या विजातीय कंथापटाच्या रचनेचें वर्णन देण्यासारिखेंच कठीण होय. यास्तव या कंथारूप व्यवस्थेमध्यें ठळक ठिगळरूपी जीं स्थानिक अधिकारि मंडलें आहेत, त्यांचें वर्णन करावें इतकेंच काय तें शक्य आहे. पण या स्थानिक अधिकाऱ्यांविषयीं कांहीं लिहिण्या पूर्वीं त्यांच्या अंमलांबाहेर काय काय आहे तें सांगितले पाहिजे. राष्ट्रीय इमारती, आणि बहुत करून सर्व सार्वजनिक महोपवनें, हीं सार्वजनिक सुधारणा कामाचें जें खातें आहे त्याच्या देखरेखी खालीं आहेत. तें खातें स्थानिक नाहीं, राष्ट्रीय आहे. त्यांत कांहीं कायमचे अंमलदार असतात, व एक मुख्य कमिशनर ह्मणून असतो, तो पार्लमेंट सभेचा सभासद असून प्रधानमंडलाकडून नेमिला जातो. तो आपल्या पक्षाच्या मंडळी बरोबर कामावर येतो, व त्यांचे बरोबर

हुद्दा सोडतो. राजधानीचे पोलीसचे लोक सुमारें दहा हजार आहेत, तें होम सेक्रेटरीच्या हुकुमतींत असतात, व शहरचें पोलीस त्यां पासून भिन्न असतें. १८८१ सालीं राजधानीच्या पोलीसाचा खर्च अकरा लक्ष अठ्ठेचाळीस हजार पौंड होता, आणि शहरच्या पोलीसाचा खर्च फक्त एक लक्ष पौंड. लंडनांतील कांहीं भागांत जीं नाटकगृहें आहेत, त्यांना परवानें लार्ड चेंबर्लेन साहेबाकडून मिळतात, आणि त्यांचें नियमन त्यांच्याच कडून होत असतें. शहर खेरीजकरून राजधानीच्या बाकींच्या भागांत त्यांचें नियमन कौंटी जास्टिस लोकांकडून होत असतें. गाण्या बजावण्याबद्दलचें व नाचतमाशाबद्दलचे परवाने ठिकणा ठिकाणाप्रमाणें कौंटी जास्टिस किंवा शहरचे माजिस्ट्रेट यांचेकडून मिळतात. पाणी आणि दिव्याकरितां ग्यास यांचा पुरवठा करणें, बहुतकरून कायद्याअन्वयें प्राप्त झालेल्या विशेषाधिकारांनीं विशिष्ट अशा खासगी मंडळ्यांचे हातीं आहे.

दीनार्थ कायद्यासंबंधीं कारभार पुष्कळ अंशीं विशेष प्रकारचा आहे. हुद्याच्या नात्यानें कामावर असणारे व निवडलेले गार्डियन इतर ठिकाणीं असतात त्याप्रमाणें येथेंही असतातच, पण त्यांशिवाय कांहीं स्थानिकव्यवस्थामंडलानें नेमिलेले गार्डियनही असतात. जो कोणी जस्टिस ऑव्ह धी पीस असेल, किंवा यूनियनांत राहणारा व कर भरणारा असेल, तो त्या जागेवर नेमण्यास लायक असतो. पण त्यांत एक नियम आहे कीं, हुद्याच्या नात्यानें कामावर असणारे व नेमिलेले गार्डियन यांची संख्या, निवडलेल्या गार्डियनांच्या संख्येच्या एक तृतीयांशापेक्षां जास्त नसावी. १८६७ सालच्या एका कायद्याअन्वयें, जीं यूनियनें सधन आहेत त्यांच्याकडून निर्धन यूनियनांला मदत मिळावी, यास्तव साधारण दीनार्थ फंड ह्मणून एक स्थापिलें आहे. दर एक यूनियनानें अथवा यूनियन पारिशानें या फंडास किती पैसा द्यावा, याबद्दल पारिशाच्या आकरणींच्या यादीवरून स्थानिकव्यवस्थामंडल ठराव करतें. या फंडांतून जो खर्च होतो, तो मुख्यत्वेंकरून दीनोन्मत्त लोकांच्या तर्तुदीकरितां, ज्वरानें व देवीनें पीडिलेल्या लोकांस्तव हिस्पितळें स्थापणें व चालविणें याकरितां, दवाखान्यांतील नोकर लोकांच्या पगाराकरितां, देवी काढण्याकरितां, व जन्ममृत्यु नोंदण्याकरितां, होत असतो.

उन्मत्त व जड लोकांकरितां आश्रम, आणि संसर्गजन्य रोगांकरितां हिस्पितळें, बांधणें व त्यांची व्यवस्था ठेवणें, हीं कामें साधारण गार्डियन लोकांच्या स्वाधीन नाहींत, राजधान्याश्रममंडलाच्या स्वाधीन आहेत. हें मंडल संभूयकारिमंडल आहे. यांपैकीं कांहीं सभासद निरनिराळ्या यूनियनांच्या गार्डियनांनीं निवडले जातात, आणि कांहीं स्थानिक व्यवस्थामंडलाकडून नेमिले जातात. सभासदांची संख्या स्थानिकव्यवस्थामंडल ठरवितें. हल्लीं संख्या साठ आहे, पैकीं पंधरा नेमिलेले आणि पंचेचाळीस निवडलेले. नेमिलेल्या सभासदांची संख्या निवडलेल्या सभासदांच्या संख्येच्या एक तृतीयांशापेक्षां जास्त असूं शकत नाहीं. निवडलेले सभासद जे असतात, ते गार्डियन लोकांपैकीं अथवा यूनियनांतील राहणाऱ्या कर भरणारांपैकीं असून, गार्डियन लोकांनींच निवडले जातात. नेमिलेले सभासद हे जस्टिस ऑव्ह धी पीस, किंवा आश्रममंडलाच्या हद्दींत रहाणारे कर भरणारे, असले पाहिजेत. संसर्गजन्यरोगाकरितां पांच हिस्पितळें मंडलानें स्थापिलीं आहेत. पण आलिकडे जी देवीची सांत आली होती, त्याप्रसंगीं या हिस्पितळांच्या उपयुक्तपणाबद्दल चांगला ग्रह झालेला नाहीं. देवी आलेले पुष्कळ लोक एकत्र गोळा केल्यापासून काय परिणाम होतो त्याच्याबद्दल पूर्वीं कांहीं अनुभव नव्हता. या प्रसंगीं त्याचा परिणाम विनदिक्कत असा झाला कीं, आश्रमाच्या जवळच्या प्रदेशांत रोग फार पसरला. याविषयीं एका रॉयल कमिशनानें व स्थानिकव्यवस्थामंडलानें चौकशी केली आहे, त्या चौकशीवरून असें सिद्ध होतें कीं, साधारण संसर्गजन्य ज्वरांकरितां हिस्पितळें स्थापण्या पासून, व्यवस्था नीट ठेविल्यास, कांहीं धास्ती नाहीं, पण देवी आलेले लोक एकत्र केल्यापासून फार जोखीम आहे, आणि या करितां पुढें कांहीं तरी निराळी तजवीज योजिली पाहिजे. येथें एक विलक्षण दुःश्लिष्टरचनेचा प्रकार दर्शविला पाहिजे, तो हा कीं, संसर्गजन्य रोगा करितां हिस्पितळें स्थापणें, हे आरोग्य संबंधी काम असें गणलें जात नाहीं, तर दीनार्थ कायद्यासंबंधी काम असें गणलें जातें, आणि या हिस्पितळांची सर्व व्यवस्था आरोग्य संबंधी अधिकाऱ्यांस न विचारतां न पुसतां चालत असते.

अवघ्या राजधानींत एक शालामंडल आहे. मंडलांत पन्नास सभासद

आहेत, आणि राजधानीचे जे या कार्याकरितां भाग केले आहेत, त्यांनीं ते सभासद निवडले जातात. मंडलच अध्यक्ष नेमितें, आणि अध्यक्षाला पगार मिळतो. निरनिराळ्या भागांत सभासद निवडले जातात त्यांची संख्या येणे-प्रमाणें:—मेरिलीबोन सात, फिन्सबरी सहा, टावरहाम्लेट पांच, हाक्नी पांच, लंडनशहर चार, ग्रीनिच चार, वेस्टमिन्स्टर पांच, चेल्सी चार.

लंडनराजधानींतलि नळांची व्यवस्था, गल्ल्या पुलांची व्यवस्था, आग विझविणाऱ्या लोकांचें नियमन, आणि शहर सुधारणा करणें, हीं कामें मेट्रोपालिटन बोर्ड ऑव्ह वर्क्स नामक अधिकार मंडलाचे स्वाधीन आहेत. लंडन शहरांत मात्र या बद्दल कांहीं विशेष नियम आहेत. राजधानीव्यवस्थेच्या कायद्यां पैकीं पहिला कायदा जो १८९९ सालीं झाला, त्याअन्वयें हें मंडल स्थापण्यांत आलें. या मंडलाचे शेचाळीस सभासद आहेत, आणि त्यानां संभूयकारित्वाचा हक्क आहे. अध्यक्षाला सालीना दोन हजार पौंड पगार आहे. बाकीचे सभासद बिनपगारी आहेत. शहराकडून तीन सभासद निवडले जातात. बाकीचे सभासद, राजधानीच्या हद्दींत निरनिराळ्या वेस्ट्री आणि डिस्ट्रिक्टबोर्डसभा आहेत, त्या निवडतात. मंडलाचे सभासद तीन वर्षें पर्यंत हुद्यावर राहतात. पैकीं पाळीपाळीनें एक तृतीयांश हुद्दा सोडतात. हुद्दा सोडणारे लोक पुनः निवडतां येतात.

लंडन शहराबाहेर पण राजधानींमध्येंच समावेश पावणारे जे अठ्ठयाहत्तर पारिश आहेत, त्यांची व्यवस्था डिस्ट्रिक्टबोर्ड किंवा वेस्ट्री मंडळ्या यांचे हातून होत असते. तेवीस वेस्ट्री मंडळ्यांकडे एकेका मोठ्या पारिशाची व्यवस्था आहे, आणि पंधरा डिस्ट्रिक्टबोर्डांच्या हातीं संयुक्त पारिशांची व्यवस्था आहे. आपआपल्या हद्दींत आरोग्यसंबंधी आणि उपद्रव निरसनाविषयींची मुखत्यारी या वेस्ट्री व डिस्ट्रिक्टबोर्ड मंडळ्यांकडे आहे. याशिवाय गल्ल्यांतून दिवेबत्ती, फरसबंदी, पाणी शिंपणें, व साफसुफ करणें, या कामांची देखरेख त्यांच्याकडूनच होत असते. आणि मोठ्या नळांस जोडण्या करितां जे लहान लहान नळ बांधावे लागतात, तेही त्यांच्याच हातीं असतात.

लंडन राजधानींतल्या वेस्ट्री मंडळ्यांस संभूयकारित्वाचा हक्क आहे.

सभासदांच्या जागेस लायक होण्याला निदान सालीना चाळीस पौंड स्थानिक करांकरितां आकारणी असली पाहिजे. ते तीन वर्षे हुद्यावर राहातात. आणि त्यां पैकीं एक तृतीयांश दरसाल हुद्दा सोडतात. निवडणुकी मे महिन्यांत होतात. वेस्ट्रींतील सभासदांची संख्या पारिशांतील लोकसंख्येच्या मानानें कमी जास्त होत असते, पण एकशें वीस असामी पेक्षां जास्त कधींही असूं शकत नाहीं. उमेदवारांच्या नांवांची सूचना एकाकडून होऊन तिला अनुमोदन दुसऱ्याचें लागतें. जर रिकाम्या जागां पेक्षां उमेदवारांची संख्या अधिक असली, तर निवडणूक गुप्त लेखानें होते. पारिशांतील रेक्टर आणि देवालयरक्षक हे हुद्याच्या नात्यानें वेस्ट्रीचे सभासद असतात. वेस्ट्रीच्या हिशेबाच्या तपासाकरितां निवडलेले हिशेब तपासनीस असतात. डिस्ट्रिक्टबोर्डांचे सभासद संयुक्त पारिशांतील वेस्ट्री मंडळ्यांच्या सभासदांनीं निवडले जातात. आणि डिस्ट्रिक्ट बोर्डांची व एकएकट्या पारिशाच्या वेस्ट्रीची अधिकाररचना बहुतेकांशीं सारिखीच आहे.

लंडन शहराचें क्षेत्रफळ सुमारें एक चौरसमैल आहे. त्या हद्दीच्या आंत, मोठ्या नळांच्या कामाखेरीज बहुतेक सर्व कामांत, स्थानिक मुखत्यारी सर्व शहराच्या संभूयकारी मंडळीकडे आहे. तितक्या हद्दींमध्यें त्यांची व्यवस्था कार्यसिद्धीस पुरेशी नाहीं, असें कोणाच्यानेंही प्रतिपादन करवणार नाहीं. शहराचें पोलीस आणि कोर्टें स्वतंत्र आहेत. लंडन बंदरांत आरोग्य संबंधी कारभाराचें काम त्यांच्याच हातीं आहे. आपल्या हद्दींपासून सात मैलांच्या अंतरापर्यंत बाजार भरवण्याचा अनन्योपभोग्य हक्क त्यांचा आहे. आणि लंडन बंदरांत किंवा राजधानीच्या हद्दीमध्यें येणारा सर्व दाणादुणा, कोळसा, व पिण्याची दारू, यांवर कांहीं दस्तुरी वसूल करण्याचा हक्क त्यांनां आहे.

संभूयकारी मंडळीचा कारभार तीन सभांच्या मार्फत चालत असतो; एक, कोर्ट ऑव्ह आल्डर्मेन, दुसरी, कोर्ट ऑव्ह कॉमन कौन्सल, आणि तिसरी, कोर्ट ऑव्ह कॉमन हाल. या तिन्हीं सभांत लॉर्ड मेयरसाहेब अध्यक्ष असतात. कोर्ट ऑव्ह आल्डर्मेन मंडळीचे लॉर्ड मेयर धरून सव्वीस सभासद असतात. शहराचे सव्वीस पोटविभाग आहेत, त्यांपैकीं चोवीस विभागांकडून एक एक

आल्डर्मन निवडला जातो. बाकीचे दोन विभाग मिळून एक आल्डर्मन निवडतात; आणि राहिलेल्या सव्विसाव्या आल्डर्मनाकरितां एक नांवाचा पोटविभाग मानितात, त्याच्या तर्फेनें तो सभासद असतो. ही सव्विसावी जागा, बहुतकरून आल्डर्मन लोकांपैकीं ज्याची नेमणूक सर्वांत प्रथम झाली असेल, त्याला देण्याचा प्रघात आहे. आल्डर्मन ताहयात हुद्यावर राहतात; ते हुद्याच्या नात्यानें फौजदारी न्यायाधीश असतात; आणि त्यांपैकीं एक एकल्याला पेटी सेशन सभेंत बसणाऱ्या जस्टिस लोकांचे अधिकार असतात. कोर्ट ऑव्ह आल्डर्मन हेच रिकार्डर नांवाचा जो न्यायाधीश असतो त्याची नेमणूक करितात, व दलाल लोकांस धंदा चालवण्यास परवाने देतात. कारभारांत पैशासंबंधी सत्ता त्यांच्याकडे बरीच असते.

कोर्ट ऑव्ह कॉमन कौन्सल यांचेकडे मुख्यत्वेंकरून कायदे कानू करण्याचें व कार्यें बजाविण्याचें काम असतें. त्यांतील सभासद ह्मणजे, सव्वीस आल्डर्मन, आणि निरनिराळ्या पोटविभागांनीं निरनिराळ्या मानानीं दरसाल निवडलेले दोनशें चाळीस इतर सभासद, असे असतात. या पोटविभागांच्या निवडणुकींत संमति देणारे शहरवासी असले पाहिजेत असा निर्बंध नाहीं, पण त्यांची राजधानींत अमुक एक ठरीव किंमतीची मिळकत असली पाहिजे, ह्मणजे ते संमति देण्यास लायक होतात. या कोर्टाचें बहुतेक काम लहान लहान कमिट्यांच्या हातून होत असतें. त्यां कमिट्यांपैकीं मुख्य नळप्रेक्षक कमिटी होय. तिचें काम ह्मटलें ह्मणजे शहरांतलि फरसबंदी, दिवेबत्ती, व गल्ल्यांची सर्व व्यवस्था यांची देखरेख ठेवणें हें होय. बहुतेक शहरचे अंमलदार निवडण्याचें काम या कॉमन कौन्सलाच्याच हातीं आहे. १८३७ सालीं नेमिलेल्या कमिशनानें असें दाखवून दिलें आहे कीं, "शहराच्या पैशावर कोर्ट ऑव्ह आल्डर्मन आणि कोर्ट ऑव्ह कॉमन कौन्सल अशा दोन स्वतंत्र मंडळ्यांना अमर्यादित सत्ता आहे." पण या दुःश्लिष्टत्वामुळें कांहीं व्यवहारांत गैरसोई झाल्याचें दिसून येत नाहीं.

कोर्ट ऑव्ह कॉमन हॉल यांचें काम कांहीं अंमलदार निवडण्याचें इतकेंच आहे असें दिसतें. या अंमलदारांपैकीं मुख्य लॉर्ड मेयर, शेरीफ, आणि चेंबर्लेन हे होत.

शहरवासीपणाचे हक्क काय ते, सदुसष्ट लिवरी कंपन्या ह्मणून आहेत, त्यांच्या सभासदांसच आहेत. त्या सभासदांपैकीं कोणालाही आपला विशेषाधिकार दाखवून शहरवासी लोकांच्या यादींत आपलें नांव नोंदवितां येतें.

ज्या आल्डर्मन लोकांनीं शेरिफाचें काम केलें असेल, त्यांपैकीं एकजण लॉर्ड मेयरच्या हुद्यावर नेमण्यांत येतो. कोर्ट ऑव्ह कॉमन हॉल यांचेकडून दोघे आल्डर्मन, त्या कामावर नेमण्यास लायक आणि काम पत्करण्यास कबूल असणारे, अशांच्या नांवांची सूचना होत असते. हे बहुत करून सर्वांमध्यें आगोदर नेमलेले असेच असतात, आणि मग त्यांपैकीं कोर्ट ऑव्ह आल्डर्मन एकाला पसंत करतें, आणि बहुत करून त्यां दोघांपैकीं जो अगोदर नेमिलेला असेल तोच पसंत केला जातो. लॉर्ड मेयर हा शहरांत मुख्य फौजदारी न्यायाधीश असतो, आणि शहराच्या सर्व कारभारांत, व सार्वजनिकसंबंधाच्या इतर सर्व कार्यांत, त्यानें प्रमुख असावें, असा साधारण समज आहे. ज्या सालीं तो हुद्यावर असतो, त्या सालीं तो मान्शन हौस इमारतींत राहून शहराच्या तर्फेनें लोकांचें आदरातिथ्य करीत असतो. ज्या वर्षीं तो हुद्यावर असतो, त्यावर्षांत त्याला दहा हजार पौंड पगार आहे.

शेरीफ आणि हिशेब तपासनीस यांच्या कामांविषयीं येथें कांहीं लिहिण्याची जरूर नाहीं. हुद्याच्या नांवांवरूनच त्याचें काम काय तें कळतें. चेंबर्लेन ह्मणून जो अंमलदार आहे, तो शहराच्या संभूयकारी मंडळीचा खजाननीस होय. रिकॉर्डर हा मुख्य फौजदारी कोर्टांतील एक न्यायाधीश, आणि मेयराच्या कोर्टाचा मुख्य न्यायाधीश असतो. शहराच्या हद्दींमध्यें या मेयराच्या कोर्टाला दिवाणी कामांत संपूर्ण अधिकार आहे. नायब रिकॉर्डराला कॉमन सार्जंट ह्मणतात. त्याची नेमणूक कोर्ट ऑव्ह कॉमन कौन्सलाकडून होते, आणि साधारण कौंटी कोर्टाचा अधिकार चालविणारें जे सिटी ऑव्ह लंडन कोर्ट ह्मणून आहे, त्यांतील न्यायाधिशाची नेमणूक ही तेंच कॉमन कौन्सल करितें. अशा निवडणुकीनें न्यायधिशांच्या नेमणुका करणें हें शास्त्रीयदृष्ट्या चांगलें नव्हे. पण आजपर्यंत ज्या नेमणुका झाल्या आहेत त्या बहुधा नेमणूक करणाऱ्यांस

भूषणप्रदच झाल्या आहेत इतकें खचित आहे. तरी कांहीं प्रसंगी या गोष्टीस अपवाद ही आले आहेत असें कबूल केलें पाहिजे.

या खेरीज मोठे अंमलदार कॉमन कौन्सलाकडून नेमिले जातात, ते टौनक्लार्क, रिमेंब्रन्सर, आणि सिटीकॉरोनर हे होत. शहराच्या संभूयकारिमंडळीवर दुसऱ्या कोणाचाही अधिकार नाहीं. हिशेब तपासणी देखील इतर अधिकाऱ्यांकडून होत नसते. मेट्रॉपॉलिटन बोर्ड ऑव्ह वर्क्स यांच्या हुकुमतीच्या बाहेर त्यांच्या स्वातंत्र्यास मुळींच व्यत्यय नाहीं.

याप्रमाणें राजधानींतील बहुतेक स्थानिक अधिकाऱ्यांबद्दलचें विवेचन झालें. पण तेथील राज्यव्यवस्थेचें संपूर्ण वर्णन करणें झाल्यास, आणखी पुष्कळ लहान लहान अंमलदारांविषयीं माहिती दिला पाहिजे. तसें वर्णन या निबंधांत कर्तव्य नाहीं, ह्मणून इतक्यावरच आटोपतें घेतों.

## भाग ११ वा.

स्थानिक अंमलदारांचें हुजुराकडून जें नियमन होत असतें, तें मुख्यत्वें करून स्थानिकराज्यव्यवस्थामंडल नांवाच्या एका नवीन खात्याच्या मार्फत होत असतें. शिक्षणसंबंधी सर्व कारभारांत, शालामंडलें व शालांत मुलें आणणाऱ्या कमिट्या, राणीसाहेबांच्या प्रिवी कौन्सलांतील शिक्षण खात्याच्या सत्ते खालीं असतात; पण द्रव्यसंबंधी सर्व कारभारांत, मुख्यत्वें करून स्थानिकव्यवस्थामंडलाचीच सत्ता त्यांचेवर चालते. जनावरांच्या संसर्गजन्य रोगांसंबंधी कामांत मुख्य नियामक अधिकारी प्रिवी कौन्सलच असतें. आणि स्थानिक कार्यांसाठीं उसने पैसे काढण्याच्या संबंधानें मंजूरी हुजूर जामदारखान्याच्या अधिकाऱ्यांकडून घ्यावी लागते. विद्युद्दीप संबंधी कायद्याअन्वयें जे स्थानिक मंडलांनां परवाने लागतात, ते राष्ट्रीय व्यापारमंडलाच्या अधिकारांत आहेत. पण हे केवळ अपवाद आहेत. साधारणतः स्थानिक कारभाराची देखरेख आतां सर्व स्थानिकव्यवस्थामंडलाच्या हातीं आलेली आहे.

१८७१ सालापूर्वी अशी स्थिति नव्हती. त्यावेळीं हुजुराकडील देखरेख हुजुराकडील निरनिराळ्या खात्यांतून चालत असे, आणि त्या खात्यांमध्यें परस्पर विचारपूस करण्याबद्दलची कांहीं ठरीव व्यवस्था नसे. अशा

स्थितींत सर्व कारभारांत घोंटाळा व अस्थिरपणा असावा हें सहजिकच आहे. १८६९ सालच्या रॉयल सानिटरी कमिशनानें, यासंबंधी दोष काय होते, व त्यांचा परिहार कसा करावा, याविषयीं असें लिहिलें आहे:– "कारभाराची व्यवस्था स्थानिक अंमलदारांच्या हातीं कितीही ठेविली, तथापि स्थानिक अधिकाऱ्यांमध्यें सर्वत्र आपआपल्या कामाविषयीं हुशारी राखण्याकारितां, ह्मणजे जास्त कौशल्य व माहितीची जरूर लागली तर त्याप्रसंगीं मदत देण्याकरितां, व सर्व साधारण देखरेखीच्या संबंधाची निरनिराळीं कार्यें बजाविण्याकारितां, एक प्रधानाधिकारी असणें नेहमी जरूर पडणार आहे. हल्लीं आरोग्यरक्षण संबंधाचे जे प्रधानाधिकारी आहेत, त्यांचें काम चांगल्यारीतीनें होत नाहीं याची कारणें उघड आहेत.

( १ ) एक हें कीं, अधिकारांचें समाहरण नाहीं. ह्मणजे स्थानिक व्यवस्थेच्या संबंधाचीं साधारण कामें होमडिपार्टमेंटच्या स्थानिकस्वराज्य कायद्यासंबंधी खात्याकडे जातात; रोगप्रतिबंधाचीं कामें प्रिवीकौन्सलाकडे जातात; आणि बाकीचीं कामें तिसऱ्याच ठिकाणीं, ह्मणजे व्यापार मंडलाकडे, जातात.

( २ ) दुसरें असें कीं, या कामाकारितां सर्व साधारण असे अंमलदार नाहींत, ह्मणजे नेहमीच्या देखरेखीला मुळींच अंमलदार नेमिलेले नाहींत, आणि प्रासंगिक देखरेखी करितां देखील फारच थोडे आहेत.

( ३ ) सर्व देशांतील हुजुराकडले व स्थानिक अंमलदार यांच्यामध्यें जशी नेमानें परस्पर विचारपूस करण्याची शिस्त असावी तशी नाहीं. तेव्हां अशा स्थितींत, एक सर्वसाधारण अधिकारी नेमून त्याला योग्य प्रकारची सत्ता देण्याकारितां कायदा झाला पाहिजे. प्रधान मंडलांत एक सर्वमान्य अंमलदार असावा, आणि त्याच्या हातीं पूर्ण सत्ता असावी. ती सत्ता ह्मणजे सर्व कारभार आपल्या हातीं ओढून घेण्यासाठीं नव्हे, तर स्थानिक उद्योगाला उत्तेजन देण्यासाठीं असावी. ह्मणजे तो अंमलदार खरोखर उद्योगप्रवर्तक, आणि सगळ्या देशांतील आरोग्यसंबंधी स्थानिक अधिकाऱ्यांनां मदत व मसलत मिळण्याकारितां प्रमाणीभूतगुरु, असा होईल. या आरोग्यसंबंधी कामांत प्रतिबंधकें पुष्कळ आहेत. एक तर

आळस; दुसरें आपणावरच कर बसवून घेण्याविषयीं विमुखपणा; तिसरें शास्त्रीय सिद्धांतांवर बेभरंवसा; आणि चवथें आरोग्यसंबंधी कायदे बजाविणाऱ्या स्थानिक अधिकारि मंडलांत जे लोक मुख्यत्वेंकरून सभासद अवश्य असणारच, त्यांच्या मधलि सुद्धां काहींकांचे हित ते कायदे मोडण्यांत असतें, हें. या सर्व प्रतिबंधांचें निरसन करणें फार आवश्यक आहे."

या सूचनांच्या अनुरोधानें १८७१ सालीं कायदा* करण्यांत आला. त्या कायद्यांत स्थानिकव्यवस्था, सार्वजनिक आरोग्य, व दीनांची तर्तुद, या संबंधी कायद्यांची सर्व देखरेख एका सरकारी खात्यांतून व्हावी हें इष्ट आहे, असा उपक्रम करून, पुढें एक स्थानिकराज्यव्यवस्थामंडल स्थापण्या विषयीं कलम घातलें आहे. त्या मंडलांतले सभासद येणें प्रमाणें:—एक अध्यक्ष, तो राणीसाहेबानीं नेमावा, व त्याची हुद्यावर राहाण्याची मुदत राणीसाहेबांच्या मर्जीपर्यंत असावी. काहीं हुद्याच्या नात्यानें असणारे सभासद, ह्मणजे कौन्सलाचे अध्यक्ष साहेब, सर्व स्टेट सेक्रेटरी, प्रिवीसीलावरील अंमलदार, आणि राष्ट्रीय जामदारखान्यावरील मुख्य अधिकारी. यांपैकीं हुद्याच्या नात्यानें असणाऱ्या सभासदांना पगार नाहीं; अध्यक्षाला पगार आहे. शिवाय अध्यक्ष, आणि मंडलाच्या चिटणीसांपैकीं एकजण, हे नेहमी पार्लमेंट सभेचे सभासद असण्याविषयीं कलम आहे; आणि वस्तुतः आजपर्यंत अध्यक्ष नेहमीं प्रधान मंडलातलेच असे नेमण्यांत आले आहेत. अवघ्या मंडळीची सभा बहुतकरून कधींच भरत नाहीं. राष्ट्रीय संबंधाच्या गोष्टी नेमानें प्रधान मंडलापुढें येतातच. पण सर्व कारभार अध्यक्ष आणि चिटणीस हेच चालवितात. आणि कायद्याचाही उद्देश अशाच प्रकारचा असावा असें दिसतें. कारण एक कलम असें आहे कीं, स्थानिक

---

*हा कायदा व्हिक्टोरिया राणीच्या कारकीर्दीच्या ३४–३५सालीं झालेल्या कायद्याचा भाग सत्तरावा होय. त्या नंतर आणखी अंमल व कामें स्थानिक राज्यव्यवस्था मंडलांकडे सोंपविण्याकरितां कायदे झाले आहेत; उदाहरण, स्थानिक कर पत्रकांचा कायदा १८७७ सालचा; हिशेब तपासनिसांचा कायदा १८७९ सालचा, आणि आल्कलीसंबंधी कायदा १८८१ सालचा.

व्यवस्था मंडलानें योग्य दिसल्यास आपल्या हुद्याचें नांव व शिक्का हीं कायम करावीं, आणि कांहीं काम कर्तव्य असलें किंवा एखाद्या खतावर सही करणें असलें, तर तें काम व ती सही मंडलाच्या नांवानें करण्याचा अधिकार अध्यक्षास आहे, व मंडलाच्या साधारण हुकुमानें सत्ता दिलेली असल्यास चिटणीस किंवा दुय्यम चिटणीस यांसही आहे.

या कायद्यावरून, जुन्या दीनजनसंबंधी व्यवस्था मंडलाचे अधिकार व कर्तव्यें; देवी काढणें व रोगप्रतिबंध या संबंधाचे प्रिवी कौन्सलाचे अधिकार व कर्तव्यें; सार्वजनिक आरोग्य, नळ व इतर आरोग्य संबंधी कार्यें, हमामखाने व धोब्यांचे कारखाने, सार्वजनिक व शहरांतील सुधारणा, कारागीर व मजुर लोकांची घरें, स्थानिक व्यवस्था, स्थानिक पत्रकें, आणि स्थानिक कर, या संबंधाचे होम हापिसाचे अधिकार व कर्तव्यें; हीं सर्व स्थानिक व्यवस्था मंडलाला दिलीं आहेत. या मंडलाकडून पार्लमेंट सभेस दरसाल रपोट जात असतो, आणि स्थानिक कर, खर्च, कर्ज, आणि नवीन उसनवार काढलेले पैसे, यांविषयीं सविस्तर पत्रकेंही देण्यांत येतात.

मंडलांच्या कामांचे तीन वर्ग करितां येतात. ह्मणजे सल्ला देणें, कारभारासंबंधी नियमन करणें, आणि द्रव्यसंबंधी नियमन करणें. हीं कामें बजाविण्याकरितां मंडलाच्या हाताखालीं सरकारी कचेऱ्यांतील सामान्य नोकरांशिवाय, वैद्य, शिल्पशास्त्री, व इंजिनेर असे असतात; त्यांचे कडून शास्त्रीय अथवा कलाविशेषसंबंधी पुसतपास करण्यांत येते. आणि त्यांचे वैद्यक व सार्वजनिक आरोग्य या संबंधाचें खातें रॉयल सोसाइटीच्या एका प्रख्यात सभासदाच्या देखरेखी खालीं आहे.

आतां मंडलाकडे सल्ला मागणाऱ्या निरनिराळ्या अधिकाऱ्यांनां योग्य सल्ला मिळण्यास, एका गोष्टीची फारच जरूर, ती ही कीं, त्या मंडलाला माहिती सर्व प्रकारची भरपूर असली पाहिजे. यास्तव स्थानिक अंमलदारांकडून सर्व प्रकारचे रपोट पत्रकें वगैरे मागण्याची त्यांना मोठी सत्ता दिलेली आहे. दर वर्षास त्यांच्या निरनिराळ्या खात्यांत देश स्थितीविषयींच्या माहितीचा एक प्रचंड पूरच वाहत असतो. एकदां सर चार्लस डिल्क साहेबांनीं, आपल्याला पार्लमेंट सभेंत ज्यांनीं निवडून पा-

ठविलें त्यांचे समोर भाषण करितानां, या मंडलाच्या कामाचें वर्णन केलें, त्यांत त्यांनीं असें सांगितलें कीं, त्या मंडलापाशीं अशा माहितीचीं पत्रकें अजमासें एक कोट असावीं. अशी मिळविलेली जी माहिती, तिचा तपास करून पडताळा पाहणें, तिचें वर्गीकरण वगैरे व्यवस्था करणें, आणि तिच्याविषयीं रपोट करणें, हें मंडलाचें काम आहे. या खेरीज, कोठें रोग उत्पन्न झाला किंवा आरोग्यसंबंधी कायद्यांत कांहीं अडचण अथवा न्यूनता दिसून आली, तर त्यांविषयीं स्थानिक चौकशी करण्याचें काम त्यांचें आहे. आणि अशा चौकशीचा खर्च त्यांना स्थानिक करांतून घेतां येतो. उदाहरणार्थ आलिकडे हालिफाक्स व बांगॉर येथें ज्वराची सांथ आली होती; टेम्सनदींतील एका गलबतावर कांहीं रोग उत्पन्न झाला होता; फुल्हम येथील हिस्पितळांतून देवीच्या रोगाचा प्रसार होतो ह्मणून कांहीं लोकांत गवगवा झाला होता; किंवा देवी नीट न काढल्यामुळें नॉरिच शहरांत कांहीं लोक मेल्याबद्दल बातमी निघाली होती; या सर्व गोष्टीं संबंधी मंडलानें त्या त्या स्थानीं चौकशी करविली. अशी चौकशी करण्यास शास्त्रांत फार प्रवीण झालेल्या वैद्यांची योजना होत असते. आणि त्यांच्या कडून जे रपोट येतात, ते रपोट ज्या स्थानिक अधिकाऱ्यांवर प्रसंग आलेला असतो, त्यांस सल्ला देण्यासच उपयोगी पडतात असें नाहीं, तर त्यांची शुद्ध शास्त्रीय दृष्ट्याही मातबरी फार आहे. या रीतीनें स्थानिक मंडलापाशीं जी माहिती जमत आहे, तिच्या योगानें कांहीं कालानंतर आरोग्य शास्त्रांतील पुष्कळ गूढें उकलण्यास मोठींच मदत होणार आहे. शिवाय आपल्या कामगिरी संबंधी वैद्यक शास्त्रांतील एखाद्या मुद्यावर विशेष तपास चालविण्याकरितां खर्च करण्याचाही अधिकार त्या मंडलाला आहे. आणखी या मंडलाचें मोठ्या उपयोगाचें, पण फार थोड्या लोकांस माहित असणारें, असें एक काम आहे. तें स्थानिक कायद्यांबद्दल सरकारास सल्ला देणें हें होय. सर चार्ल्स डिल्क साहेबांनीं असें ह्मटलें आहे कीं, खासगी संबंधाच्या दर एक खासगी कायद्याच्या मसुद्यावर स्थानिक मंडलाला रपोट करावा लागतो. हे जे खासगी कायदे ह्मणून ह्मणतात, त्यांत किती खासगी हक्कांस बाध येतो, हें फार थोडे लोकांस ठाऊक असेल.

पार्लमेंटसभेच्या सर्व सभासदांस ही गोष्ट माहित आहेच, पण साधारण जन समाजास माहित नाहीं, कीं सार्वजनिक कामाकरितां हौस ऑव्ह कामन्ससभेची तयारी होण्या पूर्वीं खासगी कायद्यांचे मसुदे त्यांचे पुढें विचाराकरितां येत असतात. या खासगी कायद्यांच्या मसुद्यांचा विचार हौस ऑव्ह कामन्स सभेकडून करविण्यास सभासदांना सवड फार विरळ मिळते. आणि सार्वजनिक कायद्यांच्या मसुद्यांचा मात्र विचार करविण्याला, ते पसार होण्यास हरकती आणण्याला, किंवा मुळींच पसार न होऊं देण्याला, सवडी पाहूं गेलें तर फार, किंबहुना फाजील, आहेत असें दिसून येईल. खासगी कायद्यांचे मसुदे छापून सर्व सभासदांकडे वाटले जात नाहींत, आणि प्रती पाहिजे असल्यास पार्लमेंट सभेच्या कचेरींत मागितल्या शिवाय मिळत नाहींत. खासगी कायद्यांत कांहीं कलमें असतात त्यांविषयीं मुळींच पुसतपास देखील होत नाहीं. पण तींच कलमें सार्वजनिक कायद्यांत असूं द्या, ह्मणजे त्यांच्याविषयीं मोठी हरकत निघाल्या शिवाय कधीं राहणार नाहीं. खासगी कायद्यांत पैसे कर्जाऊ काढण्याबद्दल कायदेकानू वगैरे फारच महत्वाच्या गोष्टी असतात. या सर्व कायद्यांच्या मसुद्यांचा तपास करून त्यांवर रपोट करण्याचें काम स्थानिक राज्यव्यवस्थामंडलाचें आहे." स्थानिक अंमलदारांनां केव्हांही त्या मंडलाची सल्ला मागण्याचा अधिकार आहे, आणि हिस्पितळें बांधण्याच्या कामांत सल्ला देणें, आणि स्थानिक आरोग्याधिकारी वैद्यांकडून आलेल्या रपोटांचा विचार करून त्यांवर अभिप्राय देणें, हें मंडलाचें विशेषें करून काम आहे.

निरनिराळ्या स्थानिक अधिकाऱ्यांच्या कारभारांत स्थानिक व्यवस्था मंडलाचें नियमन सारिखेंच असतें असें नाहीं. हें पूर्वींच दर्शविलें आहे. दीनजन तर्तुदींच्या कामांत नियमन पूर्णपणें चालतें. यूनियनें नवीन स्थापणें, जुनीं बंद करणें, किंवा अनेक यूनियनें सामील करून एक यूनियन स्थापणें, आणि गार्डियनांच्या बारीक सारीक कार्यांमध्यें देखील कारभाराचें नियमन करणें, हें सर्व त्यांच्या सत्तेंतलें काम आहे. म्युनिसिपालिट्यांवर स्थानिक व्यवस्थामंडलाचें साक्षात् नियमन नाहीं. त्यांना पैसे उसने काढायचे असले, ह्मणजे मात्र त्यांवर अटी बसविण्याचा हक्क स्थानिक व्यवस्थामंडलाला आहे. आरोग्यसंबंधी अधिकाऱ्यांवर त्यांची सत्ता ब-

रीच चालते, हें वर दाखविलेंच आहे. कारण, आरोग्य रक्षणार्थ तजवि-जी, आपल्या पसंतीस उतरतील अशा रीतीनें, त्यांच्याकडून मंडलाला करवितां येतात. तसेंच आरोग्याधिकाऱ्यांबद्दलचे स्थानिक कायदे दुरुस्त करणें, बदलणें, किंवा अजीबात रद्द करणें, इतकी सर्व सत्ता त्यांनां आ-हे. हें खरें आहे कीं, याबद्दलचे हुकुम प्रथमतः कायमचे नसतात, त्यां-नां पार्लमेंट सभेची मंजुरी लागते. पण ती मंजुरी बहुत करून मिळ-तेच मिळते. शिवाय आरोग्यसंबंधी अंमलदारांनां लागणारी जमीन मालकांकडून जबरीनें विकत घेण्याचा अधिकार, त्या अंमलदारांनां स्थानिक व्यवस्था मंडल प्रासंगिक हुकुमानें देऊं शकतें. त्याच रीतीनें, स्थानिक मंडल अजीबात बंद करणें, किंवा त्यांच्या हद्दींत फेर-बदल करणें, हें ही त्यांच्या सत्तेंतलेंच काम आहे. १८७९ सालच्या सार्वजनिक आरोग्य संबधी कायद्याअन्वयें, स्थानिक अधिकाऱ्यांनीं केलेल्या कानूंचा तपास करून, त्यांत फेरबदल किंवा दुरुस्ती तें मंडल करीत असतें. मंडलानें नामंजूर केलेल्या नियमांचीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत. एक नियम असा कीं, गांवांमध्यें कोणी मुलांनीं दगड फेंकूं नये; दुसरा, रस्त्यांतून कोणीही गीतें गात जाऊंनये; तिसरा, गांवांत परस्थ लोकांनी कुत्रीं आणूंनये; चवथा, रविवारीं दुपारीं रिकामटवळेपणानें हिंडूं नये; हे सर्व नामंजुर झाले आहेत. कालव्यांतिल होड्यां बद्दलचा कायदा, नदीकलुषीकरणप्रतिबंधाचा कायदा, आणि आल्कलीसंबंधी कायदा, यांचा अंमल कसा चालतो त्याचा तपास ठेवणें, हें विशेषें करून स्थानिक राज्यव्यवस्थामंडलाच्या देखरेखी खालीं आहे. पौर आरोग्याधिकाऱ्यांचे कांहीं अथवा सर्व अधिकार खेड्या पाड्यांतील अधिकाऱ्यांस देण्याला मंडल मुखत्यार आहे. आणि रोगांची सांत आली असतां, व्यवस्था करण्याला मंडलास विशेष सक्तीची सत्ता आहे. तशा प्रसंगीं, प्रेतें जलदीनें गाडण्याविषयीं, घरोघर तपास करण्याविषयीं, व इतर जरूरीच्या व्यवस्था करण्याविषयीं, त्यांनां तजवीज करितां येते. बंदरें किंवा धक्के बांधण्याशिवाय दुसऱ्या सर्व स्था-निक सार्वजनिक कामाकरितां पैसे उसनें काढणें झाल्यास, पार्लमेंटसभेनें केलेल्या विशेष कायद्यांत सत्ता दिलेली नसली, तर मंडलाची मंजुरी

घ्यावी लागते. १८८२ सालच्या रपोटांत मंडलानें ह्मटलें आहे कीं, "गुदस्तसालीं कर्जाऊ पैसे काढण्यास आह्मीं मंजुरी दिली, ती मुख्यत्वेंकरून खालीं लिहिलेल्या कामां करितां होती; रस्ते बांधणें व रूंदकरणें, आणि त्यांत फरसबंदी व पाण्याला वाटा करणें; कचेऱ्या, सार्वजनिक हमामखाने, परटांचे कारखाने, पूल, दिव्याच्या ग्यासाचे कारखाने, मार्किटें, हिस्पितळें, व दर्याकिनाऱ्यावर शत्रुनिवारणोपायार्थ तटबंदी वगैरे बांधणें; करमणुकेचीं स्थलें, प्रेतनिधान स्थलें, कसाईखाने, खत ठेवण्याचीं स्थलें, यांबद्दलची तजवीज करणें; आणि मल नेण्याकरितां व केरकचरा सफाई करण्याकरितां कारखाने बांधणें. ह्या कामांकरितां पैसे काढण्यास मंजुरी मिळावी ह्मणून जे अर्ज आमच्याकडे आले, त्यांचा निकाल करितांनां आह्मीं आमचा नेहेमीचा क्रम सुरू ठेवून, कोणकोणत्या कामांकरितां पैसा पाहिजे होता याविषयीं फार बारकाईनें तपास केला. शिवाय जीं जीं कामें करावयाचीं ह्मणून अर्जांत लिहिलें होतें, त्या त्या कामाचे नकाशे व तपशीलवार अजमास पत्रकें आमच्याकडे आलीं होतीं, आणि तीं कामें आवश्यक व त्यात्या ठिकाणास योग्य आहेत, आणि अजमास केलेला खर्च फाजील नाहीं, अशी आमच्या मनाची खात्री झाल्याखेरीज आह्मीं मंजुरी दिली नाहीं." याशिवाय, अन्न मिसळणूकी बद्दलचे कायदे स्थानिक अधिकाऱ्यांनीं नीट रीतीनें अंमलांत आणावे, याबद्दल बंदोबस्त करण्याचें काम या मंडलाचें आहे. मुख्यत्वें करून लहानसान शहरांत, पण कांहीं अंशीं इतर ठिकाणींही, हा बंदोबस्त ठेवणें अंमळ बिकट काम आहे. मंडलानें ह्मटलें आहे कीं, "एका ठिकाणीं टौनकौन्सल प्रथमारंभी आपल्या कानांवर कांहीं कुरकुर आली नाहीं या सबबीवर कांहीं नमुन्यांची पृथक्कृति करविण्याचें कबूल करीत नव्हतें. पण नंतर आमच्या सांगण्यावरून त्यांनीं कबूल केलें. आणि त्या पृथक्कृतीवरून असें दिसून आलें कीं, चार तपासलेल्या नमुन्यांपैकीं तींहींमध्यें मिसळ होती." सर्व देशाबद्दलची माहिती मंडलास गोळा करावी लागते. काफीचे बाराशें नमुने तपासण्यांत आले; त्यांपैकी दोनशेंचोत्रिसांत मिसळ होती असें दिसून आलें. आणि दुधाचे जे नमुने तपासले त्यांत शेंकडा एकुणिसांमध्यें मिसळ होती. कांहींकांत चाळीस भाग दूध तर साठ

भाग पाणी मिसळलेलें असें सिद्ध झालें. वूलिच गांवचा पृथक्कृति-वरील अंमलदार ह्मणतो कीं, तेथील रहिवाशांनां हजारों पौंड दुधवाल्यास दुधाकरितां ह्मणून द्यावे लागत असतील, पण खरोखर तो एक पाण्यावरील जास्त करच समजला पाहिजे. एसेक्स येथील पृथक्कृतीवरील अंमलदार ह्मणतो कीं, मिसळ करण्याकरितां जें पाणी वापरण्यांत येते तें स्वच्छ देखील नसतें, आणि त्या पासून रोगांचीं बीजें फैलावण्यास फार मदत होण्याचा संभव आहे. एका सालांत एकंदर सतराहजार पदार्थांची पृथक्कृति करण्यांत आली, त्यांपैकीं शेंकडा पंधरामध्यें मिसळ होती असें सिद्ध झालें. देवी काढण्याबद्दलच्या कायद्यावर देखरेख करण्याचें काम विशेषें करून मंडलाकडे सोंपलेलें आहे. आणि देवी काढणार फार प्रवीण दिसून आले, तर त्यांनां विशेष बक्षिस देण्याची सत्ता मंडलास दिली आहे. येथें ही एक गोष्ट सांगण्यासारखी आहे कीं, मंडलानें आलिकडे जनावरांच्या मेदाचा उपयोग करण्याकडे लक्ष्य दिलें आहे, आणि ज्यांना मनुष्यमेदानें देवी काढून घेण्याविषयीं हरकत आहे, त्यांच्या करितां देवी काढणारांस गोमेद पुरविण्याची तजवीज ठेविली आहे. या शिवाय मंडलाचीं किरकोळ कामें अनेक आहेत. त्यांपैकीं जन्ममृत्यु नोंदण्याबद्दल मुख्य रजिस्ट्रार यांस हुकूम देणें, पारिशांना जमीन विकण्याला मंजुरी देणें, आणि १८७८ सालच्या राजमार्ग व चलनशक्तिकयंत्रें याबद्दलच्या कायद्याअन्वयें केलेल्या नियमांचा तपास करणें, हीं आहेत.

द्रव्यसंबंधी जें नियमन मंडलाकडून होत असतें, तें दोन प्रकारचें आहे. एकतर पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, १८७५ सालचा सार्वजनिक आरोग्यसंबंधी कायदा, व इतर कांहीं कायदे, या अन्वयें कर्जाऊ पैसे काढणें तर स्थानिक अंमलदारांनां मंडलाची मंजुरी घेतली पाहिजे. येथलि नियमन अगदीं संपूर्ण नाहीं, कारण मंडलाच्या शेवटल्या रपोर्टावरून असें दिसून येतें कीं, १८७१ सालापासून निरनिराळ्या स्थानिक अंमलदारांनीं विशेष कायदे पार्लमेंट सभेकडून करून घेऊन, त्यां अन्वयें तीन कोटी तीस लक्ष पौंड उसने काढले आहेत. या कायद्यांप्रमाणें मंडलाच्या मंजुरीची जरूर नाहीं. या शिवाय मंडलानेंही दोन कोटी

चाळीसलक्ष पौंड कर्जाला आपली मंजुरी दिली आहे. दुसरा नियमनाचा मार्ग हा कीं, बहुतेक स्थानिक अंमलदारांचे हिशोब तपासण्याचें काम मंडलावर सोंपलें आहे. म्युनिसिपालिट्या आणि कौंटी, यांच्या मात्र हिशोबांचा तपास या मुख्य अधिकाऱ्यांकडून होत नाहीं; पण दीनजन तर्तुदीवरचे गार्डियन नामक अंमलदार, खेड्या पाड्यांतील आरोग्यसंबंधी अधिकारी, टौन कौन्सलें खेरीज करून बाकीचे पौर आरोग्यसंबंधी अधिकारी, दीनजनांचे प्रेक्षक, शाळामंडलें, राजमार्ग मंडलें, आणि राजमार्ग संबंधी पारिशांचे सर्वेयर, या सर्वांच्या हिशोबांचा तपास त्यांच्याकडून होत असतो. या हिशोबाच्या कामासबंधानें, राजधानी खेरीज करून बाकीं सर्व देशाचे तेत्तीस भाग केले आहेत, आणि मंडलाकडून प्रांतहिशोबतपासनीस ह्मणून अधिकारी नेमण्यांत येतात, ते ठिकठिकाणीं जाऊन मंडलाच्या हुकुमाप्रमाणें हिशोब तपासतात. प्रांतहिशोबतपासनिसानीं कांहीं उधार बाजूवरच्या रकमा मंजुर न केल्या, किंवा कांहीं जमेबाजूकडल्या फाजिल धरल्या, तर त्यावर मंडलाकडे अपील चालतें. सामान्यत:, स्थानिक अंमलदारांनीं खरोखर जर चूकच केलेली असली, तर मंडलाकडून त्यांना केवळ ताकीद मिळते. पण कांहीं पैशाचा अपव्यय झालेला असल्यास, अपव्यय करणाऱ्या स्थानिक अंमलदारांच्या अंगावर तो पैसा घालण्याचा अधिकार आहे, आणि हा अधिकार मंडलाला सार्वजनिक व्यवहारांत सचोटी राखण्याकरितां एखादे प्रसंगीं अंमलांत आणावा लागतो. १८८० सालीं प्रांत हिशोब तपासनिसांच्या रपोटांवरून नामंजूर केलेल्या व फाजील धरलेल्या रकमा सहाहजारआठशेंपंचवीस निघाल्या. दीनार्थ कायद्यासंबंधी हिशोबांचा तपास हुजुराकडून फार दिवस होत आहे, पण दुसऱ्या स्थानिक अंमलदारांच्या हिशोबांचा तपास आलिकडेच होऊं लागला आहे. दीनार्थ कायद्यासंबंधी कमिशनर लोकांनीं १८३७ सालीं जो रपोट केला आहे, त्यांत अशा स्वतंत्र तपासणीचा उपयोग दाखविला आहे. ते ह्मणतात कीं, करांचें उत्पन्न अननुमत कार्यास लावूं नये, हा जो प्रतिबंध आहे, तो अंमलांत आणण्याला हिशोब तपासणें हा विशेषें करून योग्य उपाय आहे. या उपर, थकलेल्या बाक्या वसूल करण्याला सिद्धिप्रद उपाय करितां येत असला, आणि जबाबदार मं-

डळी नादार नसली, ह्मणजे सार्वजनिक पैक्याच्या संरक्षणार्थ यासारखी सोपी, सोईची, आणि स्वत:साधक, युक्ति दुसरी नाहीं. आणि यापासून भिन्न प्रकारची सरकारी चौकशी, अथवा प्रतिकारार्थ किंवा शासनार्थ चालविलेलें न्याय कोर्टांतील काम, यांपैकीं कोणताही उपाय त्या युक्तीशीं तुलना देखील करण्याला लायक नाहीं." १८७९ सालीं जेव्हां पहिल्यानें राजमार्गाचे हिशोब तपासण्यांत आले, त्याप्रसंगी करांच्या उत्पन्नाची विल्हेवाट कांहीं चमत्कारिक रीतीनें झालेली उघडकीस आली. एका पारिशांत चिमण्यांची पारध करणारी मंडळी जमिनदार लोकांनीं स्थापिली होती, तिचा खर्च राजमार्गकरांतून चालवीत असत. दुसऱ्या एका पारिशांत मोलनामक प्राणी पकडणारांचा खर्च त्याचपैक्यांतून देत असत, आणि त्याविषयीं समजूत घातली ती अशी कीं, "सदरहु खर्च फेडण्यास दुसरा पैसा नसल्यामुळें तो सर्वेयराच्या खात्यांतून देण्यांत आला." अलिकडे एकदोन ठिकाणीं कोल्हे मारण्याबद्दलची बक्षिसें करांतून दिलीं असें समजून आलें आहे. आतां इंग्लंड देशाच्या बहुतेक खेड्यापाड्यांत, शृगालहत्या आणि बालहत्या हे जवळजवळ सारिखेच गुन्हे मानिले आहेत, या गोष्टीचा विचार केला ह्मणजे असें वाटतें कीं, अशा कामास करांचें उत्पन्न लावणें ह्मणजे अंमळ धाडसाचेंच कृत्य होय. याशिवाय नामंजुर केलेल्या रकमांमध्यें खालीं लिहिलेल्या आढळांत आल्या आहेत. शांपेनदारू व आंडीं; नाटकगृहास जाण्याकरितां खर्च; कोणी गांवा बाहेर गेलें नसतांना बाहेर गेल्याबद्दलच्या खर्ची पडलेल्या रकमा; नजरकेलेल्या तसबिरी; अध्यक्षाच्या लग्नदिवशीं योग्य "तमाशा;" विशेषप्रसंगाच्या स्मारक किल्ल्या, इत्यादि.

मंडलाची स्थानिक अधिकाऱ्यांवरील सत्ता वाढवावी किंवा कमी करावी या मुद्यावर मतभेद पडण्याला जागा पुष्कळ आहे खरी, पण सल्ला मसलत देण्याच्या कामांत त्यांच्या पासून फार उपयोग होतो या विषयीं संशयाला मुळींच आधार नाहीं. जान स्टुअर्ट मिल्ल साहेब ह्मणतात कीं, "सत्ता स्थानिक अंमलदारांमध्यें वाटून दिली असतां चिंता नाहीं, पण ज्ञानाचा पूर्ण उपयोग व्हावा असें जर असलें, तर तें एके ठिकाणीं जमून असलें पाहिजे." एक मुख्य स्थान अशा

प्रकारचें असावें कीं, तेथें सर्वज्ञानांचे किरण येऊन जमा व्हावे, आणि इतर ठिकाणीं असतांना त्या किरणांतला जो छिन्नविच्छिन्नपणा किंवा कलंक असेल तो जाऊन मुख्य स्थानीं त्यांनां संपूर्ण घटना व विशदत्व हीं प्राप्त व्हावीं. या मुख्य स्थानांकडील अधिकाऱ्यांचा स्थानिक अधिकाऱ्यांशीं सतत व्यवहार असावा, आपल्या माहितीची त्यांनीं मदत देत जावी, त्यांच्या माहितीचा आपण उपयोग करावा, जरूर असली ह्मणजे सल्ला मसलत मागितल्यावांचून देखील देत जावी, आणि मागितल्यास तर अनियंत्रित प्रकारें द्यावी." निदानपक्षीं इतकें खचित आहे कीं, स्थानिक राज्याची शिस्त आपल्या खेड्यापाड्यांतून जास्त व्यवस्थेशीर होऊन बसे तोंपर्यंत, कर भरणाऱ्यांचा हुजूर तपासणी पासून फायदाच आहे. पण हुजुराकडून कारभारांमध्यें नियमन कोंठपर्यंत असावें, हा मात्र मोठा बिकट प्रश्न आहे. खासगी अथवा व्यक्ति व्यक्तीचे हक्क राखण्याकरितां पार्लमेंट सभेनें जे सर्व साधारण कायदे केले आहेत ते व स्थानिक अधिकाऱ्यांच्या सत्तेची मर्यादा घालून देणारे जे कायदे आहेत ते, अंमलांत आणण्याला न्यायाची कोर्टें आहेतच. पण स्थानिक अंमलदारांनीं जर आपआपल्या कारभारांत अव्यवस्था चालविली तर ती कोठपर्यंत चालूं द्यावी? जर त्यांच्यावर देखरेखीला समजूतदार व इमानी अंमलदारांचें खातें असलें, आणि त्या खात्याला कारभारांत हात घालण्याचा अधिकार पुष्कळसा असला, तर देखरेखीबद्दल गैरवाजवी घासाघीस होण्याचा संभव फार असतो. अव्यवस्था होत आहे असें त्या अंमलदारांना दिसलें, कीं ते जबरीनें व्यवस्था बसवून देण्यास प्रवृत्त होतात. पण ही गोष्ट त्यांच्या ध्यानीं येत नाहीं कीं, मुलांनां जसें अनेक वेळां पडून पडूनच अखेरीस चालतां येऊं लागते, तसाच प्रकार येथेंही आहे. स्थानिक अधिकाऱ्यांनां नेहमी मुलाप्रमाणेंच वागविलें, तर स्थानिक व्यवस्थेचा पाठ त्यांनां बरोबर कधींच येणार नाहीं. स्थानिक व्यवस्था असावी असें ह्मणणाऱ्या लोकांच्या मतें, तशा व्यवस्थेपासून राजकारणसंबंधीं मोठे फायदे होतात, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तें जर खरें असलें, तर ती व्यवस्था स्थिर व्हावी व समृद्ध दशेस यावी ह्मणून कांहीं कालपर्यंत थोडेसें नुकसान सोसावें लागलें तरी बेहेत्तर आहे. स्थानिक कामांमध्यें,

कारभार ठीक चालला ह्मणजे सर्व ठीक आहे, हा सिद्धांत पर्यवसानीं बरोबर नाहीं, असें ठरण्याचा फार संभव आहे. अवघा इंग्लंड देश लंडन शहाराचाच एक गौण भाग आहे, अशी जी समजूत कधीं कधीं दृष्टोत्पत्तीस येते, ती समजूत प्रचारांत असणें ही गोष्ट कांहीं चांगली नव्हे. कोणत्याही युक्तीनें स्थानिक उद्योगाला बळकटी प्राप्त होईल, आणि ठिकठिकाणीं त्यांच्या विशेष गुणांच्या विकासाला साह्य होईल, त्या युक्तीस उत्तेजन द्यावें हें योग्य आहे. बाह्य नियमन जरी चांगलें असलें, तथापि जसें व्यक्तीच्या संबंधानें तें फाजील असलेलें वाईटच, आणि उलटें वाजवीपेक्षां कमी असलेलें पत्करतें, तसेंच स्थानिक अधिकाऱ्यांच्या संबंधानेंही असूं शकेल. मिरबो नामक प्रसिद्ध मुत्सद्यानें ह्मटलें आहे कीं, "आवश्यक असतील तितकेच कायदे करावे ही एक मोठें अवघड काम आहे पण या शिवाय दुसरेंही एक तसेंच काम आहे. अर्वाचीन काळच्या सर्व राज्यकारभारांत चहूंकडे नियमन करण्याच्या आवडी पासून मोठे भयंकर दोष उत्पन्न होत असतात त्यांवर दाब ठेवावा, हा जो व्यवस्थित जनस्थितीसंबंधी मोठा सिद्धांत आहे, त्यास अनुरूप वर्तन सर्वकाळ राखावें, हें देखील मोठें अवघड काम आहे."

# टिपा.

**पृ० १. पंक्ति** २—इंग्लंड देशांत जो कायदा अमलांत आहे त्याचे दोन वर्ग केले आहेत. एक स्टाटूट, अथवा लेखी कायदा, ह्मणजे ज्याला आपल्या देशांत आक्ट ही संज्ञा आहे तो. दुसऱ्याला कॉमन लॉ किंवा साधारण कायदा असें नांव आहे, आणि त्यालाच अलिखित कायदा असें ही ह्मणतात. कारण हा स्टाटुटांसारिखा कोठेंही एकत्र लिहून ठेविलेला असा नाहीं. हा कायतो वरिष्ट कोर्टां-च्या निवाड्यांवरून व प्रमाण मानिलेल्या ग्रंथांवरून कळतो. **पं० ९.**—पारिश. याबद्दल पृष्ट २३ पहा. **पंक्ति** ११. अपमृत्यु परीक्षक. या नांवाचा अंमलदार मुंबई, कलकत्ता आणि मद्रास या शहरांत असतो. पहा सन १८७१ सालचा आक्ट ४. जिल्ह्यांतून त्याचें काम बजाविण्याकरितां तजवीज केली आहे. तिच्याबद्दल १८७२ सालचा क्रिमिनल प्रोसीजर कोड कलमें १३३ पहा. **पं० १३.** तुटक पारिश—याबद्दल पृष्ट ३३ पहा. पुढील पंक्तींत जी अव्यवस्था दर्शविली आहे तिच्याबद्दल पृष्ट २३ पहा.

**पृ० ३. पं०** १९ दीन—यांबद्दल पृष्ट ९० व पुढील पृष्टें पहा. **पंक्ति** २४. परापद्रवन्यूसन्स. या मूळ इंग्रजी शब्दाचा अर्थ फार व्यापक आहे. ज्यापासून आरोग्यास अपकार होतो, अथवा ज्यापासून कोणत्या-ही मनुष्यास आपल्या मिळकतीचा उपभोग करण्यांत अडचण उत्पन्न होते, त्याला न्यूसन्स असें ह्मणतात.

**पृ० ४. पं०** ३—७—येथें जीं स्थानिकराज्याचीं कामें ह्मणून सांगित-लीं आहेत, तीं सर्व मुंबई शहरांत येथील म्युनिसिपालिटी कडून होत आहेत. स्वच्छ हवा वगैरे बद्दल आपले अत्यंत लोक प्रिय लॉर्ड रिपन साहेब यांनीं विलायतेस जातेसमयीं जो आपल्या लोकांना उपदेश केला, तो सर्व प्रजेनें आणि विशेषें करून स्थानिक अधिकाऱ्यांनीं ध्यानांत ठेविला पाहिजे. ते ह्मणाले कीं, " गृहस्थहो, तुमची व्यवस्था सर्व सिद्ध

होऊन या मोठ्या इलाख्यांत जिल्ह्यानिहाय स्थानिक मंडळें स्थापिलीं, ह्मणजे एका विषयाकडे तुह्मीं आपलें लक्ष्य विशेषेंकरून वळवा, अशी माझी तुह्मांस अखेरची प्रार्थना आहे. यद्यपि तो विषय कांहीं अंशीं क्षुल्लक ह्मणतां येईल, तथापि सामान्य जनसमाजहिताच्या संबंधानें तो फार महत्वाचा आहे, आणि त्या विषयाबद्दल माझ्या मनांत फार कळकळ वागत आहे. तो विषय कोणचा ह्मणाल, तर गांवढ्या गांवांमध्यें आरोग्य रक्षण संबंधी तजवीज. मुंबईतील स्थानिक मंडळांस ही माझी जातेसमयींची देणगी मी देतों." तसेंच मुंबई म्युनिसिपालिटीच्या मानपत्राचा जबाब देतांना ते ह्मणाले कीं, स्थानिकस्वराज्याचा "पाया दृढ बसविला आहे, आतां उरलेलें काम लोकांकडे आहे. तें कोणतें ह्मणाल, तर आज ज्या इमारतीची प्रस्तरस्थापना झाली आहे, तशीच नव्हे तर दुसरी एक इमारत त्यांनीं या पायावर चढविली पाहिजे. ती इमारत ह्मणजे, विद्येचा प्रसार, आरोग्य व्यवस्थेची अधिक टापटीप, गमनागमनसाधनांची विशेष सोई, आणि रोगाच्या दुःखाचें शमन, या सत्कृत्यांची इमारत, हीच होय. आणि अशा प्रकारची इमारत, सार्वजनिक हिताकरितां झटणाऱ्या गृहस्थांना एखाद्या संगमरवरी दगडाच्या पुतळ्यापेक्षां विशेष कीर्तिप्रद होईल." पं० १९. जास्टिस—पृ० ९१ पहा. पं० १९. राष्ट्रीय प्रधान—इंग्लंड देशांत सर्व राज्यकारभार चालविणारें एक मोठें प्रधानमंडळ असतें. त्याला मिनिस्ट्री ह्मणून ह्मणतात. त्यांत एक मुख्य प्रधान असतो. कांहीं महिन्यामागें ग्लाडस्टन साहेब मुख्य प्रधान होते. हल्लीं मार्किस ऑव्ह सॉल्सबरी हे मुख्य प्रधान आहेत. या मुख्य प्रधानाखेरीज दुसरे प्रधान निरनिराळ्या खात्यांचे वरिष्ठ अधिकारी असतात. त्यांना राष्ट्रीय प्रधान असें येथें ह्मटलें आहे. होम सेक्रेटरीकडे देशांतील साधारण आंतर व्यवस्था सोंपलेली असते. ह्मणजे, उदाहरणार्थ, पोलीसखातें, व माजिस्ट्रेट लोक, यांच्यावर त्याची देखरेख असते; गिरण्या, खाणी वगैरेंतील कामकरी लोकांच्या संरक्षणाकरितां केलेल्या कायद्यांअन्वयें योग्य बंदोबस्त ठेवण्याचें काम त्याच्याकडे आहे; गुन्हे शाबीत होऊन शिक्षा झालेल्या लोकांस शिक्षा माफ करण्याचा जो अधिकार राणीसाहेबांकडे आहे तो होम सेक्रेटरी चालवीत असतो. आणि या प्रकारचे अनेक अंमल

त्याच्या हातीं आहेत. पं० २२–दीनाश्रम–पृ० ९७ पहा. यांच्या अव्यवस्थेबद्दल मागें फार बोभाटा असे. याविषयीं आणि दीनार्थ कायद्यासंबंधी इतर अव्यवस्थेविषयीं प्रख्यात डिकन्स नामक इंग्रजी कादंबरीकारानें एक उत्कृष्ट कादंबरी लिहिली आहे. ती छापिल्यापासून या कामांत बरीच सुधारणा झाली आहे.

पृ० ५–६. पं० १९–याअभिप्रायाचीं वाक्यें, लॉर्ड रिपन साहेबांच्या कारकिर्दींत जे स्थानिकस्वराज्याबद्दल ठराव प्रसिद्ध झाले, त्यांत अनेक आढळतात. तारीख १८ माहे मे सन १८८२ च्या ठरावांत पांचव्या कलमांत ह्मटलें आहे कीं, "कारभारसंबंधी सुधारणा व्हावी हा हल्लीं सुचविलेली व्यवस्था स्थापण्यांत मुख्य हेतु नाहीं. ती व्यवस्था राजकारणी व सार्वजनिक शिक्षणास साधनीभूत आहे, ह्मणून मुख्यत्वेंकरून इष्ट आहे.' सर अर्स्किन मे यांनीं इंग्लंडदेशाच्या राज्यरीतीचा इतिहास लिहिला आहे. डिटॉकव्हील यानीं अमेरिकेंतील प्रजासत्ताक राज्यव्यवस्थेचें वर्णन केलें आहे. आणि जॉन स्टुअर्ट मिल्ल साहेबांच्या अनेक ग्रंथांपैकीं, एक प्रसिद्ध ग्रंथ प्रतिनिधिसत्ताकराज्य या विषयावर आहे, तो त्या व इतर आनुषंगिक विषयांवर अशा योग्यतेस पावला आहे, कीं त्यांतील वाक्यें यांविषयांचा विचार चालला असतां प्रमाण ह्मणून नेहमी दाखल केलीं जातात.

पृ० ६. पंक्ति. २६–पार्लमेंटसभेची जी स्थिति येथें वर्णन केली आहे, तशीच आपल्या सरकारचीही स्थिति झाली आहे, असा नामदार पीलसाहेबांनीं तारीख २९ आगष्ट १८८३ रोजी येथील कौन्सलांत जें भाषण केलें त्याचा गर्भितार्थ दिसतो. पुढील वाक्यांत ज्या कायद्यांविषयीं लिहिलें आहे, ते स्थानिक कारभारासंबंधी कायदे असें समजलें पाहिजे. त्याबद्दलचें सर्व नियमन स्थानिक अधिकाऱ्यांकडे असावें असा त्या वाक्याचा आशय आहे.

पृ० ८. पंक्ति. १६–वेस्ट्री–पृष्ट ३८ पहा.

पृ० ९. पं० ११–मानर, ह्मणजे कांहीं अंशीं आपल्याकडील इनाम गांवांसारिखा एक देशविभाग असे, त्याचा मालक कोणी मोठा उमराव असे, तो आपल्याला लागेल तितकी जागा स्वतःकडे ठेवून

बाकींची कुळांना लागवड इत्यादि कार्यांकरितां देत असे. त्या सर्व कुळांचा परस्पर संबंध काय, आणि मालकांशीं संबंध काय, याबद्दल विशेष वहिवाटी व रिवाज अंमलांत असत. पं० २८. सर हेन्री मेन हे मागें गवर्नरजनरलाच्या कौन्सलाचे सभासद होते. त्यांनीं पुरातन कायद्याच्या इतिहासावर फार उत्कृष्ट व मनोरंजक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांत आपल्या देशांतील प्रचारांत असलेल्या गोष्टींवरून त्यांनीं फार चांगली अनुमानें काढून प्राचीन लोकस्थितीविषयीं सिद्धांत बसविले आहेत.

पृ० १०. पं० ९—येथें लहान गांव व मोठें शहर यांमधील भेदाबद्दल जो सिद्धांत ध्वनित केला आहे, त्याचा विचार आपल्या व्यवस्थेंतही झाला आहे, असें १८८४ सालचा म्युनिसिपालिटीचा आक्ट कलम ९ यावरून दिसतें. कारण नगरव्यवस्था अथवा म्युनिसिपालिटी स्थापण्याला लोकसंख्या दोन हजारांपेक्षां जास्त असली पाहिजे असा त्या कलमांत ठराव आहे. तोच अभिप्राय पीलसाहेबांनीं कौन्सलांत २५ आगस्ट १८८३ रोजीं आणि ९ जानुवारी १८८४ रोजीं जीं भाषणें केलीं त्यांत स्पष्ट रीतीनें बोलून दाखविला आहे. यावरून म्युनिसिपालिट्यांच्या सभासदांवर जबाबदारी किती आहे हें सहज लक्षांत येईल. आणि याविषयीं पृ० २६ व पृ० २८ हीं पहावें.

पृ० ११. पं० २२—आपल्याकडील स्थानिक व्यवस्था नवीन कायद्याप्रमाणें कांहीं अशीं प्रतिनिधिसत्ताक झाली आहे. पूर्वीं ज्या ठिकाणीं प्रतिनिधिसत्ताक व्यवस्था करण्याची मुखत्यारी सरकाराकडे होती, त्या ठिकाणीं देखील तशी व्यवस्था स्थापली नव्हती इतकेंच नाहीं, तर स्थापण्याबद्दल केलेल्या अर्जांस नाहीं ह्मणून स्पष्ट जबाब मिळाले होते. आतां नवीन स्थापिलेल्या व्यवस्था सुयंत्र रीतीनें चालविणें आपल्या लोकांच्या हातीं आहे. त्यांनीं आपली कामगिरी नीट बजाविली, तर स्थानिक कामांच्या व्यवस्थेंत लोकांस अधिक हक्क देणें सरकारास भाग पडेल. आणि तेणेंकरून पुढें मोठ्या राष्ट्रीय कारभारांतही आपल्याकडील प्रजेस जास्त सत्ता, व आपल्या देशबांधवांनां जास्त उपयोगी पडण्याच्या सवडी, प्राप्त होतील. यास्तव, आणि उपोद्घातांत दाखल केलेल्या कारणास्तव, स्थानिक कारभारांत सर्व बुद्धिवान, सुशिक्षित, व माहितगार, लोकांनीं मनें

घालून, तो कारभार सुरळीत चालविण्याच्या कामांत मदत करावी, हें आपल्या देशमाउलीचें त्यांच्यावर ऋण आहे.

पृ० १२ पं० ६. पृष्ठ ९० पहा. पं० २२—१८८४ सालचा लोकल बोर्ड आक्ट व कलम १२ म्युनिसिपालिटीचा आक्ट कलम १८ यां अन्वयें केलेला आपल्याकडील बंदोबस्त इंग्लंडांतील बंदोबस्तापेक्षां बरा दिसतो. मिल्लसाहेबांचा जो अभिप्राय तेराव्या पृष्टावर दाखल केला आहे, त्यावरून पाहातां, स्थानिकमंडलाचें उत्पन्न ज्यांच्याकडून मिळणार, त्यांचा संबंध प्रतिनिधि निवडण्याच्या कामांकडे येथील रीतीप्रमाणें जितका निकट होईल, तितका इंग्रजी रीतींत होत नाहीं. कर भरणाऱ्या लोकां खेरीज इतर लोकांनां जो हक्क आपल्या व्यवस्थेंत दिला आहे, त्याला आधार पृष्ट १६ येथें दर्शविलेल्या विचारांत सांपडेल. मुंबई टापूंत ही या विषयींचा बंदोबस्त अशाच प्रकारचा आहे. पहा सन १८७२ चा आक्ट ३ कलमें ४,९ अनेक संमतीचा शिरस्ता कर भरणाऱ्यांच्या निवडणुकींत मुंबईंत ही नाहीं आणि जिल्ह्यांत ही नाहीं. पण मुंबईंत जस्टिस ऑव्ह धी पीस यांचेकडून जी निवड होत असते तींत तो शिरस्ता प्रचारांत आहे.

पृ० १३—१४. स्त्रियांच्या हक्कांबद्दल आपल्या व्यवस्थेंत आणि इंग्रजी व्यवस्थेंत हा भेद आहे कीं, इंग्लंडांत त्यांनां स्थानिकमंडलांत सभासद होतां येतें, आपल्याकडे होतां येत नाहीं. आपल्याकडील आणि तेथील रीतिभाती व स्त्रियांची स्थिति पाहातां, असा भेद असावा हें योग्य आहे. स्त्रियांनां संमति देण्याचा हक्क, आपल्या हल्लींच्या कायद्यांचा जो मुळचा मसुदा केला होता त्यांत नव्हता. परंतु नामदार रावसाहेब मंडलिक यांच्या सुचनेवरून तो कायद्यांचा विचार करतांनां मान्य करण्यांत आला. पं० ९ देखरेख करणारा अथवा प्रेक्षक आणि जोगवण करणारा अथवा गार्डियन असे शब्द मुळांत असावे. त्या अंमलदारांबद्दल पृष्ठ ४३ व ९४ पहा. पं० १८. स्त्रियांच्या हक्कांविषयीं इंग्लंडदेशांत वाद बरेच दिवस सुरू आहे. कांहीं स्त्रियांचा, आणि त्यांचा कैवार घेणाऱ्या कांहीं पुरुषांचा, अभिप्राय आहे कीं, स्त्रीपुरुषानां राष्ट्रीय कारभारांत हक्क सारखे असावे. प्रसिद्ध मिल्लसाहेब यांनीं या मताच्या प्रतिपादनार्थ एक सुरस ग्रंथ लिहिला

आहे. परंतु त्या पासून लोकांची खात्री न झाल्यामुळें, अजूनही स्त्रियांस पार्लमेंट सभेचे सभासद नेमण्याच्या कामात संमति देण्याचा हक्क मिळाला नाहीं. आलिकडे अशी बातमी निघाली आहे कीं, मिल्लसाहेबांच्या बायकोची पहिल्या लग्नाची कन्या, मिस हेलन टेलर, ही पार्लमेंट सभेंत आपली निवड करून घेण्याचा प्रयत्न करीत आहे. निवड झाली तर ती बेकायदेशीर आहे कीं नाहीं याविषयीं विचार निघेल.

पृ० १९. पं० ६–आपल्याकडे फार लोक शेतीच्या धंद्यानें चरितार्थ चालवितात, तशी इंग्लंडदेशांत स्थिति नाहीं. तेथें गिरण्या वगैरे कारखान्यांतील कामकरी लोकांची संख्या, व व्यापार वगैरे धंद्यांतील लोकांची संख्या, फार आहे, आणि त्यांना पार्लमेंट सभेच्या निवडणुकींत आलिकडील कायद्यांच्या योगानें संमति देण्याचा हक्क मिळाल्यामुळें, तेथील जनसमाजांत हल्लीं त्यांचा दर्जा अंमळ वाढला आहे. त्यांच्या गरजांविषयीं, वृत्ती विषयीं, व समजुती विषयीं, तेथील मुत्सदी लोकांना विशेष काळजी घेणें जरूर पडते.

पृ० १६. पं० ११–आपल्याकडील स्थिति कांहीं अंशीं फ्रान्स देशांतील स्थितीपेक्षां चांगलीच ह्मटली पाहिजे. आणि आपले माजी गवर्नर सर जेम्स फर्ग्युसन साहेब यांनीं तारीख ९ जान्युवारी सन १८८४ रोजीं याबद्दल जें कौन्सलांत ह्मटलें तें वाजवी आहे. तरी १८८४ सालचा लोकल बोर्ड आक्ट कलम २८ आणि म्युनिसिपालिटीचा आक्ट कलम २९ यांतील ठरावापेक्षां लोकांस स्वातंत्र्य अधिक देण्याची तजवीज जितकी लवकर होईल तितकी बरी. आपल्या हल्लींच्या गवर्नर साहेबांनीं थोड्याच काळांत हें यश मिळविलें, ही एक आनंदाची गोष्ट समजली पाहिजे; आणि तिच्या योगानें सर्व स्वातंत्र्येच्छु लोकांना सार्वजनिक कामांविषयीं विशेष उत्साह वाटून उमेद यावी हें साहजिक आहे. इतकें मात्र नेहमीं ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, हल्लींच्या सरकारच्या ठरावामुळें आपल्या वरील जबाबदारीचा बोजाही जास्त झाला आहे. यास्तव आपलें वर्तन तदनुरूपच झालें पाहिजे. पं० २३. टिपणें ठेवण्याविषयीं, आणि तीं सर्व लोकांस पाहूं देण्याविषयीं, १८८४ चा लोकल बोर्ड आक्ट १ कलम ३२ रकम ११, आणि म्युनिसिपा-

लिटीचा आक्ट कलम २९ रकम १९ पहा. मंडलांच्या सभा सामान्यतः जाहीरसभा असण्याविषयींही त्याच कलमांत ठराव आहे. पं० २८. या प्रकारचें वांटप वगैरे आपल्याकडे असण्याची कांहीं जरूर नाहीं, कारण आपल्याकडे जानपद मंडलांना कर बसविण्याची सत्ताच दिलेली नाहीं, आणि त्यांचें उत्पन्न काय हें सर्व आक्टांतच ठरवून दिलें आहे.

पृ० १७. पं० ३—१८८४ सालचा लोकल बोर्ड आक्ट कलम ३० आणि १८७३ सालचा म्युनिसिपालिटीचा आक्ट कलम २४ पहा. पं० १४—अजमास पत्रकें तयार करण्याविषयीं लोकल बोर्ड आक्ट कलम ९३ पहा, आणि त्या आक्टांअन्वयें सरकारानें केलेले नियम नंबर ९ आणि पुढले नियम पहा. पं० १९-संभूयकारित्वाचा अधिकार ह्मणजे एक व्यक्ती दाखल कारभार चालविण्याचा हक्क. साधारण व्यापाराकरितां स्थापित झालेल्या भागीदारीमध्यें सर्व भागीदार मालक व कारभार चालविणारे असतात. ते कायद्याच्या दृष्टीनें एक व्यक्ती दाखल गणले जात नाहींत. पण सन १८६६ चा आक्ट १० या अन्वयें स्थापिलेल्या ज्या मंडळ्या आहेत, ज्यांना कंपन्या ह्मणून ह्मणण्याचा प्रघात आहे, त्या एक व्यक्तीदाखल गणल्या जातात, आणि त्यांतील शेरहोल्डर अथवा भागीदार हे त्यांपासून भिन्न व्यक्तीदाखल गणले जातात, व त्यांच्या जबाबदारीचा बोजा भागीदारांच्या खासगी मिळकतीवर पडत नाहीं. याचें नांव संभूयकारित्वाचा हक्क. पहा लोकल बोर्ड आक्ट कलम ९ आणि म्युनिसिपालिटीचा आक्ट कलम १९.

पृ० १८. पं २८—आपल्या व्यवस्थेमध्यें सभासदांची संख्या कायद्यानें ठरविलीं नाहीं. तीं ठरविण्याचा अधिकार सरकाराकडे आहे, आणि असे ठराव सरकारानें वेळच्यावेळीं केले आहेत. पं. २२—येथें पादशाही विषयीं जे विचार दर्शविले आहेत त्यांकडे लक्ष सर्वांनी पोहोंचविलें पाहिजे. तारीख ९ जान्युवारी सन १८८४ रोजीं कौन्सलांत भाषण करतांनां, आपले माजी गवर्नरसाहेब, सर जेम्स फर्ग्युसन, ह्मणाले कीं, आपल्या आक्टांत केलेली व्यवस्था फ्रान्स देशांतील व्यवस्थेपेक्षां प्रजेस अधिक स्वातंत्र्यदायक आहे. हें ह्मणणें वाजवी आहे.

फ्रान्स देशांतला मेयर जसा नेहमी हुजुराकडून नेमिलेलाच असला पाहिजे, तसा आपल्याकडील मंडलांचा अध्यक्ष सरकार नेमणुकीचाच असला पाहिजे असा कायद्याचा निर्बंध नाहीं. तथापि वस्तुतः जर सरकारानेंच नेमणुका केल्या, आणि त्याही सरकारी अंमलदारांच्याच जर केल्या, तर कायद्याचा निर्बंध असल्यापासून आणि नसल्यापासून व्यावहारिक परिणाम सारिखाच होणार आहे. तरी हल्लीं लॉर्ड रे साहेबांनीं पुण्याच्या म्युनिसिपालिटीला आपला अध्यक्ष नेमण्याचा अधिकार दिला आहे, यावरून कायदा प्रजेच्या स्वातंत्र्याला अनुकूल आहे इतकेंच केवळ नाहीं, तर कायदा अंमलांत आणण्याची रीत ही तशीच आहे असें ह्मणण्यास कांहीं चिंता नाहीं. पण अशा स्थितींत आपल्या लोकांवर विशेष जबाबदारी आहे. जेथें जेथें हा हक्क मिळेल, तेथें तेथें लोकांनीं सार्वजनिक काम मन लावून व समंजस रीतीनें चालविलें, ह्मणजे हा हक्क प्राप्त झाल्याचें सार्थक होईल, व इतर ठिकाणीं ही प्रजेस तोच हक्क देणें एका प्रकारें सरकाराला भाग पडेल. सरकारानें तर हें आपल्याला इष्ट आहे असें स्पष्टपणें ह्मणून दाखविलें आहे. ह्मणून आतां "फाजील अधिकार बजाविणारे अशा अंमलदारांचें मंडल" उत्पन्न न होऊं देणें हे कांहीं अंशीं प्रजेच्या हातीं आहे. लोकल बोर्ड आक्ट कलमें २७–२८ यांत ठरविलेल्या प्रकारच्या व्यवस्थेनें त्यांना या कामांत थोडी बहुत मदत होईल अशी उमेद बाळगण्याला कांहीं हरकत नाहीं.

पृ० १९ पं० ७ येथें दर्शविलेली अव्यवस्था आपल्या आक्टांखालीं मुळींच नाहीं. अधिकाराचा हद्द, अधिकार, जबाबदारी, अधिकारी मंडलांचा परस्पर संबंध, हें सर्व चांगल्या रीतीनें कायम केलें आहे, आणि यामुळें आपला स्थानिक कारभार सुरळीत चालण्यास इंग्लंड देशापेक्षांही एक जास्त साधन आपल्याला चांगलें सांपडलें आहे. पृष्टें २३।२४ येथें ज्या सुधारणा इंग्लंड देशांत झाल्या पाहिजेत ह्मणून ह्मटलें आहे, त्या आपल्याकडे हल्लींच झालेल्या आहेत. या पुढील पृष्टावर वर्णिलेल्या देशविभागांविषयीं पुढें सविस्तर माहिती मिळेल.

पृ० २०. पं० २४–आपल्याकडे कांहीं अंशीं या सारिखा प्रकार

सन १८६७ सालचा आक्ट ७ या खालीं होत असतो.

पृ० २४ पं० १–येथें जी देशविभागांची रचना सुचविली आहे, तशी रचना आपल्याकडे हल्लींच आहे. आणि फ्रान्स देशांतली जी वर वर्णिली आहे, तीही तशीच आहे. कामांचा बंदोबस्तही येथें सुचविल्याप्रमाणें-च आपल्याकडे हल्लीं चालू आहे. कमिट्या मार्फत कारभार करण्याविषयीं स्पष्ट कलमें कायद्यांत आहेत. लोकल बोर्ड आक्ट कलम ३२ रकम ६ आणि म्युनिसिपालिटीचा आक्ट, कलम २७ रकम १० पहा. पं० २९ लोक स्थानिक कारभारांत मन घालूं इच्छित नाहीं याचें कारण जें येथें सुचविलें आहे, तेंच सिंधप्रांताचे कमिशनर अर्स्किन साहेब यांनींही आपल्या एका रपोर्टांत दाखल केलें होतें. दुसऱ्या कांहीं अंमलदारांनींही आपल्या रपोर्टांत तसाच अभिप्राय कळविला होता. आतां नवीन आक्टांत जुन्या स्थितीमध्यें बरेंच फेरफार झाले आहेत, यास्तव ही अडचण हळूहळू नाहींशी व्हावी. या प्रकरणांत जास्त फेरफार झाले असते तर माझ्या मतें व्यवस्था अधिक हितावह झाली असती, पण ते फेरफार मिळविण्यास आतां आपण प्रयत्न केले पाहिजेत. आणि मुख्य प्रयत्न ह्मटला ह्मणजे आपल्याला हल्लीं मिळालेल्या अधिकारांचा आपण योग्य रीतीनें उपयोग करावा हाच होय.

पृ० २८ पं० १९–साक्सन कारकीर्दीतली ह्मणून जी स्थिति येथें सांगितली आहे, तीच इंग्रजी अंमलाच्या पूर्वीं आपल्या देशांत होती, असें एल्फिन्स्टन वगैरे इतिहासकारांच्या ग्रंथांवरून दिसून येतें. पं० २० स्वतंत्र मनुष्य ह्मणजे एखाद्या राज्यांत अथवा शहरांत ज्याला कांहीं विशेष हक्क मिळालेला असे तो. त्या हक्कांत मुख्य ह्मटला ह्मणजे शहरचे व्यवस्थापक नेमण्यांत संमति देण्याचा हक्क. पं० २९ गांव जबाबदारी. एखाद्या निर्दिष्ट हद्दींमधील कोणत्याही एखाद्या मनुष्यानें गुन्हा केल्यास त्या पासून होणारें नुकसान त्या हद्दींतील सव मनुष्यांनीं भरून द्यावें, असा नियम साक्सन काळांत असे, त्याचें नांव गांव जबाबदारी. निर्दिष्ट हद्दी ह्मणून ज्या वर सांगितल्या त्यांत बहुतकरून दहा दहा घरें येत असत असें दिसतें. आपल्याकडील वतनदारांनीं केलेल्या

गुन्ह्याबद्दल जो कायदा आहे तो, व १८६७ सालचा आक्ट ७ यांतील कलम १६, हीं कांहीं प्रकारें या सारिखींच आहेत.

पृ० २६. पं० ११ मिरासदार—येथें मूळ इंग्रजींत फ्रीहोल्डर असा शब्द आहे. त्याचा अर्थ साधारणतः ताहयात हक्कापेक्षां जमिनीवर जास्त हक्क बाळगणारा असा आहे. मिरासदार यांतील अर्थ या अर्थाच्या जवळ जवळ येतो, प्रण त्यांत भेदही बराच आहे. पं० ४ कायदे करण्याचें वगैरे काम हल्लीं निरनिराळ्या अंमलदारांकडे आहे, जसें कायदे करण्याचें काम कायदे कौन्सलांकडे, न्याय मनसुब्याचें न्यायाच्या कोर्टांकडे, आणि कारभार चालविण्याचें कलेक्टर वगैरे अधिकारी आणि सरकार यांचेकडे. ही रचना अगदीं अलिकडची आहे. पं० १७ अशा प्रकारची माहिती आपल्याकडे उपलभ्य नाहीं. पण पौर आणि जानपद प्रदेश यांतील अंतर इंग्लंड देशा इतकें आपल्या इकडे नाहीं. तसें होण्याला व्यापारधंद्याची समृद्धि झाली पाहिजे. पं० २२ यां-बद्दल म्युनिसिपालिटीचा आक्ट कलम ३३ पहा. या सारिखें कलम लोकल बोर्ड आक्ट यांत नाहीं आणि असण्याची जरूर ही नाहीं.

पृ० २७. पं० ८—इंग्रजी प्रजा, तिचे हक्क, आणि तिची जबाबदारी, या नांवाची एक ग्रंथमालिका हल्लीं इंग्लंड देशांत छापीत आहेत. प्रस्तुत निबंध ज्या ग्रंथाच्या आधारें केला आहे, तो या मालिकें-तलाच एक ग्रंथ आहे. आणि त्या मालिकेंत दुसरे बरेच ग्रंथ छापिले आहेत, त्यांपैकीं कांहीं ग्रंथांचे विषय येणेंप्रमाणें; न्याय व्यवस्था व पोलीस, जमिनी संबधी कायदे, हुजुराकडील राज्यव्यवस्था, कायदे करणारी मंडळी आणि त्यांनां निवडणारे लोक, परराष्ट्राशीं संबंध, इ० इ०,

पृ० २८. पं० ३—इंग्लंड देशांत स्थानिक मंडलांना हुजूर जामदारखा-न्यांतून कांहीं मदत देत असतात. १८७९–८० सालीं या बाबीबद्दल सर्व मिळून २१,१३,९९९ पौंड राष्ट्रीय जमाखर्चाच्या अजमास पत्रकांत खर्ची पडले आहेत. पं० ४ स्थानिकराज्यव्यवस्थामंडल किंवा स्थानिकव्यवस्थामंडल याचे बद्दल पृष्ट १४० व पुढील पृष्टें पहा. पं० ६ आयवर्धक ह्मणजे ज्या पासून उत्पन्न मिळतें तो, उदाहरणार्थ

लोखंडी सडका, पाटबंधारे वगैरे, यांवर केलेला खर्च. पं० १९ गुन्हेगार व दीन लोकांप्रीत्यर्थ, ह्मणजे तुरुंग बंदीखाने वगैरे आणि दीनाश्रम वगैरे, यांबद्दल सर्व प्रकारचा खर्च.

पृ० २९ पं० ७—याबद्दल पृ० ९७ पहा. पं० २४ टैथ अथवा दशमांश नांवाचा कर देवळांचे पुरोहित वगैरे यांच्या करितां मूळपासून इंग्लंडांत घेत आले आहेत. मागें सर्व उत्पन्नाचा दशमांश मापानें घेत असत. पण १८३४ सालीं त्याबद्दल नवीन बंदोबस्त झाला. आतां व्यवस्था त्या बंदोबस्ताअन्वयें चालू आहे. जमीनदार गृहस्थांस हा धर्मार्थ कर पोहोंचतो त्याचें कारण असें आहे कीं, आठव्या हेन्री राजाच्या कारकीर्दीमध्यें रोमन क्याथलिक पंथाचे मोठमोठाले मठ होते, त्यांच्या मिळकती खालसा होऊन राजपक्षाच्या मोठमोठ्या उमरावांस देण्यांत आल्या. तेव्हां दशमांश वगैरे घेण्याचे सर्व हक्कही त्या उमरावांस प्राप्त होऊन आतां ते त्यांच्या वंशजांकडे किंवा विक्री वगैरेच्या संबंधानें ज्या इतर लोकांस मिळाले असतील त्यांचेकडे चालत आहेत. हेंच मुख्य कारण होय.

पृ० ३०. पं० १०—आपल्या कायद्याप्रमाणें अजमासपत्रक, हिशेब तपासणी, कर्ज काढण्याकरितां सरकारची मंजुरी, कर नामंजूर करण्याचा सरकारचा अधिकार, या संबंधी ज्या तजविजी केल्या आहेत, त्यांमुळें खर्च फार अवाढव्य होईल अशी भीति बाळगण्याला कांहीं कारण नाहीं. आणि अधिकाररचना भानगडीची नसल्यामुळें, इंग्लंड देशांत जें कळण्याला मुष्कील पडतें, तें आपल्याकडे सहज कळून येण्यासारिखें आहे. त्याचप्रमाणें ३१।३२ पृष्टांवर जो निरनिराळ्या प्रकारांचा घोटाळा दर्शविला आहे, तसा आपल्याकडे घोंटाळा मुळींच नाहीं. आपल्याकडे निवडणुकींच्या तारिखा, रीति, अधिकारांच्या मुदती, व उमेदवारांची लायकी, वगैरे सर्व गोष्टींविषयीं समजण्यास सुलभ असे नियम घालून दिले आहेत. आणि त्या पासून फाजील द्रव्यहानि किंवा कालक्षेप होण्याला कांहीं कारण दिसत नाहीं.

पृ० ३३. पं० ८—जुना पारिश याचे बद्दल पृष्ट ३९ पहा. देवालयाच्या प्रांतांतील भाग—ज्यांना मोठें देवालय फार दूर पडल्यामुळें तेथें

प्रार्थनेस जाणें कठीण पडतें, त्यांच्या करितां एक लहानसें देवालय बांधीत असतात, आणि त्यांत अमुक हद्दींतील लोकांस जातां यावें असा ठराव करितात. या रीतीनें ठरविलेल्या प्रदेशास देवालयाच्या प्रांतांतील भाग हें नांव दिलें आहे. क्वार्टर ह्मणजे एखाद्या देशाचा विभाग. या वाक्यावरून स्थानिक देश विभागांबद्दलच्या घोंटाळ्याची थोडीशी कल्पना होते.

पृ० ३४. पं. ४. पाहणी प्रदक्षिणा—पारिशाच्या हद्दी कायम आहेत कीं नाहीं हें तपासण्याकरितां पारिशांतील लोक व तेथील अंमलदार पाहणी करीत असत. रोगेशनाचा आठवडा ह्मणजे ज्या आठवड्यांत गुडफ्रैडेचा सण येतो तो आठवडा.

पृ० ३५. पं० १—दशमांश प्रदेश येथें मूळ इंग्रजी शब्द टैथिंग हाच लिहिला असता तर ठीक झालें असतें. टैथिंग ह्मणजे पृष्ठ २९ येथील टीपेंत दहा दहा घरांचा समुदाय ह्मणून जो दाखविला आहे तो.

पृ० ३६. पं० २४ हंड्रेड—पृष्ठ २९ पहा. शायर—पृष्ठ ३६ पहा.

पृ० ३७. पं० ११—फ्यूडल सिस्टिम ही सर्व युरोपभर मागें प्रचारांत असे, आणि अजूनही युरोपांतील कांहीं चाली ह्मटल्या ह्मणजे या पूर्वीच्या वहिवाटीचें शेष असें ह्मटलें तरी चालेल. त्या फ्यूडल सिस्टिम प्रमाणें सर्व जमीन कांहीं थोरल्या जमीनदारांच्या स्वाधीन असे, आणि जीं कुळें वगैरे त्यांच्या कडून जमीन घेत असत, त्यांच्यावर जमीनदारांस लढाई वगैरे कामांत मदत करण्याबद्दलची जबाबदारी असे. या शिवाय ही दुसरी आनुषंगिक बंधनें त्यांच्यावर असत, पण हें मुख्य. पं० १६ मानराच्या संबंधानें कुळांचे तंटे वगैरे इनसाफ करून तोडण्याकरितां एक कोर्ट असे, त्यांत मानराचा मालक मुख्य अधिकारी असून सर्व फ्रीहोल्डर अथवा मिरासदार हे गौण अंमलदार असत. यामुळें मानरांना व्यवस्थितराजसत्ताक असें नांव दिलें आहे. पं० २९ एकीकडील काम करणें जरूर पडे ह्मणून हंड्रेडांतल्या कोर्टांमध्यें काम करण्याबद्दलचें बंधन त्यांच्यावर नसे.

पृ० ४०. पं० २०—पृष्ठ ३८—४६ पहा. सभा भरण्याची जागा—

(वेस्ट=पोषाख) देवळाची वेस्ट्री ह्मणजे पुरोहिताची पोषाख घालण्याची जागा त्यावरून वेस्ट्री हें नांव पडलें. पं० २९ संस्थापित धर्मपंथ ह्मणजे प्रॉटेस्टंट ख्रिस्ती पंथ. पृष्ट ४९ पहा.

पृ० ४१. पं० १२—पृष्ट ३८ पहा. पं० १३ पृष्ट ३९ पहा. पं० १६ हस्तोत्क्षेपण ह्मणजे हात वर करणें. हा प्रकार आपल्या आलि-कडील सभांमध्यें प्रचारांत बराच आला आहे.

पृ० ४२. पं० २—जर लोकांनीं निवड केलीच नाहीं, किंवा निवड-लेल्या मनुष्यानें काम पत्करिलें नाहीं, तर कामांत अडचण येईल; आणि लोकांची अनास्था असल्यास असे प्रसंग वारंवार येणार; यास्तव सह-कार्यामंत्रणाची चाल सुरू झाली. ह्मणजे कामावर असणाऱ्या असा-मींनींच कोणी चांगले गृहस्थ शोधून काढून त्यांना आपल्या बरोबरीस काम करण्यास नेमावें. पं० २४. अनुज्ञापक कायदे ह्मणजे जे मूळ-पासून अंमलांत न येऊन, पुढें कांहीं तरी हुकूम निर्दिष्ट अधिकाऱ्यांनीं केल्यावर अंमलांत येतात ते. असे कायदे हिंदुस्थानच्या कायदे कौन्स-लांत अनेक वेळां होत असतात. जसें सन १८८२ चा ट्रास्ट्री आक्ट. हा इतर इलाख्यांत चालू आहे तेथें आज्ञापकच ह्मणावयाचा, पण मुंबई इलाख्यांत चालू नाहीं. चालू करण्याचा हुकूम सरकाराला करितां येतो. तेव्हां येथें तो केवळ अनुज्ञापक आहे. धर्मार्थ पुस्तकालयें ह्मणजे ज्यांत फी देणें अवश्य पडत नाहीं, अशा प्रकारची पुस्तकालयें.

पृ०४३ पं० ३—नित्याचीं कामें पृष्ट ४० पहा. पं० १४ जास्टिस, पृष्ट ९९ पहा. पं० १८ क्वार्टर सेशन्स पृष्ट ९९ व त्यावरील टीप पहा. मोकळीक ह्मणजे कांहीं प्रसंगीं नेमिलेल्या मनुष्याला काम न पत्करण्याची मोकळीक असते ती.

पृ० ४४. पं० ७—तपासणारे न्यायाधीश ह्मणून कांहीं बारिष्टर लोक संमति देणारांच्या यादी व त्याबद्दलच्या हरकती वगैरे यांचा तपास क-रण्यास नेमिलेले असतात ते. पं० २८. स्थावर मिळकतीवर बसविलेले कर दोने रीतींनीं घेतां येतात, एक मिळकतीच्या मालकांकडून, किंवा एक मिळकतीच्या वहिवाट करणारांकडून. जेथें वहिवाट करणारांकडून

घेण्याचा शिरस्ता असतो, तेथें लहान लहान रकमा पुष्कळ असामीं कडून वसूल करण्याची मेहनत फार पडते. ती टाळण्या करितां मालका कडून कर वसूल करण्याची वहिवाट घालून देतात. ह्मणजे सार्वजनिक वसूल सुलभ रीतीनें एकत्र करितां येतो. आणि मालकालाही नुकसान होत नाहीं. कारण जो कर त्याला पहिल्यानें भरावा लागतो, त्याची वांटणी करून तो सर्व आपल्या भाडेकरी लोकांकडून भाड्याबरोबरच त्याला वसूल करितां येतो. आणि यांत त्यालाही मेहनत अधिक पडते असें नाहीं; कारण एकाच मनुष्याकडून दहा रुपये किंवा बारा रुपये उग्राणी करण्याला मेहनत सारिखीच पडणार. त्या मेहनतीचा आणि रकमेचा बहुधा कांहीं संबंध नाहीं.

पृ० ४१. पं० १४—वैकल्पिक—पृष्ट ४६ पहा. पं० २६ पंथांतर ह्मणजे ज्याना इंग्रजींत डिसेंटर ह्मणतात त्यांचा पंथ. असे ख्रिस्तीधर्मांत अनेक पंथ झाले आहेत. मागें संस्थापित पंथांतला जो नसे. त्याला कांहीं राष्ट्रीय हुद्यांवर नेमितां येत नसे. पण हे सर्व जुन्या काळचे नियम अलिकडील कायद्यांच्या योगानें रद्द झाले आहेत.

पृ० ४६. पं० १२—दिमतदार ह्मणजे ज्यानां इंग्रजींत ट्रस्टी ह्मणतात ते. त्यांनां मिळकतीचा आपल्या खासगी कार्या करितां व्यय करितां येत नाहीं, तर ज्या विशेष कार्याकरितां ती त्यांच्या स्वाधीन केली असेल त्याच कार्यास ती लाविली पाहिजे. पं० १६ अनावश्यक कर्तव्यें यांचें उदाहरण; जर कोणी मोबदल्याशिवाय एखाद्याला पैसे देण्याचें कबूल केलें, तर ते पैसे देणें हें कर्तव्य खरेंच, पण तें अनावश्यक कर्तव्य आहे. न्यायाचें कोर्ट ते पैसे त्याच्यावर हुकूमनामा करून त्याच्या कडून देवविणार नाहीं. पं० २१ रेक्टर वगैरे पुरोहितांमध्यें निरनिराळ्या पदव्या आहेत, आणि त्या पदव्यांच्या संबंधानें त्यांच्या कर्तव्यांतही कांहीं भेद आहेत.

पृ० ४७. पं० १२—पवित्र केलेली जमीन—ज्याचा मरणविधि धर्म नियमाप्रमाणें होतो, त्याला ज्या स्थलीं गाडावयाचा त्या स्थलावर ख्रिस्तीधर्माप्रमाणें कांहीं संस्कार करावा लागतो. तो संस्कार झाला ह्मणजे तें स्थल पवित्र व मयताला गाडण्या लायक झालें असें गणतात. पं० २६

साधारण प्रार्थनासंग्रह ह्मणून एक इंग्रजी मता प्रमाणें तयार केलेल्या प्रार्थनांचा ग्रंथ आहे.

पृ० ४८. पं० २२—टी० ४९ येथील टिपेंत ज्या कायद्यां विषयीं उल्लेख केला आहे. त्यांनां धर्मसंबंधी अप्रतिबंधाविषयींचे कायदे असें ह्मणण्याचा प्रघात आहे. रोमन क्याथलिक ह्मणजे रोमशहरांत मोठा धर्माध्यक्ष पोप नांवाचा आहे त्याचे अनुयायी. तो आपल्या शंकराचार्यासारखा आहे. पूर्वी, ह्मणजे १५२९ सालाच्या अगोदर, इंग्रजलोक रोमन क्याथलिकच असत. पण त्यावर्षा पासून इंग्लंड देशांत पोपचें प्राबल्य कमी होत जाऊन हल्लीं मुळीच राहिलें नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. आतां बहुतेक इंग्रज लोक प्रॉटेस्टंट मताचे आहेत, ह्मणजे रोमनक्ययाथलिक पंथांतले नाहींत.

पृ० ४९. पं० १३ परीक्षण यात्रा—मागें धर्म संबंधीं अधिकारी आपापल्या हद्दींमध्यें लोकांचें धर्मिष्ठपणाबद्दल पाऊल पुढें आहे किंवा कसें याविषयीं चौकशी करण्याकरितां फिरत असत. त्या फिरण्याला परीक्षण यात्रा असें नाव दिलें आहे.

पृ० ६१. पं० २९—१८३४ सालापूर्वीं असा कायदा असे कीं, लेंकवळ्यांना हे अमुक ठिकाणचे रहिवासी असे ह्मणतां येत नसे. आणि दीनार्थ करां बद्दल तर नियम असा होता कीं, ज्या पारिशांतला कोणी दीन मनुष्य रहिवासी असेल, त्या पारिशानें त्याच्या पोषणाची वगैरे तजवीज करावी. १८३४ सालच्या कायद्यानें असा ठराव झाला कीं, आई ज्या पारिशांतील रहिवासी तेथीलच लेंकवळा ही रहिवासी असें समजावें. पं० २७ सुधारलेली पार्लमेंटसभा—१८३२ सालीं इंग्लंड देशांत मोठी राज्यक्रांतिच झाली असें ह्मटलें असतां चालेल. त्या सालीं पुष्कळ ठिकाणाला पार्लमेंट सभेस प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क नवीन मिळाला. कांहीं ठिकाणें कीं, जेथें असद्व्यवहार फारच जारीनें चालू होते, त्यांचा हक्क काढून घेतला. आणि इतर अनेक रीतीनें प्रतिनिधि निवडण्याच्या कांमात मोठ्या महत्वाच्या सुधारणा करण्यांत आल्या. त्या वर्षानंतर ही अनेक वेळां सुधारणा होत आल्या आहेत, आणि हे जे पार्लमेंट सभेकरितां प्रतिनिधि निवडण्याच्या शिस्तीं-

तील फेरफार, त्यांना पार्लमेंटरी रिफार्म अथवा पार्लमेंटसभेची सुधारणा अशी संज्ञा दिली आहे.

पृ० ५२. पं० ११—बाजार भरण्याचा गांव, ह्मणजे आपल्याकडे ज्याला कसब्याचा गांव ह्मणतात त्यासारिखाच हा गांव असावा असें दिसतें. कसब्याच्या गांवाबद्दल कांहीं माहिती रा. ब. गोपाळराव हरि देशमुख यांच्या ग्राम व्यवस्थेवरील ग्रंथांत पहावी.

पृ०५३ पं०७—साधून घेतलेला स्वार्थ—पुष्कळ काळपर्यंत एखादी व्यवस्था अंमलांत राहिली ह्मणजे, तिच्यापासून होणारें जें व्यक्तिव्यक्तीचें हित असेल, त्याला ती व्यवस्था मोडल्यापासून धक्का पोहोंचेल हें उघड आहे. अशा हिताला साधून घेतलेला स्वार्थ असें येथें ह्मटलें आहे, आणि अशा साधून घेतलेल्या स्वार्थाला सहसा व्यत्यय येईल असा कायद्यांत अथवा कारभाराच्या व्यवस्थेंत फेरफार करूं नये, हा एक राजनीतिशास्त्राचा मुख्य सिद्धांत आहे. उदाहरण, एखाद्या व्यवस्थे मध्य एखादा मनुष्य मोठ्या हुद्यावर पुष्कळ वर्षें पर्यंत राहिलेला असला, तर ती व्यवस्था मोडण्याचा ठराव झाला तरी त्या हुद्देदाराची जागा अजीबात कमी करणें हें नीट नाहीं. त्याची कांहीं तरी दुसरी तजवीज करावी, ह्मणजे व्यक्तीचें फार नुकसान होण्याचें चुकतें. पारिश यूनियनां बद्दल फेरफार झाल्यानें खर्चाचा बोजा एखाद्या पारिशावर वाढण्याचा संभव आहे, हें उघड आहे, कारण सर्व ठिकाणीं दीनजनांबद्दलचा खर्च सारिखाच नसतो. पं०. २८. आपल्या कडील नियम असाच आहे. २१ नोवेंबर १८८४ रोजीं पास झालेल्या नियमांपैकीं नियम ३० पहा

पृ०९९ पं० २४—सामान्यतः कर वहिवाटकरणाराकडून घेण्यांत येतात, तेव्हां त्यांचीं नांवें वह्यांत आलींच पाहिजेत. मालक वहिवाट स्वतः करीत नसला, ह्मणजे त्याचें नांव वह्यांत असतेंच असा नेम नाहीं, ह्मणून त्याला अर्ज करावा लागतो.

पृ० ५६ पं०१२—पेटींत पत्रक टाकण्याचा प्रकार आपल्याकडे फारसा प्रचारांत नाहीं. इग्लंड देशांत क्लब वगैरे मंडळ्या ज्या असतात, त्यांत कोणी सभासद घ्यावा किंवा न घ्यावा असे विचार नेहमीं निघत असतात. तशा प्रसंगीं घेऊं नये ह्मणून ह्मणणाऱ्या गृहस्थांनां उघड री-

तीनें ना ह्मणण्याला एखादे वेळेस संकोच वाटतो. तर अशा प्रसंगीं त्यांना उघड निषेध करण्याची जरूर तर पडूं नये, आणि त्यांच्या निषेधपर मताची मतपरिसंख्यानांत गणती तर व्हावी, अशीं दोन्हीं कार्यें साधण्याकरितां ही पेटी उपयोगी पडते. त्या पेटींत दोन खण असतात. त्यांत दर एक संमति देणारानें गुटिका, अथवा गोटी, टाकावी अशी चाल आहे. एका खणांत अनुकूल तर्फेच्या व दुसऱ्या खणांत प्रतिकूल तर्फेच्या गुटिका टाकतात, आणि ती पेटी अशी केलेली असते, कीं खण न उघडतां, पेटींमध्यें हात घालून, मर्जी असेल त्या खणांत गुटिका टाकितां येते. यामुळें मत देणारा कोणच्या खणांत गुटिका टाकतो हें बाहेरील पाहाणारास कळत नाहीं. जेथें संमति देतानां नांवें लिहून देण्याची जरूर लागते, तेथें गुटिकेच्या ऐवजीं कागद टाकतात; पण तेही तसेच, ह्मणजे गुप्तरीतीनें. यांत हेतु इतकाच कीं संमति देणाऱ्यांनां, आपल्या मर्जीस वाटेल त्याप्रमाणें, संकोच न होतां, संमति देतां यावी, आणि त्यांच्यावर कोणत्याही प्रकारें दुसऱ्यांचा दाब असूं नये. पं० २४ सांकेतिक व्यंग ह्मणजे मुद्यास लागून नसणारा, केवळ गौण विषया संबंधी दोष, उदाहरणार्थ सही योग्य ठिकाणीं केलेली नसणें वगैरे.

पृ० ५७ पं० ४—राजकारणासंबंधी ह्मणजे राष्ट्रीय कारभारा संबंधी, आणि व्यक्तिविशेषसंबधी ह्मणजे उमेदवार असामी जे असतील त्यांच्या खासगी गुणदोषासंबंधी. खरेखर ह्मटेलें ह्मणजे असे विचार याकामांत येऊंच नयेत, केवळ स्थानिक कारभारासंबंधी वाकबगारी वगैरे संबंधी मात्र विचार व्हावा. पं० १६. सन १८३४ सालचा कायदा—पृष्ट ९१ व त्यावरील टीप पहा.

पृ० ५८ पं० १३—सर्व मुलांनीं शाळेंत गेलेंच पाहिजे असा इंग्लंड देशांत हल्लीं कायदा आहे ( पृष्ट १२२—३ पहा ). असा कायदा असून मुलांची फी देण्याबद्दल ही जर आईबापांवर बंधन असलें,तर फार असह्य जुलूम होईल हें उघड आहे. ह्मणून येथें दर्शविलेली तजवीज केली आहे. सर्व देशांतील लोक सुशिक्षित असावे हें देशास कल्याणकारक आहे. आणि सर्व लोक तसे नसल्यापासून अनेक प्रकारें देशाचें नुकसान

होत असतें. सबब कर वगैरे बसवून सार्वजनिक पैसा एकत्र करून या शिक्षणाच्या कामास लावावा हें अगदीं रास्त आहे. या सिद्धांताच्या अनुरोधानें हल्लींची इंग्लंडांतील व्यवस्था ठरविली आहे. पं० १७ क्वार्टर सेशन—पृ० ९९ पहा.

पृ० ५९ पं २०—नगरव्यक्तीचें स्वरूप—पृष्ठ १९ व त्यावरील टीप पहा. पं० २७ स्वतंत्र रहिवाशी—पृष्ठ २९ यावरील टीप पहा.

पृ० ६० पं० १३—नगरांत चालणाऱ्या पेशांचीं माणसें ह्मणजे, गिरण्या कारखानें वगैरे यांतील कामकरी, व्यापारी, इत्यादि थोडक्यांत ह्मटलें ह्मणजे शेतीपासून भिन्न धंद्याचे लोक. पं० २४ याबद्दल आपल्याकडे म्युनिसिपालिटीचा आक्ट कलम ९ पहा. लोकसंख्या, हा या संबंधानें विचार करण्यासारिखा केवळ एक मुद्दा आहे. पण दुसऱ्याही मुद्यांचा विचार करणें जरूर आहे.

पृ० ६१. पं० १६—पृष्ठ २३ येथें दर्शविलेला घोंटाळा न व्हावा ह्मणून ही तजवीज योजिली आहे. पण पुढील वाक्यांवरून असें स्पष्ट होतें कीं, त्या घोंटाळ्यापासूनच या सुधारणेच्या कामांत अडथळा उपस्थित होतो.

पृ० ६२. पं० २३—पृष्ठ ३६ पहा. पं० २९ हंड्रेडासारिखी व्यवस्था ह्मणजे कौंटी सारिखी; पृष्ठ २० पहा. हंड्रेड हा मागें कौंटीचा विभाग असे. आतां तो बहुतेक प्रचारांतून गेला आहे.

पृ० ६३. पं० ६—निरंतर स्वत्वानुवृत्ति=समुदायरूपानेंच मालकी निरंतर चालवितां येणें. असा हक्क जर नसला, तर एखाद्या गांवाची मिळकत गांवकऱ्यांचीच न राहतां, त्यांत गांवाबाहेरील लोकांचाही हक्क उत्पन्न होऊं शकेल. कारण गांवाची जर समुदायरूपानें मालकी नसली, तर दरएक गांवकऱ्याची मालकी आहे असें समजलें पाहिजे, आणि एक गांवकरी मेल्यावर त्याचे वारस गांवकरी असले नसले तरी त्याच्या अंशापुरते मालक होतील. हें न व्हावें, आणि गांव ही एक सर्व गांवकऱ्यांपासून भिन्न व्यक्ति अशी कल्पून मालकी गांवकऱ्यांकडेच राहावी, ह्मणून हा संभूयकारित्वाचा हक्क देण्याची खुबी निघाली. तो हक्क मिळाला ह्मणजे निरंतर स्वत्वानुवृत्ति ही त्यास प्राप्त होते. पं० ८ पोर्ट्रीव

व महोपाध्याय हे सगळ्या शहराचे मुख्य अंमलदार असल्यामुळें, आणि शहराच्या तर्फेनें कांहीं कामें करण्याची त्यांना सत्ता असल्यामुळें, एका प्रकारचें ऐकात्म्य अथवा एकव्यक्तिस्वरूप त्या शहराला प्राप्त होतें हें उघड आहे. तरी पुढील वाक्यांत दर्शविलेली उणीव त्या व्यवस्थेंत कायमच असे.

पृ० ६४. पं० ५—शेरीफ यांच्याविषयीं पृष्ठ ६७ व ९१—२ पहा. पं० ६ उक्ती रकम देण्याची चाल पडल्यामुळें, हुजुराचा संबंध दरएक नगरवासी व्यक्तीकडे न राहतां सगळ्या गांवाकडेच असे. तेणेंकरून गांवाला जूटीनें काम करण्याची संवई लागे; आणि आपण गांवकरी सगळे एक, आणि हुजूर अंमलदार आपले प्रतिस्पर्धी, असा भाव उत्पन्न होण्यास एक कारण होत असे. पं० ७ बेलिफ हा साधारण कारभार पाहणारा अंमलदार असे. पृष्ठ ६९ पहा. पं० ८ मेयर—पृष्ठ ७५ पहा. पं० ९ येथील वाक्यांत थोडी चूक झाली आहे. “ निवडावे ” या शब्दाच्या पुढें वाक्य असें असलें पाहिजे. “ इतके हक्क सामान्यतः त्यांना प्राप्त झाले होते; आणि आपल्या व्यापारी पूगांची सनदा मिळवून, व धंद्याच्या पूगांची सनदा मिळवून अथवा नजराणे देऊन, त्यांनीं सरकाराकडून मान्यता करून घेतली होती. ” पूग ह्मणजे एखाद्या धंद्यांतील अथवा व्यापारांतील मुख्य मनुष्यांची मंडळी. असे पूग आपल्या प्राचीन व्यवस्थेंत असत, असें स्मृतींवरून व धर्मशास्त्रनिबंधावरून स्पष्ट दिसतें.

पृ० ६६. पं० ७—पंधराव्या शतकापर्यंत, ह्मणजे सातव्या हेन्रीच्या कारकीर्दीपर्यंत इंग्लंडांत बडे लोक व उमराव, ज्यांना लार्ड अथवा पियर ह्मणतात, त्यांचें माहात्म्य बरेंच होतें. इसवी सन १२१५ सालीं त्या लोकांनीं जॉनराजाकडून माग्नाकार्टानामक मोठी सनद मिळविली, ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. परंतु १४५५ सालापासून एक मोठा युद्ध प्रसंग इंग्लंड देशांत सुरू झाला, त्याची पूर्ण समाप्ति १४८५ सालपर्यंत झाली नाहीं. त्या युद्धांत पुष्कळ उमरावांची कुळें बुडालीं, आणि सर्वांची मिळकत सामर्थ्य वगैरे फार कमी झालीं. तेणेंकरून उमराव लोकांची धास्ती राजकीय पक्षाच्या लोकांस फारशी राहिली नाहीं. १४८५ सालीं

सातवा हेन्री राजा इंग्लंड देशच्या गादीवर बसला, आणि तेव्हां पासून साधारण इंग्रजी प्रजेचेंच माहात्म्य वृद्धिंगत होत चाललें आहे. त्या वृद्धीला अजूनहीं अंत आला असें ह्मणतां येत नाहीं. पं० २० प्रजासत्ताक राज्य इंग्लंडांत १६४८ पासून १६६७ पर्यंत होतें. १६४८ सालीं पहिल्या चार्ल्स राजाच्या वर्तनाची चौकशी करून त्याचा शिरच्छेद प्रजेच्या मंडळीनें करविला. १६६० सालीं पुनःप्रतिष्ठापन झालें, ह्मणजे प्रजासत्ताक राज्य बंद होऊन पहिल्या चार्ल्स राजाचा मुलगा दुसरा चार्ल्स सिंहासनावर आला. पं० २३ उमरावांचें बल मोडलेलें, मध्यम प्रतीचे लोक सरकार दरबाराच्या प्रतिकूल पक्षाचे, ह्मणजे प्रजेचे हक्क जास्त दृढ करूं पाहाणारे, तेव्हां शहरांचें बल मोडण्याला सरकारच्या हातीं उपाय राहिला नाहीं. सुधारलेल्या धर्माचे ह्मणजे मूळचा इंग्लंड देशाचा रोमन क्याथलिक पंथ सोडून राहिलेले ( याबद्दल पृष्ट ४० यावरील टीप पहा. ) त्या काळचा राजा चार्ल्स याचें व त्याचा भाऊ जेम्स याचें रोमन क्याथलिक पंथाकडे विशेष वळण असे. प्रजा मात्र बहुतेक प्रॉटेस्टंट झाली होती. व्हिग ह्मणजे प्रजा पक्षाचे लोक.

पृ० ६७. पं० १०—इंग्लंड देशांतील मुख्य कोर्टांतले न्यायाधीश लंडन शहरांतच काम करीत नसतात, त्यांनां इनसाफ करण्याकरितां देशाचे भाग वांटून घेऊन त्या त्या भागांतलीं कामें पाहण्यास जावें लागतें. पं० ११ जेरिकोच्या तटाबद्दल बैबलांत एक गोष्ट आहे, ती अशी कीं एका प्रसंगीं त्या शहरास वेढा दिला असतानां तुतारी वाजल्याबरोबर ते तट कोसळले. त्या गोष्टीवरून "जेरिकोच्या तटा सारिखें" हा एक इंग्रजी भाषेत सांप्रदायिक शब्दसमूह झाला आहे. पं० १६.—सन १६८८ सालीं इंग्लंड देशांत राज्यक्रांति झाली. त्यावेळीं दुसरा जेम्स पदच्युत होऊन, त्याच्या जागीं तिसरा वुइलियम आणि त्याची बायको मेरी हीं प्रजेच्या साहाय्यानें सिंहासनारूढ झालीं. त्या वेळेपासून, पूर्वीं ह्मटल्याप्रमाणें, व्हिगपक्षाची ह्मणजे प्रजा जनपक्षाची बढती होत आहे. पं० २० याचा अर्थ असा कीं शहरांतील रहिवाशांचें लक्ष स्थानिक कारभारावर फार थोडें असून राष्ट्रीय घडामोडी मध्येंच विशेष होतें. पं० २३ जसजसा प्रजेंत ज्ञानाचा व सार्व-

जनिक कार्यांविषयीं उत्साहाचा फैलावा जास्त होतो, तसतशी नगरव्यवस्था बदलावी, आणि प्रजेच्या स्वाधीन सत्ता जास्त करून हुजुराकडील कारभार कमी व्हावा, हें उचित आहे आणि फायदेशीर ही आहे. पण तसें त्यावेळीं झालें नाहीं. पं० २८ पैसा—अमुक उमेदवाराच्या तर्फेनें संमति द्यावी ह्मणून संमति देणारांस त्याकाळीं पैसा देण्याचा क्रम जारीनें चालत असे. तो आलिकडे फार कमी झाली आहे.

पृ० ६८ पं० २—सर्व शहराचा कारभार जो असे, तो या राजकारणसंबंधी कलावर लक्ष ठेवून चालत असे; ह्मणजे उदाहरण, जागा द्यावयाच्या त्या हुद्याच्या कामाविषयीं लायकी पाहून द्यावयाच्या नाहीं, तर केवळ पार्लमेंट सभेच्या निवडणुकींमध्यें ज्यांची मदत उपयोगी पडेल किंवा पडली असेल त्यांनां द्यावयाच्या, हा नेहमींचा क्रम असे. यामुळें अनेक वेळां शहराचें नुकसान झाल्या वांचून राहणार नाहीं. पं० १३ नवीन स्वतंत्र रहिवासी करणें तें पूर्वीच्या स्वतंत्र रहिवाशांच्या ठरावानें करितां येतात.

पृ० ६९ पं० ५—पृ० ६५ पहा. पं० १७ दीनजन—याचा अर्थ असा झाला कीं, ज्या लोकांचें पोषण इतरांच्या द्रव्यांतून होणार, त्यांनां पार्लमेंट सभेचे सभासद निवडण्याचा हक्क असे; आणि ज्यांच्या द्रव्यानें त्यांचें पोषण होणार त्यांनां कांहीं तसला हक्क नाहीं. पं० १२ अनन्योपभोग्य हक्क ह्मणजे उदाहरणार्थ, कांहीं प्रकारचा माल अमुक एक व्यापाऱ्यानेंच विकावा दुसऱ्यानें विकूं नये, अशा प्रकारचा हक्क. पं० २१ मक्ते ह्मणजे शहराकरितां कांहीं काम करण्याबद्दलचें कंत्राट ज्याला ह्मणतात ते.

पृ० ७१ पं० ७—सुटी ह्मणजे अमुक व्यापाऱ्याच्या मालावर दस्तुरी माफी करणें वगैरे. प्रतिबंध ह्मणजे अमुक ठिकाणींच किंवा अमुक वेळींच माल विकावा वगैरे. अधिकाराच्या मुदती कमी झाल्यापासून फायदा असा होतो कीं, निवडलेल्या मनुष्याला जनाभिप्रायाविषयीं बेपर्वा राहून चालत नाहीं, कारण तसें केल्यास आपली निवड पुनः होणार नाहीं अशी त्याला धास्ती असते.

पृ० ७२—अन्यादेय भूमिभोगाचा हक्क—मागें धर्मोपाध्याय वगैरे मंडळी-

र्नी धर्मभोळे लोकांकडून मठांस अथवा इतर धर्मादायाच्या कामांस मिळकत बक्षिस करून घेण्याचा क्रम फार मांडिला होता. तशी मिळकत एकदां बक्षिस केली, ह्मणजे मग ती तेथल्यातेथेंच राहात असे. कारण धर्मादायास दिल्यामुळें तिची विक्री वगैरे करितां येत नसे. हें न व्हावें ह्मणून, असा कायदा झाला कीं, संभूयकारी मंडळ्या, मग त्या धर्मसंबंधी असोत अथवा लौकिक असोत, त्यांना स्थावर मिळकत देण्यास निषेध आहे. हा नियम नागरिक वगैरे संभूयकारी मंडळ्यांस लागत नाहीं. ह्मणजे इतरांस देतां येऊं नये अशा अटीनें त्यांस स्थावर मिळकत दान करितां येतें, आणि ह्या मंडळ्यांना घेतां येते. पं० २१ पृष्ठ ६९ पहा.

पृ० ७३. पं०—११ जुरीमार्फत न्यायाची चौकशी करण्याची चाल मुंबईंत कलकत्त्यांत व मद्रासेंत सरू आहे. पुणें वगैरे कांहीं दुसऱ्या शहरांत ही ही चाल कांहीं वर्षांपासन प्रचारांत आहे. इंग्लंड देशांत दिवाणी व फौजदारी अशा दोन्हीं कामांत जुरी असते. आपल्याकडे केवळ फौजदारी चौकशींत मात्र तिचा उपयोग होत असतो.

पृ० ७४. पं० १९—१८७२ सालचा कायदा गुप्तरीतीनें संमति देण्याच्या प्रकाराविषयीं आहे. पं० २३ पृष्ठ ९७ येथील टीप पहा.

पृ० ७९. पं० २३—पहिला मान—इंग्लंड देशांत सन्मानाच्या संबंधानें पायऱ्या पायऱ्या लाविलेल्या आहेत. आणि हिंदुस्थान देशांत ही याबद्दल वॉरंट ऑव्ह प्रिसीडन्स नामक राणीसरकारचा हुकूम आहे, त्यांत गवर्नर जनरल, गवर्नर, कमांडर इनचीफ, चीफजस्टीस, व इतर अंमलदार व दुसरे गृहस्थ यांच्या मानमरातबाबद्दल पायऱ्या बसवून दिल्या आहेत. आपल्याकडे अग्रपूजा ह्मणून जी असते, तिच्यांतलें आणि यांतलें बीज एकच आहे. पं० २९ कोणी प्रसिद्ध परदेशांतला गृहस्थ लंडनास गेला तर त्याच्या करितां मोठा खाना करण्याची वहिवाट आहे. तसेंच राष्ट्रीय प्रधानमंडळीस दरसाल जेवण्याला लंडन शहराच्या तर्फेनें लार्डमेयर बोलावीत असतो. अशाप्रसंगीं सर्व व्यवस्था मेयराकडून होत असते, आणि खाना आटोपल्यावर संभाषणें होत

असतात, त्यांत कांहीं प्रसंगीं मोठ्या राजकारणी कारभाराविषयीं देखील गोष्टी सांगण्यांत येत असतात.

पृ० ७६. पं० २१—आपल्या आक्टा अन्वयें आपली व्यवस्था झटली ह्मणजे, फ्रान्स व इंग्लंड देशांतील जी व्यवस्था येथें दाखविली आहे, त्या दोन्हींच्या पासून भिन्न आहे, ह्मणजे इंग्लंड देशापेक्षां आपल्याकडील प्रजेस हक्क कमी आहेत, आणि फ्रान्स देशापेक्षां अमळ जास्त आहेत. पृष्ट १८ वरील टीप पहा.

पृ० ७७. पं० १८—पृष्ट ८६ व पूढील पृष्टें पहा. स्वस्थता राखणारे ह्मणजे पोलीसवालेच ह्मणावयाचे. पं. २९—६ जस्टिस यांच्या बद्दल पृष्ट ९९ पहा.

पृ० ७८. पं० १२—कौंटीकोर्टें ह्मणजे आपल्याकडे ज्या कोर्टांना स्मालकाज कोर्ट ह्मणतात तशीं कोर्टें. पं० १९ लैसन्स ह्मणजे दारू तयार करणें अथवा विकणें याकरितां परवाना देतात तो. पं० २१ या कारकुनाचें काम फौजदारी चौकशींत चार्ज वांचून दाखविणें व कौंटीच्या संबंधाची दुसरीं कार्यें करणें असे आहे.

पृ० ७९. पं० १९—पृथक्कृति करणारा मुंबई वगैरे राजधान्यांत आहे, त्याच्या एका कामगिरी विषयीं १८७२ चा आक्ट १० ( क्रिमिनल प्रोसिजर कोड ) पहा. पं. २९ आपला लोकल बोर्ड आक्ट कलम ३२ व म्युनिसिपालिटीचा आक्ट कलम ३७ पहा.

पृ० ८०. पं० ६—संक्षिप्त चौकशी सारखा प्रकार आपल्याकडे सन १८७२ चा आक्ट १० यांत आहे. पं० १४ कायद्याविषयीं गैरमाहितीमुळें गुन्हा झाला अशी तकरार आरोपितांच्या तर्फे केली असतां चालत नाहीं. कायदा झाल्याक्षणीं त्यास अनुसरून सर्व प्रजेचें वर्तन झालें पाहिजे; नाहीं तर कायद्याप्रमाणें गुन्हा करणारा दंडास पात्र होतो. हा औत्सर्गिक नियम ठीकच आहे, कारण तसा नियम नसला, तर कोणत्याही गुन्हेगारानें ह्मटलें कीं मला कायदा माहित नव्हता, ह्मणजे त्याच्यावर माहित होता असें शाबीत करणें कठीण पडेल, आणि शाबिती न झाल्यास गुन्हा झाला असतांना देखील शिक्षा होणार नाहीं, व अन्याय फार वाढेल. पण असाच नियम स्थानिक कायद्यावि-

षयीं नसला तरी अशी गैरसोई होत नाहीं, ह्मणून त्यांच्या विषयीं नियम अंमळ भिन्न आहे.

पृ० ८१. पं० १६—पृष्ट ९६ पहा. पं. १९ सार्वजानिक दिवाणखाना ह्मणजे ज्याला टौनहाल ह्मणतात तो. हें स्थल सार्वजनिक सभा वगैरे भरविण्यास उपयोगीं पडतें. पं. २१ आपला म्युनिसिपालिटीचा आक्ट कलम १९ पहा. हुजूर जामदारखान्याचें अंमलदार जे असतात त्यांच्यामध्यें मुख्य एक राष्ट्रीय प्रधान असतो. पं. २९ कामकरी लोकांच्या घरांकरितां लांब मुदतीचे पट्टे देतां येतात, याचें कारण हेंच कीं, त्यांना याशिवाय चांगलीं घरें मिळणें फार कठीण पडतें, आणि शहरांतील कर बहुतेक त्यांच लोकांकडून घेतले जातात, तेव्हां शहरची जमीन त्यांच्या हिताकडे लाविली तर त्यांत कांहीं गैर नाहीं.

पृ० ८२. पं० २—असा विनियोग मागें होत असे, हें वर दाखविलेंच आहे. पृष्ट ६८ पहा. पं० २८ कार्टर सेशन वगैरे कोर्टें सर्वच शहरांत नसतात, हें वर दर्शविलेंच आहे. तेव्हां गुन्ह्यांची चौकशी कौंटीच्या कोर्टांत करावी लागते. तशा प्रसंगाबद्दल कांहीं पैसा शहरांनीं कौंटीस द्यावा हें न्याय्यच आहे.

पृ० ८३. पं० ९—इंग्लंड देशांत पोलिसाचा खर्च कांहीं अंशी राष्ट्रीय करांतून, आणि कांहीं अंशी स्थानिक करांतून, मिळतो. आपल्याकडे सर्व खर्च व व्यवस्था बहुत करून हुजुराकडेच आहे. मुंबई वगैरे राजधानींत मात्र खर्चाचा बराच अंश स्थानिक अंमलदारांकडून घेऊन सरकार व्यवस्था चालवितें. लॉर्डरिपनसाहेबांच्या ठरावांअन्वयें या स्थितींत फेरफार व्हावा असें आहे. पं० ८—पैसा उसनवारी काढिला ह्मणजे त्याबद्दलचा बोजा हल्लींच्याच प्रजेवर न पडतां पुढील प्रजेवर कांहीं अंशी टाकतां येतो, आणि ज्या कामावर तो पैसा खर्च होतो तें काम चिरस्थायी असलें ह्मणजे ही व्यवस्था न्याय्यच आहे. जर तशा कामावरील खर्च चालू उत्पन्नांतून फेडला, तर त्या कामाचा सर्व बोजा हल्लींच्या कर भरणारांवर पडून, पुढील प्रजेस त्या कामांपासून होणारा फायदा फुकट मिळणार आहे.

पृ० ८४. पं० ३ पहिल्या प्रकारांत हप्ते सावकारास वेळच्या वेळीं

भरले पाहिजेत. दुसऱ्या प्रकारांत हप्ते न भरतां शहरांनीं आपल्याकडेच हप्ते एकत्र करून ठेविले पाहिजेत, आणि ठरविलेली मुदत भरली ह्मणजे सगळी रकम एकदांच फेडली पाहिजे. सावकार हप्तेबंदीनें घेण्यास कबूल असला तरच पहिला प्रकार चालूं शकतो, नाहीं तर दुसराच प्रकार अंमलांत आणिला पाहिजे. दुसऱ्या प्रकारांत व्याजाचा दर बहुशः जास्त पडतो, त्या प्रमाणें एकत्र केलेल्या हप्त्यांचें व्याज रिणकोस मिळतें. पं० १९ कायद्याचा मसुदा ह्मणजे पैसे उसने काढण्यास मंजुरीच्या कायद्याचा मसुदा. मागील पृष्ट पंक्ति २९ पहा.

पृ०८५पं०१मुंबई म्युनिसिपालटीचे हिशेब तपासनीस म्युनिसिपालिटीच नेमीत असते. पं० १९काहीं कामांत कनिष्ठ कोर्टाचे हुकूम रद्द करण्याकरितां वरिष्ठ कोर्टाकडे अपील करण्याचा मार्ग ह्मटला ह्मणजे सार्शीयोरेराईचा हुकूम काढावा हा आहे. तीच चाल या कामांत लागू केली आहे. पं० २८ आपल्या आक्टांत ही याविषयीं कलमें आहेतच.

पृ० ८६ पं० २२ पृ० २१ पहा.

पृ० ८७पं० ८ कौंटीच्या अंमलाबाहेरलीं,ह्मणजे हद्दीच्या आंत असून अंमलाबाहेरलीं स्थानें. पं०१३नार्मन विजय,– फ्रान्स देशांतील नार्मंडी प्रांताचा वुइलियम नामक राजा यानें १०६६सालीं साक्सन लोकांचा पाडाव करून इंग्लंडांत आपलें राज्य वसविलें, त्या गोष्टीला नार्मन विजय असें ह्मणतात.त्याच्यापूर्वीं जे राजे होते त्यांपैकीं एड्गर ह्मणून एक होता तो९५९ पासून ९७५ पर्यंत राज्य करीत होता. पं० १८ रीव हा व्यवस्था पहाणार मुख्य अंमलदार असे. पं० २४ अमेरिकेंत जें मोठें राष्ट्र आहे, त्यांत लहान लहान राज्यें अनेक आहेत, तीं आपापला सामान्य कारभार स्वतंत्र रीतीनें चालवितात, आणि कांहीं कार्यांस्तव मात्र त्यांचें ऐक्य झालें आहे. त्यांना युनैटेड स्टेट्स असें नांव आहे. त्यांचा मुख्य कारभार चालविणारा राजा नसतो, त्याला प्रेझिडेंट अथवा अध्यक्ष असा किताब आहे. आणि तो नियमित अवधीपर्यंत कामावर राहातो. अवधि संपल्यावर नवीन अध्यक्षाची प्रजेकडून निवड होऊन नेमणूक होते. पं० २८ हे न्यायाधीश सगळ्या देशभर फिरून सर्व मोकदम्यांची चौकशी ठिकठिकाणीं करीत असत.

पृ० ८८ पं० ४ तो इजारदार असल्यामुळें, व एक वर्षांनंतर हुद्यावर राहणें न राहणें राजाच्या मर्जीवर असल्यामुळें, निस्पृह नसून सरकारच्याच तंत्रानें वागत असे. पं० १३ तीन वर्ग ह्मणजे प्रजेतील सामान्य लोक एक, आणि बडे लोकांचे दोन वर्ग, एक धर्मसंबंधीं बडे लोक ह्मणजे महोपाध्याय वगैरे, आणि लौकिक संबंधाचे ह्मणजे अर्ल, बारन वगैरे. पं० २९ विज्ञप्ति ह्मणजे ग्रांड ज्युरीनें स्वत: जाहीर केलेली हकीकत. फौजदारी कामासंबंधीं कोर्टांत चौकशी व्हावी, असा जो ग्रांड ज्युरीचा हुकूम होत असतो, तो सरकारतर्फे ग्रांडज्युरी पुढें तें प्रकरण आल्यावरून होतो.

पृ० ८९ पं० ११ बारा पौंड आकारणीचा वहिवाट करणार, ह्मणजे ज्या मिळकतीची आकारणी बारा पौंड असेल त्या मिळकतीची वहिवाट करणार. या लोकांनां, अलीकडे जे पार्लमेंट सभेच्या सुधारणेकरितां ( पृष्ट ९१ यावरील टीप पहा ) कायदे झाले आहेत, त्यां अन्वयें संमति देण्याचा हक्क प्राप्त झाला आहे. हा हक्क त्यांना पूर्वीं नसे. पं० १४ न्यायरक्षणबहिष्कृत—मागें अशा लोकांस ठार मारलें असतां, त्या कृत्यास खून ह्मणून गणीत नसत. आतां तसें नाहीं. पं० २३ लॉर्ड लेफ्टेनंट या बद्दल पुढील पान पाहा. पं० २६ सरंजामें—पृष्ट ३७ या वरील टीप पहा.

पृ० ९० पं० ६ यांविषयीं विशेष माहिती पुढें दिली आहे. पं० १७ स्थानिक अर्ल ह्मणजे शायर अथवा कौंटीचा मुख्य कारभार चालविणारा अंमलदार असे.

पृ० ९१ पं० ३ याचा अर्थ असा कीं, लॉर्ड लेफ्टेनंट लिबरल पक्षाचा असला तर आपल्या पक्षाच्या लोकांची नेमणूक करून घेतो, कान्सर्वेटीव असला तर त्या पक्षाच्या लोकांची करून घेतो. खरोखर ह्मटलें ह्मणजे, अमुक एक मनुष्य कौंटीच्या कामास लायक आहे कीं नाहीं, हाच विचार व्हावा; तो कान्सर्वेटीव आहे किंवा लिबरल आहे या गोष्टीचा मुळींच विचार होऊं नये. पृ० ४ आल्सोल्स दिवस ह्मणजे नोवेंबर महिन्याची दुसरी तारिख. हें नांव पडण्याचें कारण असें कीं, त्यादिवशीं सर्व जीवांची( ऑल सोल्स) पर्गेटरी नामक नरक लोकांतून सुटका व्हावी एतदर्थ प्रार्थना करण्याची वहिवाट आहे. पं० २३ पृष्ट८८ पहा. पं०२८ पृष्ठ७९ या वरील टीप पहा. पं० २९ मुंबईत व दुसऱ्या राजधानींत फौजदारी सेशन ज्यावेळेस

भरतें त्यावेळेस न्यायाधीश कोर्टांत येतानां त्याच्या समोर शेरीफ चालत असतो, व कोर्टांत बेतवात व व्यवस्था राखणें आणि दंगा न होऊं देणें, हें काम शेरीफाचें आहे.

पृ० ९२ पं० ३ बजावणीच्या कामांत शेरीफ हा आपल्या नाझरासारिखा बऱ्याच अंशीं आहे. कार्यसाधक ह्मणजे बजावणींत मिळकत घेणें, विकणें, मनुष्यास पकडणें, पैसे वसूल करणें, वगैरे कामें करणारा. पं० २४ मानरा बद्दल पृष्ट ९ यावरील टीप व पृ ३७ पहा.

पृ०९३ पं.७ ह्या हपीसांतूनच मागें पार्लमेंट सभेकरितां निवडणूक करण्याचा हुकूम निघत असे. इतर नेमणुकींबद्दल ही हुकूम या खात्याच्या मार्फतच होत असत. पं. ११ प्रतिज्ञा ह्मणजे आपण जमिनीचा मालक आहे अशी प्रतिज्ञा. पं०१५ काहीं घराण्यांचीं गाडण्याचीं स्थलें मालकीचीं असतात त्यांस अनुलक्षून हें वाक्य लिहिलें आहे. पं० १८ रा.रा. गोपाळ गणेश आगरकर यांनीं केलेलें हाम्लेट नाटकाचें भाषांतर पहा. विकार विलसित पृष्ट १४७. पं० २४ लॉर्ड चान्सलर हा न्याय खात्यांतील वरिष्ठ अंमलदार होय.

पृ० ९४ पं० ६ देवदंड ह्मणजे ज्या वस्तूच्या योगानें एखादा मनुष्य मरण पावतो ती. उदाहरण, एखाद्याच्या अंगांवरून गाडी जाऊन जर तो मरण पावला, तर ती गाडी देवदंड अशी मागें इंग्लंड देशांत मनीत असत, ह्मणजे ती राजानें घेऊन धर्मकृत्यास लावावी, असा नियम असे. नंतर राजानें आपला हक्क ज्या कौंटींत असा अपघात होई त्या कौंटीस असावा, असा ठराव केला होता. याबद्दल १८७१ सालचा आक्ट ४ पहा. पृ०२० मरणोत्तर परीक्षा ह्मणजे शवाचें पोट वगैरे चिरून आंतील स्थितीचा तपास करणें.

पृ० ९५पं.६ कार्टर सेशन सभा, ही सर्व कौंटीच्या कामाकरितां भरत असते. पेटा सेशन सभा, ही फक्त पोटाविभागाच्या कामाकरितां. पं. १९ कबजा नसून मालकी असली, आणि कबजा मिळण्यास कोणी दुसऱ्या मनुष्याच्या अल्पकालिक हक्कापासून मात्र प्रतिबंध असला, तर तें सप्रतिबंध स्वत्व. त्याला इंग्रजींत रिवर्शन ह्मणतात. प०२१ ह्मणजे तें मिळकतीच्या मानाच्या संबंधानें लायक नसले, तरी इतर गोष्टी अनुकूल असल्या-

स लायक आहेत. पं० २८ सुपरिंटेंडेंट वगैरे पोलिसांतील निरानिराळ्या अंमलाच्या पायऱ्या आहेत.

पृ० ९७ पं० १५ जानपद देशाविभाग ह्मणजे खेडीं पाडीं वगैरे; पौर ह्मणजे शहरें नगरें वगैरे. शहरांत लोकसंख्या इतर प्रदेशापेक्षां फार जास्त असते हें पूर्वी दाखविलेंच आहे. पृष्ट १० व त्या वरील टीप पहा.

पृ० ९९ पं० १३ ड्रेनेज नांवाच्या विषयावर आलिकडे मुंबईंत व पुण्यांत बरीच चर्चा चालू आहे; त्या विषयाच्या संबंधानें येथें सुचविलेल्या मुद्यांचा विचार हाच मुख्य विचार कर्तव्य असतो.

पृ० १००पं०२६—दाट भरलेल्या घरांत राहाणाऱ्या गरीब मनुष्यांमध्यें तंटे बखेडे होण्याला सवडी फार असतात हें अनुभवसिद्ध आहे. तसेंच इतर प्रकारचे हा दोष त्यापासून उद्भवतात

पृ० १०१ पं०८—पृष्ट ३७पहा.पं०११शेक्सपियर हा इंग्लडांतला मोठा नाटककर्ता; ह्मणजे आपल्या कालिदासासारखा त्याला इंग्रजी भाषेंतील ग्रंथकर्त्यांमध्यें मान आहे.पं०२६ खाडे ह्मणजे मोकळे पडलेले गटर वगैरे.

पृ० १०५ पं० १९ पृष्ट७२ यावरील टीप पहा.

पृ० १०७ पं० २३ पृष्ठ ४१यावरील टीप पहा.

पृ० १०८ पं० १२ पार्लमेंटसभेकडून स्थानिक मंडलांनां कांहीं मदती करितां रकमा देण्यांत येत असतात. पृष्ट १३ यावरील टीप पहा.

पृ० ११० पं० ८ पाण्याचा पुरवठा करण्या करितां खासगी मंडळ्या इंग्लडांत अनक आहेत. त्यांना विशेष हक्क वगैरे पार्लमेंटसभेनें केलेल्या कायद्या अन्वयें दिले आहेत.

पृ० १११पं. ११ मेलेल्या माणसांचीं प्रेतें त्यांच्या आप्तांनां ओळखण्या साठीं वगैरे ज्या घरांत ठेविलेलीं असतात त्या घरांनां मृत्युगृहें ह्मणतात.

पृ० १११ पं. २० पडदे पाडतात घरांत कोणी राहात नसलें ह्मणजे खिडक्यास जे पडदे इंग्लंड देशांत असतात ते पाडून ठेवण्याची वहिवाट आहे. घरांत कोणी नसल्यामुळें उजेडाची जरूर नसते.

पुढील पंक्तींत दर्शविल्या रीतीनें हवा कोंडून राहिली ह्मणजे रोग प्रसाराचा संभव जास्त असतो. पं० २९ बीजनाश करण्याचे वैद्य लोकांचे निरानिराळे प्रकार असतात, वस्त्रें प्रावरणें जाळून टाकणें, जमीन उकरून काढणें, सर्व घरभर धूप वगैरे जाळून धुरी देणें, वगैरे.

पृ० ११२ पं० २९ कनिष्ठतर ह्मणजे सधन लोकांच्या वर्गांतले ही नाहीं, आणि केवळ दीन जनांपैकीं ही नाहीं, असे लोक.

पृ० ११५ पं० ८ मार्किट दस्तुरी ह्मणजे मार्किटांत दुकान घालून बसण्याकरितां जी फी द्यावयाची ती.

पृ० ११६ पं० ११ आपला लोकलबोर्ड आक्ट १ यांतील कलम ६६ पहा.

पृ० १२० पं० १६ धर्मसंबंधीं निःपक्षपाताचा नियम, ह्मणजे शाळेमध्यें धर्मसंबंधीं शिक्षण चालत असतांना, इतर धर्माच्या अथवा धर्मपंथाच्या विद्यार्थ्यांना तो धडा शिकण्याची जरूरी नसावी, आणि त्यांना त्या वेळीं आपल्या वर्गांतून बाहेर जाण्याची मोकळीक असावी, हा नियम. या नियमावरून, सर्व मतांच्या लोकांकडून एकत्र केलेला देशाचा वसूल एका धर्ममताच्या प्रसाराकडे लागतो असें ह्मणावयाला जागा राहात नाहीं. कारण तो पैसा धर्मव्यतिरिक्त विषयांच्या शिक्षणाकडे मात्र लागतो, धर्मशिक्षणाकडे मुळींच लागत नाहीं.

पृ० १२१ पं० ६ लोकलबोर्ड आक्ट १ कलम ६ आणि २१ नोवेंबर १८८४ रोजीं मुंबई सरकारानें केलेले नियम ३ व ४ पहा.

पृ० १२२ पं० २२ तारीख २१ नोवेंबर १८८४ रोजीं मुंबई सरकारानें केलेल्या नियमांपैकीं ७ व्या नियमांप्रमाणें शिक्षक नेमण्याचा अधिकार सरकारानें आपल्याकडे ठेविला आहे. पण मुंबईतल्या शाळा म्युनिसिपालिटीकडे वर्ग करण्याच्या कामासंबंधीं सरकारी ठरावांत हा अधिकार मुंबईच्या स्थानिक मंडळास द्यावा असें मुंबई सरकारचें ह्मणणें आहे. कांहीं अटी मात्र ठेवाव्या असा त्यांचा अभिप्राय आहे.

पृ० १२३ पं० १ ज्या शाळेंत निरनिराळे उद्योग मुलांनां शिकवितात, व ज्या शाळेला शिकविण्याकरितां दाखला मिळाला आहे, अशा शा-

ळेंत मुलांना पाठवितात; तेणेंकरून शाळेंत जितके दिवस मुलें राहतील तितक्या दिवसांत त्यांना आपापल्या कुटुंबांतील मनुष्यांच्या चरितार्थाचें एक साधन प्राप्त होतें.

पृ० १२५ पं० ५ पृष्ट १२० यावरील टीप पहा.

पृ० १२६ पं० १९ या साधारण राजमार्गा संबंधी खर्चाबद्दल पुढील पृष्ट पहा.

पृ० १२७ पं० ९ राजमार्ग देशविभाग वगैरे यांबद्दल माहिती याच भागांत पुढें दिलेली आहे.

पृ० १२९ पं० २१. पृष्टें १०५ व ११४ पहा.

पृ० १३० पं० ९. व्यापाराच्या रीतीनें ह्मणजे दरएक मुडदा गाडण्याबद्दल अमुक ठरीव फी स्थलाच्या मालकास द्यावी अशा नियमानें.

पृ० १३१ पं० १२. या संबंधानें पृष्ट २४ पहा.

पृ० १३२ पं० १०. शहरांत कामाच्या संबंधानें येणारे जाणारे लोक पुष्कळ असतात, ते रात्रीं शहरांत निजायला राहत नाहींत. निजणारे ह्मटले ह्मणजे कायमचे राहणारे.

पृ० १३३ पं० १५ यांविषयीं पृष्ट २३ पहा.

पृ० १३४ पं० ९. ठिकाणा ठिकाणाप्रमाणें ह्मणजे माजिस्त्रेटाच्या हद्दींत माजिस्त्रेट, आणि त्या हद्दींच्या बाहेर कौंटीजास्टिस परवाने देतात.

पृ० १३७ पं० ९. रेक्टर हा पारिशांतला एक धर्मसंबंधीं अमलदार आहे.

पृ० १३८ पं० ७.—पृष्ठ ९५ पहा. पेटी सेशन कोर्टाच्या अधिकारांबद्दल पार्लमेंट सभेचे पुष्कळ आक्ट झाले आहेत.

पृ० १३८ पं० २५. पृष्ट १३२ पहा. व्यवस्था शास्त्रीयरीत्या सुश्लिष्ट नसतां देखील, कारभारांत कांहीं दोष दिसून येत नाहीं, याचें हें एक उदाहरण आहे. दोन सभांचे अंमल अमर्यादित असले, ह्मणजे त्यांच्यामध्यें विरोधाचे प्रसंग यावे हें फार संभवनीय आहे. पण व्यवस्थापक सार्वजनिक कामाकरितां झटणारे आणि कारभार करण्याच्या

लायकीचें असलें, ह्मणजे व्यवस्थेबद्दलचे सिद्धांत ठीक नसले तरी व्यवहारांत कारभार ठीक चालण्यास हरकत उत्पन्न होत नाहीं.

प० १३९ पं० १. लंडन शहरांत फ्रीमेन अथवा हक्कदार लोकांच्या मंडळ्या आहेत, आणि त्या मंडळ्यांच्या प्रत्येक सभासदास त्या नात्यानें बारिस्टर, युनिवर्सिटीचे पदवीधारी, वगैरे लोकांसारिखा एक विशेष प्रकारचा पोषाख ( लिवरी ) घालण्याचा हक्क आहे, आणि कांहीं निवडणुकींमध्यें संमति देण्याचाही हक्क आहे. पोषाखाबद्दल कांहीं फी द्यावी लागते. पं० ९ शेरिफ याबद्दल पृष्ट ११ पहा. पं० १९ मान्शनहौस हें लंडनच्या मेयराचा जो राहावयाचा बंगला त्याचें नांव आहे. पं० २९ हें कौंटी कोर्ट ह्मणजे स्मॉलकॉज कोर्टच ह्मणायाचें, असें पूर्वीं सांगितलें आहे. पं २८ अशा कामांत निवडणार लोकांना आपल्या जबाबदारीबद्दल जशी पूर्ण सावधगिरी असली पाहिजे, तशी निवडणारांची संख्या मोठी असली ह्मणजे राहात नाहीं, आणि त्यांच्याकडे खासगी रीतीनें संधानें चालण्यास ही मार्ग सुलभ असतो.

प० १४० पं० १२.—मुंबईंत अशा प्रकारचें मंडल असावें अशी सूचना कौन्सला पुढें करण्यांत आली होती, पण ती मंजूर झाली नाहीं. आणि आपल्या माजी गव्हर्नर साहेबांनीं मुंबई सरकार हेंच स्थानिक-राज्यव्यवस्थामंडलासारिखें मानिलें पाहिजे, असें त्या प्रसंगीं बोलून दाखविलें. या प्रकारची सूचना बंगाल्यांतही झाली होती, पण तेथें लॉर्ड रिपन साहेबांनीं ती मान्य केली नाहीं असें ऐकल्याचें आठवतें.

प० १४१ पं० ४. लोकलबोर्ड आक्ट १ कलम ६२ आणि पुढील कलमें आणि म्युनिसिपालिटीचा आक्ट २ कलम ३७ आणि पुढील कलमें, यांअन्वयें नियमांबद्दल केलेले ठराव मुख्यत्वें-करून येथें दर्शविलेल्या सिद्धांतांच्या अनुरोधानेंच केलेले आहेत. ते अंमलांत आणण्याच्या कामांत कांहीं फाजीलपणा कदाचित् होण्याचा संभव आहे खरा, पण त्याबद्दलची तजवीज सरकारानें, स्थानिक अंमलदारांनीं, व सर्व प्रजाजनांनीं, सावधगिरी राखून वेळच्यावेळीं करावी हें उचित आहे. अशा प्रकारची सावधगिरी राखण्याची आवश्यकता आपल्याला पडावी, हें एका अर्थीं चांगलेंच आहे, कारण

स्थानिक स्वातंत्र्य व स्थानिक सत्ता यांचें मोल आपल्याला कळण्यास, तें राखण्याकरितां मेहेनत पडावी हें एक मोठें साधन समजलें पाहिजे. इंग्लंड देशांत प्रजेला जें स्थानिक व राष्ट्रीय स्वातंत्र्य हल्लीं आहे, तें त्यांनीं आपल्या अंगमेहनतानें मिळविलें आहे. तशा मेहनतीची जरी स्वातंत्र्य-प्राप्ती करितां आपल्याला फार आवश्यकता पडली नाहीं, तरी स्वातंत्र्य रक्षणाकरितां ती पडल्यापासून आपलें तें हित होणार आहे, तें आपण साधून घेतलें पाहिजे. पं० १३ होम हपीस ह्मणजे होम सेक्रेटरी साहेबांचें खातें. त्या विषयीं पृष्ट ४ यावरील टीप पहा.

प० १४२ पं० १२ राष्ट्रीय प्रधानमंडळ सगळें राणी साहेबांच्या मर्जीनुरूप हुद्यांवर राहतें असा शास्त्रीय नियम खरा. मागें व्यवहारांत ही तसेंच असे. आतां व्यवहार बहुतकरून शास्त्रीय नियमास एकीकडे ठेवून चालला आहे असें ह्मटलें तरी चालेल. हौस ऑव्ह कॉमन्स सभेमध्यें ज्या पक्षाचें वर्चस्व त्यांतलि लोकांना राष्ट्रीय प्रधान मंडळांत जागा मिळते. आणि जोंपर्यंत तेथील वर्चस्व अव्याहत आहे, तोंपर्यंत सत्ता त्यांच्या हातीं राहातें. या प्रकरणांत आपल्या महाराणी साहेबांचें वर्तन अतिशय प्रशंसनीय आहे. त्यानीं आपला खासगी रीतीनें ज्यांच्यावर रोष असावा त्यांना देखील आपल्या प्रधानमंडळांत येण्याला हरकत घेतली नाहीं. आपल्या स्वतःच्या आवडनावडीपेक्षां देशकल्याणाकडे त्यांचें लक्ष विशेष आहे.

प० १४३ पं० २२.—रॉयल सोसाइटी ही पदार्थविज्ञानशास्त्र व तत्संबंधी विषयांचा तपास करणारी मोठी प्रसिद्ध मंडळी आहे. त्या मंडळीचे सभासद ह्मणजे पदार्थविज्ञानशास्त्रांत फार प्रवीण झालेले गृहस्थच असतात. पं २६ याबद्दल मुंबई लोकल बोर्ड आक्ट १ कलम ६२ व म्युनिसिपल आक्ट २ कलम ३६ यांत ठराव आहे. पील साहेबांनीं तारीख ९ जान्युआरी १८८४ रोजीं केलेल्या भाषणांत लॉर्ड रिपन साहेबांच्या भाषणांतील जो उतारा वाचला त्यांतही याबद्दल उल्लेख आहे. आणि असें कलम असण्याची आवश्यकता उघड आहे.

प० १४४ पं० २२.—खासगी कायदे—व्यक्तिव्यक्तीच्या अथवा कांहीं स्थानिक मंडलें वगैरे मंडळ्यांच्या अर्जांवरून, व केवळ त्यांच्याच हितास्तव, कांहीं कायदे पार्लमेंट सभेकडून करण्यांत येत असतात. उदाहरणार्थ ए-

खाद्या आगगाडीकरितां असा कायदा करण्यांत येतो. या बद्दल अर्ज करणारांना कांहीं फी भरावी लागते

पृ० १४९ पं० २३.—पृष्ट ९३ पहा. पं० २९ मुंबई लोकलबोर्ड आक्ट कलम ६३ व पुढील कलमें आणि म्युनिसिपालिटीचा आक्ट कलमें ३७—४ पहा. पं० २९ लोकलबोर्ड आक्ट कलम ६६ पहा. आपल्याकडील नियम फक्त आरोग्यसंबंधी कार्यासच लागू आहे असें नाहीं. तो लोकलबोर्डाच्या सर्व कामगिऱ्यांस लागतो.

पृ० १४६ पं० ७ आपल्याकडे या बद्दलची तजवीज १८७० सालचा आक्ट १० या अन्वयें होत असते. मुंबईच्या म्युनिसिपालिटीला सरकारानें या आक्टाअन्वयें जमीन घेऊन दिली आहे. पं० १९ आल्कली या आल्कली संबंधी कारखान्यांतून आरोग्यास अपायकारक वायु उत्पन्न होत असतात ह्मणून त्यांवर नियमन ठेवावें लागतें.

पृ० १४८ पं० ३.—पाण्यावरील कर—कारण दुधाकरितां ह्मणून जरी पैसा देण्यांत येतो तरी त्याबद्दल मिळतें काय तें पाणीच !! पं० १८ विक्रीबद्दल आपला लोकलबोर्ड आक्ट कलम ९ आणि म्युनिसिपालिट्यांचा आक्ट कलम १९ पहा. पं० १९ चलनशक्तिक यंत्रें ह्मणजे आगगाडी चालविणारें जें यंत्र असतें त्या प्रकारचीं यंत्रें.

पृ० १४९ पं० ४ पृष्ट ८९ पहा.

पृ० १५० पं० २.—प्रतिकारार्थक अथवा शासनार्थक कोर्टांतील काम=दिवाणी अथवा फौजदारी प्रकरण. नुकसान झालेला पैसा परत मिळण्याकरितां दिवाणी मोकद्दमा ह्मणजे प्रातिकारार्थक काम; आणि नुकसान ज्याच्या हातून झालें त्याला शिक्षा करण्या करितां चालविलेलें फौजदारी काम याचें नाव शासनार्थक काम. पृ० १९. हे सर्व सार्वजनिक पैका खासगी कामास लावण्याचे प्रकार आहेत. स्मारक किल्ल्या खेरीज करून बाकीचे प्रकार समजण्यास कठीण नाहींत. स्मारक किल्ल्या हा एक प्रकार विशेष प्रसंगाच्या स्मरणार्थ इंग्लंडांत प्रचारांत आहे. ह्मणजे कांहीं विशेष प्रसंगीं एखाद्या गृहस्थानें कांहीं स्मरणीय कृत्य केल्यास त्याला ह्या स्मारक किल्ल्या बक्षिसा दाखल देण्यांत येतात. पं० २९ आपल्या लोकल

बोर्ड आक्टांतील कलम ३३ व म्युनिसिपालिटीच्या आक्टांतील कलम २८ यांतील हेतु येथें दर्शविलेली सल्ला मसलत मिळावी हाच आहे. उदाहरणार्थ, विद्याखात्याच्या अंमलदारांनां, विद्येसंबंधी कामांतच त्यांचें कर्तव्य पडल्यामुळें, तत्संबंधी ज्ञान विशेष असण्याचा संभव आहे. आणि त्यांच्याकडून तशा कामांत सल्ला मसलत चांगली मिळण्याचा संभव आहे हें व्यवहारांत वारंवार स्पष्ट दिसून येतें. स्थानिक अंमलदारांनां इतर पुष्कळ कामें सांभाळावीं लागतात. तेव्हां सामान्यतः दरएक कामांत त्यांनां विशेष व्यासंगाच्या लोकां इतकें प्रावीण्य येऊं शकत नाहीं.

पृ० १९१ पं० ४.—याबद्दल पील साहेबांनीं २९ आगष्ट १८८३ रोजीं केलेल्या भाषणांत असाच अभिप्राय दर्शविला आहे. आणि सरकारानें आक्टांअन्वयें केलेल्या नियमांतील नियम १९ व पुढील नियम पहा. पं० १९ याच प्रकारचा अभिप्राय लॉर्ड रिपन साहेबांचा १८ मे १८८२ तारिखेचा ठराव कलम ७ येथें सांपडेल. आणि आपल्या कायदे कौन्सलांतील वादाच्या वेळीं मेकॉले साहेब व पील साहेब यांनीं ही हेंच बोलून दाखविलें होतें. तर या कामांत ज्या अडचणी आहेत, त्या टाळण्याकरितां स्थानिक अंमलदारांमध्यें, आणि विशेषेंकरून सरकारी अधिकाऱ्यांमध्यें, फार समंजसपणा, व तडजोडीनें कारभार चालवून घेण्याची इच्छा व संवई, यांची अतिशय जरूर आहे. नाहीं तर सरकारी अंमलदारांनीं ह्मणावें स्थानिक अंमलदारांच्यानें काम ठीक होत नाहीं, आणि स्थानिक अंमलदारांनीं ह्मणावें सरकारचे अधिकारी आग्रही, जुलमी आणि स्थानिक स्वराज्यव्यवस्थेस प्रतिकूल आहेत. असा प्रकार होण्याचा फारच संभव असतो. पं० २८. याच अभिप्रायाचें वाक्य लॉर्ड रिपन साहेबांच्या तारीख १८ माहे मे सन १८८२ च्या ठरावांत कलम ९ येथें आहे.

पृ० १९२ पं० १.—येथें जो सिद्धांत नमुद केला आहे, तो अंमलांत आणण्याला मोठें अधिकारी मंडल असलें पाहिजे. ह्मणजे सर्व कारभार व सर्व हुकूम हुजुराकडून होऊन, त्यांत दुसऱ्या कोणाला हात घालण्यास सत्ता नसली, तर काम लवकर होईल, आणि पुष्कळ लोकांच्या मतानें काम

होण्याला बहुधा जो विलंब अवश्यमेव लागतो तो लागणार नाहीं. पण या विषयांत दुसऱ्याही एका गोष्टीचा विचार करावा लागतो. ती गोष्ट ही कीं, स्थानिक कामें समजण्यास जितकें प्रजेला सुलभ पडतें, तितकें हुजुराकडील नेमिलेल्या अधिकाऱ्यांस पडणार नाहीं. आणि सर्वच कामें हुजुराकडून होऊं लागल्यास सरकारावरील बोजा असह्य होईल, आणि राष्ट्राचें काम अखेरीस बरोबर चालत नाहींसें होईल. लंडन शहराचा गौण भाग इंग्लंड देश अशा अर्थाचें जें वाक्य पुढें आलेलें आहे त्याचा मतलब ह्मणजे हुजुराकडून सर्व कारभाराचीं सूत्रें चालणें हाच होय.

---

# कोश.

अजमासपत्रक Estimate.
अधिकाररचना / अधिकारव्यवस्था Constitution.
अधिकाराधार Quo warranto.
अधिकारी Authority.
अननुगुण Unsuitable.
अननुमत Unauthorised.
अनन्यप्रवेश्य Close (corporation)
अनन्योपभोग्य हक्क Monopoly.
अनावश्यक कर्तव्य Duty of imperfect obligation.
अनुज्ञापक (कायदा) Permissive.
अन्यादेयभूमिभोग Holding lands in mortmain.
अपमृत्युपरीक्षक Coroner.
अप्रतिषेध (धर्मसंबंधी) Toleration.
अर्थसंबंध Interest.
अल्पजनसत्ताक Oligarchical.
अविच्छिन्नता Continuity.
आज्ञापत्र Order.
आयवर्धक Reproductive.
आयव्यय Income and expenditure.
आयव्ययाचें अजमास पत्रक Budget.
आरोग्यसंबधी वैद्य Health officer.
इष्ट Expedient.
उद्योगशाला Industrial school.
उन्मत्ताश्रम Lunatic asylum.
उपक्रम Recital, preamble.
उपद्रव निरसन Abatement of nuisance.
उपन्यास Recital, preamble.
उमराव Lord, peer.
एकव्यक्तिस्वरूप Individuality.
ऐकात्म्य Unity, identity.
कनिष्ठेतर वर्ग Better classes.
करपत्रक Taxation returns.
कर्ज फेडण्यास्तव पुंजी Sinking Fund. (ऋणशोधनार्थक पुंजी)
कर्मणुकींचीं स्थलें Recreation grounds.
कलापाठशाला School of art.
कलाविशेषसंबंधी Technical.
कामकरी Working men.
कारखानें (सार्वजनिक) Public works.
कारभाररीति Policy.
कारभाररीतीसंबंधी Administrative.
कार्यसाधकपणा Efficiency.
कालज्वर Typhus fever.
कृतसंकल्प Policy.
कोंडण्याच्या खोल्या Police cells.

कोष्टकें Tables.
कौतुकालय Museum.
गूढ Problem.
घटकावयव Constituent.
घटना Constitution.
चढाओढ Contest.
चर्मपट Parchment.
चलनशक्तिक यंत्र Locomotive engine.
चिरस्थायी Permanent.
चौकसनीस Inspector.
जनसमाज Society.
जनाभिप्राय Public opinion.
जलनिष्क्रमण Drainage.
जलपट्टी Water rate.
जानपद Rural.
टांकें Cesspool.
टांचण } Minutes.
टिपण }
ठोकताळ्याचे नियम Empirical laws.
तजवीज Scheme (Improvement schemes)
तपास करणारा Revising officer.
तूर्त बर्तर्फ करणें Suspend.
फ्तरी Departmental.
दरबारी मंडळी Court-party.
दशमांश Tithe.
दस्तुरी Toll.
दिम्मतदार Trustee.
दीनार्थकर Poor-law
दीनाश्रम Poor-house or workhouse
दुःश्लिष्टत्व Anomaly. (विधिभंग)
देवदंड Deodand.
देवालयकर Church-rate. (धर्मकर पहा.)
देवालयांगन Churchyard.
देशस्थितिसंबंधी माहिती Statistics.
द्रव्यसंबंधी Financial.
धर्मार्थकर Church-rate. (Better than देवालयकर).
धर्मसंबंधी निःपक्षपाताचा नियम Conscience clause.
धर्माधिकारी मंडल Ecclesiastical commission.
धर्मार्थ ग्रंथालय Free Library.
नगर City.
नगरव्यक्तीचें स्वरूप Incorporation.
नगरव्यवस्था Municipal organisation.
नमुन्याची अधिकाररचना Model constitution.
नालायकी Disqualification.
निथळणूक Drainage.
नियमन Control.
नियमसमूह Code.
नियामक Restriction
निरंतर स्वत्वानुवृत्ति Perpetual succession.
निर्णायकमत Casting vote.
निर्दिष्ट Defined, specified.

न्यायरक्षणबहिष्कृत Outlaw.
पडताळा Collation.
पंथांतर Dissent.
परदेशगमन Emigration.
परवाना License.
परसंपीडन Nuisance.
परसूं Compound ( आवार )
परस्पर निरपेक्ष Mutually independent.
परानपेक्ष Autonymous.
परोपद्रव Nuisance.
पर्यवसानीं In the long run.
पहिला मान Precedence.
पादशाही Officialism. ( सरकारी हुद्देदारी )
पार्लमेंट सभेस निवडून पाठविणारे Constituents (पार्लमेंट संबधीं कुळें )
पुनः प्रतिष्ठापन Restoration.
पूग Guild ( व्यापारी, धंद्याचे )
पृथक्कृति करणारा Analyst.
पेटींत गुटिका Ballot.
पौर Urban.
प्रकरण Institution. ( संस्था )
प्रजाव्यक्ति Individual citizen.
प्रजासत्ताक Republican.
प्रतिकारार्थक Remedial.
प्रतिनिधि Representative Proxy.
प्रतिनिधि सत्ताकराज्य Representative Government.
प्रतिबंध Veto.
निषेधरूपी Negative.
प्रतिष्ठितधंदा Profession.
प्रतिस्पर्धा Contest. ( चढाओढ पहा )
प्रत्यर्पण खत Deed of surrender.
प्रधान मंडल Ministry.
प्रमाणीभूतगुरु Authority.
प्रयोग Experiment.
प्रवर्तक Executive
प्रवासी न्यायाधीश Justices in eyre.
प्रसंगोपात्त Provisional.
प्रार्थना ग्रंथ Prayer-Book.
प्रासंगिक Provisional, casual
प्रेक्षक Inspector.
प्रेतनिधानस्थल Burial gro und
फंड Fund ( पुंजी )
फिरण्याहिंडण्याचें स्थल A walk.
बडेलोक Peers ( उमराव )
बाजारपट्टी Market Duties ( मार्किट दस्तुरी )
बिऱ्हाडाच्या चाळी Lodging houses.
भावना Spirit
भुयार घरें Cellar-dwellings.
भूमिनिक्षेप Treasure trove.
मक्ता Contract ( कंत्राट )
मंडल Board, class.
मतपरिसंख्यान Poll.
मध्यमवर्गीय लोक Middle class.
मध्यस्थी Intervention.
मरणोत्तरपरिक्षा Post mortem Examination.

मरी Plague.
मर्जीनुरूप During pleasure.
महोपवन Park.
महोपाध्याय Bishop.
मागणें Claim.
माणूसपट्टी Personal Tax.
मान्यता Recognition.
मालपट्टी Octroi.
मिथ्यास्तुति Euphemism.
मिरवणूक Parade.
मिरासी Freehold.
मुरब्बी Patron.
मृत्युगृह Mortuary.
मृत्युमान Death rate.
मेद Lymph.
मोकळीक Exemption.
यंत्ररचना ( कारभाराकारितां ) Administrative machinery. ( साधनसामग्री )
यादृच्छिक Spontaneous.
राजकारणदृष्ट्या From a political point of view.
राजधान्याश्रममंडळ Metropolitan Asylums Board.
राजसत्ताक Monarchical.
राजायत्त व्यवस्था Despotism.
राज्यकर्त्री मंडळी Territorial corporation.
राष्ट्रीय National.
राष्ट्रीयप्रधान Cabinet Minister.
राष्ट्रीय व्यवस्था Constitution of the state.
रुजू Countersignature.
रोगबीज नष्टकरणें Disinfect.
लाभालाभसंबंध Interest ( अर्थसंबंध )
लायकी Qualification
लौकिक संबंधी Lay, civil.
वरिष्ठ कनिष्ठपणाचा भाव Subordination.
वर्गीकरणादिव्यवस्था Digest.
वहिवाट Occupation, usage.
वायूचें मोकळें गमनागमन Free ventilation.
विज्ञप्ति Presentment.
विधि Ceremony.
विधिरूपी Positive.
विसंगतपणा Eccentricity.
विवेचक Deliberative.
वैकल्पिक व्यवस्था Permissive institution.
व्यक्ति Unit.
व्यक्ति विशेषसंबंधी Personal.
व्यवस्था Organisation, system ( योजना )
व्यवस्थित राज्यरीति Constitutional government.
व्यवस्थित राजसत्ताकराज्य Constitutional Monarchy.
व्यवहार Practical operation.
व्यवहारदृष्ट्या Practically.
व्यापक Comprehensive.
व्यावहारिक सिद्धांत Working hypothesis

व्यूह Organism.

शहर Town.

शहर पुंजी Borough fund.

शहरवासी लोक Urban population.

शासनार्थक Penal.

शास्त्र Code ( नियमसमूह )

शास्त्रीय Speculative, theoritical, scientific.

शास्त्रोक्त रीतीप्रमाणें Logical.

शिबंदी Militia.

शिल्पशास्त्री Architect.

शिस्तवार Methodical.

शेष Survival. [classes.

श्रेष्ठ वर्गातील लोक Higher

सत्ताधारिमंडल Bureaucracy.

सप्रातिबंधस्वत्व Reversion.

समसमानता Co-ordination.

समानविषयक Concurrent.

समाहरण Concentration.

समुदायवाचक नांव Corporate name.

संमाति Vote.

संमातिगृह Pelling station.

संमातिग्राहक Returning officer.

संमतिपत्रक or पात्रिका Voting paper.

संमाति परिसंख्यान Poll.

संक्षिप्त Summary. [powers.

संभूयकारित्वाचा हक्क Corporate

संभूयकारिमंडळी Joint stock company.

संस्थापित धर्मपंथ Established church.

सहकार्यामंत्रण Co-optation.

साधन सामग्री Machinery.

साधून घेतलेला स्वार्थ Vested interest

सामाजिक Social.

सामील Incorporated.

सार्वजानिककारखाने Publicworks.

सार्वजानिक आरोग्यशास्त्र Sanitary science.

सांकेतिक Technical.

सांक्रामिक Infectious.

सांसर्गिक Zymotic.

सिद्धिप्रद Efficient.

सुश्लिष्ट Symmetrical.

सूचना Nomination.

स्थानिक राज्यव्यवस्थामंडल Local Government Board.

स्थानिकोपयोग Local utility.

स्पर्शजन्य रोग Contagious disease.

स्वतंत्र मनुष्य Freeman.

स्वतःसाधक Self-acting.

स्वत्व सोडणें Part with.

स्वाभिमान Self-respect.

हस्तोत्क्षेपण Show of hands.

हवाला Reference.

हुजूर Central.

हुजूर जामदारखाना Treasury.

हुकुमत Jurisdiction.

हृदयाल्हादक Sentimental.

# पुरवणी कोश.

आंतर व्यवस्था Internal administration.

इजारदार Farmer of revenue.

परराष्ट्राशीं संबंध Foreign relations.

परोपद्रव एथें परोपसर्ग शब्द अधिक चांगला दिसतो.

प्रतिबंध Restrictions.

प्रस्तरस्थापना Foundation stone ceremony.

मक्ता Contract. (कंत्राट).

वस्तुत: Practically.

व्यावहारिक एथें निर्वाहक, कामचलाऊ हे शब्द जास्त असावे.

सुटी Exemptions.

स्वतः साधक Self acting.

# शुद्धिपत्र.

| पृ. | पं. | अशुद्ध. शुद्ध. |
|---|---|---|
| १ | ४ | त्याचें—त्या व्यवस्थेचें. |
| ,, | ,, | स्टाटूट—स्टाटुटांत. |
| ,, | ११ | अपमृत्युप्रेक्षक—अपमृत्युपरीक्षक* |
| ,, | १३ | पारिशांचा—पारिशासंबंधी. |
| ४ | १ | राज्याकडून—राज्याधिकाऱ्यांकडून. |
| ,, | ४ | दिवेबत्तीची—दिवाबत्तीची.* |
| ५ | ६ | त्याचें—स्थानिक राज्य व्यवस्थेचें. |
| ,, | २८ | राष्ट्रीय—राजकीय.* |
| ६ | १६ | आरोग्य—सार्वजनिक आरोग्य. |
| ,, | २६ | कमिस्यांला—मंडळांनां* |
| ७ | २२ | निराळे—निराळ्या. |
| ८ | ११ | त्यांच्या—त्या करांच्या. |
| ,, | १३ | नाहीं—नाहींत. |
| ९ | १३ | तेही—तेथें ही ते. |
| ,, | २६ | आपल्याला—आपला. |
| १२ | १२ | स्थिति—जी स्थिति. |
| १३ | १३ | निवडायाचे—निवडावयाचे.* |

| पृ. | पं | अशुद्ध. शुद्ध. |
|---|---|---|
| १४ | ९ | दीनजनांची—दीनजनांचा प्रेक्षक अथवा. |
| ,, | ,, | त्यांची—त्यांचा गार्डियन अथवा. |
| १६ | १० | काम—प्रवर्तक किंवा काम. |
| ,, | ११ | विचार—विवेचक किंवा विचार. |
| ,, | १२ | हुकूम देण्याचा—निकाल करण्याचा. |
| १७ | ६ | जीं सा०....कामें—जे सा०....कारखाने. |
| ,, | १३ | आय....पत्रक-आयव्ययाचें अजमासपत्रक* |
| १८ | १९ | ६०००—६०,००० |
| ,, | २७ | अशा....मंडल—असें सत्ताधारी मंडल. |
| २० | १९ | स्थलांपासून—स्थलांतल्यांपासून. |
| २१ | २ | गांवें—शहरें* |
| ,, | ३ | गांवाचे—नगरांचे* |
| २३ | ९ | त्याचें—तिचें. |
| ,, | १० | हीच—हेंच. |
| २५ | २९ | ँदारी—ँदारीमुळें. |
| २६ | १० | प्रमाणें—सारखां. |
| २७ | ६ | कर—करांच्या. |

| पृ. | पं. | अशुद्ध. शुद्ध. |
|---|---|---|
| २८ | २० | गार—'गाराप्रीत्यर्थ. |
| २९ | १९ | उधार—नांवें; जमे—जमा. |
| ,, | २८ | जातो—जातात. |
| ३० | १९ | गुरफटलेली घोंटाळलेली. |
| ,, | १९ | काढण्याचा—काढितां येईल असा. |
| ३१ | १४ | वहिवाटदारांस—वाहिवाट करणारांस. |
| ३२ | ७ | हस्तप्रदर्शन—हस्तोत्क्षेपण. |
| ३९ | १ | दशमांशप्रदेश—टैथिंग. |
| ,, | १४ | हजार शब्द खोडून टाकावा. |
| ३७ | ९ | अयपत—ऐपत. |
| ,, | १९ | कीं.—कीं सर्व राष्ट्रांतील. |
| ३८ | २१ | जामिनदाराचा—मानराच्या मालकाचा. |
| ४० | १७ | निवडणार-निवडणाऱ्या. |
| ४१ | २८ | वहिवाटीनुरूप—वाहिवाटीस अनुसरून. |
| ४२ | २७ | दिवे....दारीचा—गस्त व दिवाबत्तीसंबंधी. |
| ४३ | ३ | नित्याचीं कामें—पूर्वीचीं नित्य कर्में. |
| ४४ | १ | मिळविण्याबद्दल—मिळण्याबद्दल. |
| ,, | २४ | रेट—'रेट'. |
| ,, | २८ | ह्यां अन्वयें. वहिवाटदारानें कर भरण्याचे ऐवजीं,—असें असावें. |
| ४६ | ३ | देऊळ—देवालय * |
| ,, | २१ | व्यावहारिक—लौकिक. |
| ४७ | ६ | ह्यावर—ह्या स्थलावर. |
| ,, | १२ | पवित्र केलेल्या—यथाविधि संस्कृत. |
| ,, | १४ | होता—असेल. |
| ,, | २१ | ह्या स्थलीं—ह्या स्थलीं मयतास. |
| ४९ | ८ | असतां—असतांनां. |
| ,, | २८ | हुकुमाखालीं—हुकुमाप्रमाणें. |
| ५१ | १९ | विशेष विशेष स्टाटूट अथवा. |
| ५२ | १६ | देत—देतां. |
| ,, | २६ | वेतांत—मांडणुकींत. |
| ५३ | ४ | हे..आहेत—हें....आहे. |

| पृ. | पं. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ५३ | ८ | सिद्ध | साधून घेतलेल्या. |
| ,, | ११ | जरी | कांहीं जरी. |
| ,, | ९ | घरकामाच्या | हरकामी. |
| ,, | २९ | छापी | छाप. |
| ५४ | १९ | मंडळां | राज्यव्यवस्थामंडळां. |
| ,, | २९ | पौंड | पौंडा. |
| ५५ | १८ | १५ | १२. |
| ५७ | २१ | ती तेथें | तेथें ती. |
| ६० | १ | आल्डरमेन | ऑल्डर्मेन* |
| ,, | ७ | 'हें उघड आहे' हें खोडून टांकावें. | |
| ,, | १२ | न्याय | कोर्ट अथवा. |
| ६१ | ११ | पास | मंजूर.* |
| ,, | २१ | पार्लमेंटानी | पार्लमेंट सभेनें.* |
| ,, | २२ | कौन्सलचा | कौन्सलाचा. |
| ,, | ,, | नवीन | बहुतकरून नवीन. |
| ,, | २४ | जातो. | जातो; आणि |
| ६२ | ८ | अंमलांत | ती अंमलांत. |
| ,, | १८ | त्याचा | या गोष्टीचा. |

| पृ. | पं. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ६२ | २१ | त्यांत | बहांत. |
| ६३ | २७ | ते | तो. |
| ६४ | १९ | "असो" येथून नवा पारिग्राफ असावा. | |
| ६५ | २१ | हा हक्क | हा नगरवासीपणाचा हक्क. |
| ६७ | २६ | संभूयकारी मंडळींत | नागरिक संभूयकारी मंडळींत* |
| ६८ | २९ | कार्यास | कार्याकरितां. |
| ७० | १६ | लोकाभिप्रायाचा | जनाभिप्रायाचा. |
| ७१ | ३ | व्यवस्था | अधिकार रचना. |
| ,, | २३ | शहरच्या | नगराच्या, |
| | | गांवांत | शहरांत. |
| ७२ | १० | घेतल्या | मिळविल्या. |
| ,, | २४ | बाबींपासून | बाबी त्यांपासून. |
| ७५ | २८ | समारंभाच्या | सार्वजनिक समारंभाच्या. |
| ७८ | १ | माना | मानाच्या. |
| ,, | १९ | कमी करणें | बदलणें. |
| ७९ | २ | "जर" येथून नवीन पारिग्राफ असावा. | |

| पृ. | पं. | अशुद्ध. शुद्ध. |
|---|---|---|
| ७९ | ७ | जस्टिसांनां—जस्टिस. जितका—त्यांना जितका. |
| ,, | ११ | गांवाचे—नगरांचे. |
| ८० | १ | आणिलें——अखेरीस आणिलें. |
| ,, | २६ | शहर—बरो. तर—तर त्या बरोमधील. |
| ८१ | ५ | सर्व प्रवेश्य—धर्मार्थ. |
| ,, | २० | न्यायाधीशाची सभा-न्यायाधीशांचें कोर्ट. |
| ८३ | १५ | उसने—उसन्या. |
| ८४ | १२ | तज—हीं अक्षरें खोडून टांकावीं. |
| ,, | १६ | देतातव—देऊन. |
| ८५ | १३ | ‘करण्याकरितां तयार’ हे शब्द खोडून टाकावे. |
| ८८ | ७ | “प्रसंगीं” या शब्दा पुढील कौंस खोडून टाकावा. |
| ८९ | २६ | जाहागीर संरजामें नाहींशी झालीं—जाहागिरी संरजाम नाहींसे झाले. |
| ९० | ४ | पासून....तागायत—तागायत....पर्यंत. |
| ९२ | २० | क्वार्टर सेशन—क्वार्टर सेशन सभा. |
| ९३ | २९ | येते—येतो. |
| ९४ | ३ | वधाचा—वध केल्याचा. |
| ,, | २९ | पाठविण्यांत—वरिष्ट कोर्टाकडे पाठविण्यांत. |
| ९५ | २९ | निम्मे—निम्मा. |
| ९६ | २ | फेडण्याला—भागण्याला. |
| ,, | १४ | तपासणी- देखरेख करण्यां. |
| ९७ | २८ | देशविभागांमध्यें यूनियनांतल्या ज्या ज्या प्रदेशाचा....तो तो प्रदेश—असें असावें. |
| ९८ | १० | तरी—तर. |
| ,, | १६ | सांथ—सांत * |
| १०० | २ | तांत्रिक-व्यावहारिक. |
| ,, | १९ | देवीनें=देवींनीं.* |
| १०२ | १६ | करावा—असावा. |
| ,, | २५ | कलमांचे——कलमांचे कायदे; दुसरे——दुसरे कांहीं. |
| १०३ | २६ | यांचा—त्यांचा. |

| पृ. | पं. | अशुद्ध. शुद्ध. |
|---|---|---|
| १०४ | ७ | तें मंडल-तें साधारण आरोग्याधिकारी मंडल. |
| ,, | १८ | दिले—दिलेले. |
| १०८ | ११ | त्याविषयीं-ती विषयीं. |
| १०९ | १० | कारभारा॰—स्थानिक मंडलांचीं कारभारा॰ प्रकारचीं—प्रकारचीं आहेत. |
| ,, | २६ | मल नेणें—मल काढून नेणें. |
| ११० | १० | केलें—झालें. |
| ११३ | ४ | करण्याची—स्वतःच्या खर्चानें करण्याची. |
| ,, | ७ | ॰पा आ॰—यांतील आ खोडून टाकावा. |
| ११४ | ४ | याप्रा ॰—याप्रमाणें. |
| ११४ | २४ | हद्दींतील—मंडलाच्या हद्दींतील. |
| ११५ | ८ | फेड—निभावणी. |
| ,, | ४ | उसने—उसने काढिलेल्या. |
| ११८ | १६ | मंडलास---राज्यव्यवस्था मंडलास. |
| ,, | २१ | अंमलदारांस दिली—अंमलदारांकडे सोंपविलीं. |
| ११९ | २४ | स्थानिक—आणि स्थानिक. |
| १२० | ५ | ह्मणून—असा. |
| १२४ | २७ | देण्या॰—मिळविण्या॰ अधिकार—त्यांना अधिकार. |
| १२५ | १६ | पहिले दोनचा—पहिल्या दोहोंचा. |
| १२६ | २६ | रस्ता—राजरस्ता. |
| ,, | २८ | रस्त्या—राजरस्त्या. |
| १२७ | १० | पाहिजे—पाहिजे कीं. |
| ,, | १२ | नगर—टौनशिप. |
| ,, | २८ | साधनें—साधन. |
| ,, | २८ | दिलीं—दिली; आहेत-आहे. |
| १२८ | ११ | अधिकारी—एक निराळे अधिकारी. |
| ,, | १५ | प्रदेश—देशाविभाग. |
| ,, | १९ | 'एक' हें आहे त्या ठिकाणावर नसून विभागाचें या नंतर असावें. |
| १२९ | १४ | देशाविभाग—प्रदेश, प्रदेश—देशाविभाग. |
| ,, | २५ | प्रमाणें—अन्वयें. |
| १३० | ८ | प्रेतानिधान—प्रेतानिधानविषयक. |

| पृ. | पं. | अशुद्ध. शुद्ध. |
|---|---|---|
| १३१ | ८ | मंडलांनीं—मंडलानें. |
| १३२ | २९ | होय—आहे. |
| १३३ | २ | व—व डिस्ट्रिक्ट बोर्ड. |
| ,, | २० | देणें—करणें. |
| १३४ | २४ | यूनियन—यूनियनांतील. |
| १३९ | ४ | यापैकीं—यांतील. |
| ,, | १४ | जी हें खोडून टाकावें. |
| १३६ | १ | त्यांनीं—त्यांकडून. |
| ,, | ४ | अधिकार—अधिकारी. |
| १३७ | २९ | संभूयकारी-लंडनच्या संभूयकारी. |
| १४० | ४ | शहराच्या येथून नवा पारिग्राफ असावा. |
| ,, | ७ | त्यांच्या—त्या मंडळीच्या. |
| १४२ | १२ | °च्या मर्जीपर्यंत—°ची मर्जी असे तोंपर्यंत. |
| १४३ | २४ | जरूर—जरूर आहे. |
| १४८ | २२ | सांगितलेंच-सांगितलाच. |
| ,, | २४ | काढणें—काढणे असतील. |
| १४९ | १२ | उधारच्या—नांवें कडील. |
| १४९ | १३ | जमेच्या—जमेकडील. |
| १९० | २ | यापासून—हीहून. |
| १९० | ३ | प्रतिकारार्थक किंवा शासनार्थक असें असावें. |
| ,, | ४ | चालविलेलें....काम—न्यायकोर्टांतील चालविलेलें काम. |
| १९२ | १२ | ही—हें. |
| १९७ | ४ | व कलम १२—कलम १२ व |
| १६० | १६ | अशा मंडल—असे सत्ताधारी मंडल. |
| १६१ | १ | (वेस्ट—पोषाख)हे शब्द आहेत त्या ठिकाणावरून काढून'पडलें' या नंतर घालावें. |
| ,, | २१ | नित्याची—नित्य. |
| १६७ | २६ | पवित्र केलेली—यथाविधि संस्कृत. |
| १७१ | १४ | या—स्वस्थतेचें कमिशन ह्मणजे सर्वत्र स्वस्थता राखणारे स्थानिक सत्ताधारी जस्टिस आव्ह घी पीस; वगैरे त्यांच्या. |

| पृ. | पं. | अशुद्ध. शुद्ध. |
|---|---|---|
| १७६ | २२ | उसनवारी-उसनवार. |
| १८० | २९ | पडदे पाडतात घरांत—पडदे पाडतात—घरांत. |
| १८२ | १४ | निजायला—निजावयाला. |
| १८४ | ३ | त्यांनीं—तिनें. |
| ,, | ६ | तें हित—जें हित. |

ता. क. या शुद्धिपत्रांत साधारण ऱ्हस्व दीर्घ, अनुस्वार, पदच्छेद इत्यादि संबंधाचीं अशुद्ध स्थलें दर्शाविलीं नाहींत. त्या स्थलांची व वर दर्शविलेल्या स्थलांची संख्या फार आहे याबद्दल वाचकांची माफी मागितली पाहिजे. आणि इतर कार्यांमध्यें चित्त व्यग्र असतांनां हे भाषांतर लिहिलें व छापिलें या शिवाय दुसरा माफी मागण्याला आधार कांहीं दाखवितां येत नाहीं. ज्या ठिकाणीं * असें चिन्ह वर केलें आहे, तेथें दर्शविलेली चूक अथवा तिच्या सारिखी चूक इतर ठिकाणीं ही झाली आहे असें समजावें. व जेथें ॰ हें चिन्ह आहे तेथें शब्दांतील कांहीं अक्षरें गाळलीं आहेत असें समजावें.